






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






महाराष्ट्र साहित्य परिषदेचे मुखपत्र

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति-मंडळ पुरस्कृत )




प्रकाशन दिनांक
१ जुलै १९६८

वर्ष ४२ : अंक १६४
जानेवारी-मार्च १९६८



संपादक :
के. नारायण काळे

महाराष्ट्र-साहित्य-परिषद : पुणे २

अनुक्रमणिका









मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




महाराष्ट्र
साहित्य
परिषद

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

वर्ष ४२ अंक १६४ १९६८

☆

## या अंकात

☆

महाराष्ट्र साहित्य पत्रिका

[महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळ पुरस्कृत]

वर्ष ४२ अंक १६४ १९६८

# संपादकीय

## दिलगिरी

म. सा. पत्रिकेचा प्रस्तुतचा हा १६४ वा अंक वस्तुतः एप्रिल महिन्यात प्रसिद्ध व्हावयास हवा होता. त्याच्या प्रकाशनाला झालेल्या या विलंबाबद्दल आम्ही अत्यंत दिलगीर असून त्याबद्दल पत्रिकेचे ग्राहक व वाचक यांची मनःपूर्वक क्षमा मागतो.

नियतकालिकांचे अंक, किमान नियमितपणे निघावे अशी त्यांच्या ग्राहकांची अपेक्षा असावी हे स्वाभाविक आहे; परंतु पत्रिकेसारख्या त्रैमासिकाला ही प्राथमिक अपेक्षा पुरी करता येत नाही ही खेदाची गोष्ट आहे. पत्रिकेप्रमाणेच इतरही काही संस्थांच्या कालिकांना अशाच परिस्थितीशी तोंड द्यावे लागते, असे दिसून येते. या संबंधाची काही कारणे परिस्थितिजन्य असली तरी सर्वच तशी नसतात.

सर्वसाधारणपणे पत्रिकेसारख्या नियतकालिकाची पहिली अडचण हवा तसा मजकूर वेळेवर न मिळाल्याची असते. त्यानंतर मुद्रणसौकर्याचा प्रश्न येतो. वृत्तपत्रे व मासिके विवक्षित दिवशीच प्रकाशित करणे प्राप्त असल्यामुळे, मुद्रणालयांना त्यांची ती तारीख सांभाळावी लागते. परंतु त्रैमासिक, षाण्मासिकांसारख्या दीर्घावसर कालिकांच्या बाबतीत ती तितक्याच कसोशीने पाळण्याची आस्था बाळगली जातेच असे नाही. परीक्षांच्या प्रश्नपत्रिका, पाठ्य पुस्तकांच्या आवृत्त्या, यांसारखी तातडीची मोसमी कामे हाताशी असताना अशा नियतकालिकांची कामे दिरंगाईने केली तरी चालतात; अशी भावना अनेक वेळा अनुभवाला येते. परंतु प्रस्तुत प्रसंगी यासारख्या कोणत्याही कारणाने हा विलंब झाला आहे, असा दावा करता येण्यासारखा नाही. हा विलंब कोणत्याही बाह्य परिस्थितीच्या कारणाने झालेला नसून त्याची जबाबदारी सर्वस्वी अंतर्गत कारभारावर आहे हे प्रामाणिकपणे कबूल करणे प्राप्त आहे.

सामान्यतः जानेवारी-मार्चच्या पत्रिकेचा अंक प्रतिवर्षीच सुमारे एक महिना उशीरा प्रसिद्ध होण्याची प्रथा आहे. कारण जून महिन्यात भरणाऱ्या म. सा. परिषदेच्या आगामी वार्षिक साधारण सभेत मांडावयाची, इतिवृत्त, अंदाजपत्रक, ताळेबंद इत्यादी कागदपत्रे व वार्षिक साधारण सभेची व नियामक मंडळाच्या वार्षिक सभेची सूचना, टपालखर्चाची बचत करण्यासाठी अंकाबरोबरच पाठविण्याची पद्धती आहे. प्रतिवर्षाप्रमाणे याही वर्षी ती अंमलात आणली असल्याचे दिसेल. परंतु यासाठी आवश्यक असलेला मजकूर अनेक अपरिहार्य कारणामुळे उपलब्ध होण्यास विलंब झाल्यामुळे, नेहमीपेक्षाही अधिक उशीर या अंकाच्या प्रसिद्धीसाठी होत आहे याबद्दल खेद वाटतो.

परंतु प्रस्तुत अंकाच्या प्रकाशनाला अक्षम्य उशीर झाला असला तरी त्याची पृष्ठसंख्या आणि लेखांची विविधता व दर्जा याकडे लक्ष देऊन पत्रिकेचे ग्राहक वाचक या विलंबाकडे क्षमाशीलतेने पाहतील अशी आशा आहे. झालेल्या विलंबाचे या अंकाला जोडअंक म्हणून समर्थन करता येणे शक्य आहे. पूर्वीच्या काही संपादकांनी या मार्गाचा अवलंब केल्याचा दाखला आहे; परंतु व्यक्तिशः मला तो मार्ग पटत नसल्याकारणाने, त्याचा अवलंब करण्यांत येणार नाही. पुढील दोन अंकांची पृष्ठसंख्या मर्यादित करून, त्यांच्या प्रसिद्धीच्या कालात या अंकाला झालेला हा विलंब भरून काढता येईल असा विश्वास वाटतो.

अनुक्रमणिका

प्रस्तुत अंकात सांवत्सरिक ग्रंथसमालोचनाचे दोन लेख अंतर्भूत झाल्याचे दिसतील. त्याच कालातील विनोदी साहित्याचे मूल्यांकन करणारा तिसरा एक लेख या संबंधीच्या योजनेत अभिप्रेत होता. परंतु तो अद्यापपर्यंत हाती येऊ न शकल्यामुळे, व येण्याचा संभव दिसत नसल्यामुळे, या वर्षाचे ग्रंथसमालोचन या दोन लेखांनीच पुरे झाले असे मानणे प्राप्त आहे.

प्रस्तुत अंक म. सा. परिषदेच्या वार्षिक साधारण सभेपूर्वी प्रसिद्ध होणारा अंक आहे. या कारणाने वार्षिक-साधारण सभेत पत्रिकेचे स्वरूप व तिच्याबद्दलच्या सर्वसाधारण अपेक्षा याविषयी त्या सभेत विचार होणे इष्ट होईल. पत्रिकेच्या ग्राहकांना या दृष्टीने काही विधायक सूचना करावयाच्या असल्यास त्यांनी त्या अवश्य कराव्या अशी विनंती आहे. म. सा. पत्रिका परिषदेचे मुखपत्र म्हणून प्रसिद्ध होते. म. सा. परिषदेच्या सभासदांना त्यांच्या सभासदत्वाच्या वर्गणीपोटी ती देण्यात येत असते. व्यावहारिकदृष्ट्या हा विनिमय आतबट्ट्याचा आहे, या गोष्टीची दखल घेऊन त्यादृष्टीने काहीतरी उपाययोजना करणे दिवसेंदिवस अधिकाधिक अगत्याचे होत आहे.

कै. नानासाहेब चापेकर यांनी सुमारे तीन तपांपूर्वी पत्रिकेला स्वतंत्र अस्तित्व आणि व्यक्तित्व प्राप्त करून दिले; आणि तिचे अन्तरंग व दर्जा याविषयी निश्चित अपेक्षा निर्माण केल्या. त्यांच्या दीर्घकालीन एकहाती संपादनामुळे तिचे धोरण आणि वळण ही स्थिर झाली. पुढे वेगवेगळ्या संपादकांच्या वैयक्तिक अभिरुची व कल्पना यांना अनुसरून तिच्या स्वरूपात थोडेफार फेरबदल झाले असले, तरी प्रामुख्याने त्यांनी घालून दिलेली ओळच पुढे चालू राहिली आहे असे दिसून येते.

अल्पकालीन अपवादात्मक प्रयोग बाद केला तर पत्रिका सामान्यतः त्रैमासिक स्वरूपातच प्रसिद्ध होत आलेली आहे. आर्थिक अनुकूलतेनुसार तिचे आकारमान कमी अधिक आले असले, तरी तिच्या अंतरंगात फारसा बदल झालेला नाही. साहित्यसमीक्षा, समालोचन, संशोधन, साहित्य-संस्कृती व भाषा या विषयींचे शास्त्रीय आणि ऐतिहासिक विवेचन आणि विमर्श, यांसंबंधीचे औपपत्तिक अथवा वर्णनात्मक लिखाण प्रामुख्याने तीमधून प्रकाशित होत आले आहे. ललित साहित्याचा परामर्श पत्रिकेच्या द्वारा घेतला जात असला, तरी ललित साहित्याचे साक्षात प्रकाशन तीमधून फारच अल्प प्रमाणात घडलेले आहे. तिच्या अन्तरंगाचा हा स्वभाव अनेकांना स्पृहणीय वाटत असला, तरी परिषदेचे मुखपत्र या नात्याने हे तिचे स्वरूप सर्वसाधारण सदस्याच्या अपेक्षेनुसार इष्ट अथवा उचित आहे याबद्दल एकवाक्यता आहे, असे गृहीत धरणे धाडसाचे ठरेल. किंबहुना सर्वसाधारण सभासदाच्या दृष्टीने पत्रिकेच्या अंकाच्या बाबतीत, त्यांना वाचनीय वाटेल अशा मजकुराच्या अभावी, सामान्यतः उदासीनताच दिसून येते.

असे असताही जेव्हा जेव्हा परिषदेच्या सभासदत्वाचा आनुषंगिक अधिकार म्हणून पत्रिका विनामूल्य देण्याची प्रथा बंद करावी असे सुचविण्यात येते, तेव्हा तेव्हा त्या कल्पनेला मात्र नेहमीच तीव्र विरोध होत असतो. यांतील विसंगती अगदीच अनाकलनीय नसली तरी त्यामुळे पत्रिकेला एकजिनसी-पणा, आणि सर्वांना समाधानकारक होईल असे स्वरूप आणण्याच्या कामी अनेक अडचणी उत्पन्न होतात; ही वस्तुस्थिती आता दृष्टीआड न करण्याइतकी विकट होऊ लागली आहे. याकरता पत्रिकेचे स्वरूप, तिचे अन्तरंग व तिचे मूल्य यांच्या संबंधात मूलगामी विचार करून काहीतरी निश्चित निर्णय करणे आता अपरिहार्य आहे, असे वाटते.

पत्रिकेचा वाढता व्याप आणि तिच्याबद्दलच्या बदलत्या अपेक्षा यामुळे, आजपर्यंतचे तिचे कार्य जसे निर्वेतन साहाय्यावर चाले, तसे ते यापुढे चालू राहणे केवळ कठिणच नव्हे तर अशक्यप्राय आहे. पत्रिकेच्या लेखकांना आरंभी आपले लेखन कर्तव्यबुद्धीने सर्वस्वी विनामोबदला करावे लागे, त्यानंतर अल्प मानद्रव्य देण्याची प्रथा सुरू झाली. पण ती आता हास्यास्पद ठरण्याइतकी निरर्थक वाटू लागली आहे. या गोष्टीचाही विचार होणे अगत्याचे आहे. पत्रिकेची आर्थिक स्थिती तिला सध्या मिळणाऱ्या साहित्य-संस्कृती मंडळाच्या अनुदानामुळे आज अगदीच हलाखीची नसली, तरी या अनुदानाबरोबरच काही जबाबदाऱ्याही तिच्यावर टाकण्यात आल्या आहेत.

त्यांचे नीटपणे परिपालन करावयाचे तर पत्रिकेला आपल्या कार्यपद्धतीचे व्यवस्थितपणे आयोजन करणे प्राप्त आहे. परिषदेचे कार्यकारी-मंडळ या गोष्टीचा विचार करून आपली योजना परिषदेपुढे मांडीलच; परंतु त्याचे ते कार्य सुकर होण्याकरता परिषदेच्या सभासदांकडून काही मार्गदर्शनपर सूचना आल्यास त्या उपयुक्त ठरतील असा भरवसा वाटतो. तरी त्या दृष्टीने त्यांनी त्या कराव्या अशी त्यांना आग्रहाची विनंती आहे.

## आदरांजली

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे भूतपूर्व कार्याध्यक्ष डॉ. ना. गो. उपाख्य नानासाहेब चापेकर बुधवार ता. ६ मार्च रोजी पहाटे दिवंगत झाले.

महाराष्ट्रातील एक अग्रगण्य ग्रंथकार व संशोधक या नात्याने मराठी साहित्य व इतिहास या क्षेत्रात त्यांचे कार्य सर्वश्रुत आहे. त्याप्रमाणेच मराठी सामाजिक जीवनातील एक कुशल संघटक आणि कार्यकर्ते या नात्यानेही ते विचारवंतांना चिरपरिचित आहेत. महाराष्ट्र साहित्य परिषद आणि धर्मनिर्णय मंडळ या दोन संस्थांतील त्यांची या संबंधातील कामगिरी विशेष लक्षणीय ठरावी.

त्यांच्या बहुविध कार्याची कल्पना देणारे अनेक लेख त्यांच्या निधनानंतर बहुतेक सर्व मराठी वृत्तपत्रांतून आणि नियतकालिकांतून प्रसिद्ध झालेले आहेत. त्यावरून त्यांच्या 'बहुरूपही जशी पाहावी तशीच दिसणार.' अशा स्वरूपाच्या कामगिरीची विविध दृष्टिकोणातून करण्यात आलेली विधायक प्रेक्षा साकल्याने पाहावयाला मिळते. म. सा. पत्रिकेच्या चालू अंकात कै. नानासाहेब यांना आदरांजली वाहण्यासाठी भरलेल्या म. सा. परिषदेच्या शोकसभेत मान्य करण्यात आलेला विस्तृत ठराव अन्यत्र, 'सारसंकलन' या सदरांत, उद्धृत केलेला दिसेल. परिषदेच्या जीवनक्रमात त्यांनी घडवून आणलेल्या स्थित्यन्तराची व त्यासाठी त्यांनी केलेल्या परिश्रमांची त्यावरून काहीशी कल्पना येण्यास मदत होईल. कार्याध्यक्ष म्हणून परिषदेच्या सर्वच कार्याला जसे त्यांनी वळण लावले व नवे चैतन्य दिले; त्याचप्रमाणे तिच्या कार्यक्षेत्रातील पत्रिका या विशिष्ट अंगालाही त्यांनी खास वेगळे स्वरूप प्राप्त करून दिलेले असल्यामुळे, वर उल्लेखिलेला ठराव नमूद केल्यानंतरही या संपादकीयात त्यांच्या स्मृतीला आदरांजली वाहणे हे वर्तमान संपादक या नात्याने मला अगत्याचे वाटते.

कै. नानासाहेब दीर्घकालपर्यंत पत्रिकेचे संपादक होते. ते संपादक होण्यापूर्वी, पत्रिका विविध-ज्ञान-विस्तार मासिकाची पुरवणी म्हणून अवतरत असे. कै. नानासाहेबांनी तिला स्वतंत्र अस्तित्व प्राप्त करून दिले. संपादक या नात्याने त्याने तिला जे रूप दिले तेच साधारणपणे आजही प्रचलित आहे, असे स्थूलमानाने म्हणता येईल. त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा पत्रिकेच्या अंतरंगावर पडलेला हा न पुसला जाणारा ठसा त्यांच्या बहुविध कार्यातील एक महत्त्वाचे लक्षणीय अंग आहे. त्यांनी मागे ठेवलेला हा वारसा अधिक विकसित व समृद्ध करण्याचा पत्रिकेच्या भावी संपादकाकडून प्रयत्न होईल अशी आशा बाळगून, पत्रिकेचा वर्तमान संपादक या नात्याने तिचे भूतपूर्व संपादक कै. नानासाहेब चापेकर यांच्या स्मृतीला आदरांजली वाहणे हे माझे कर्तव्य होय.

* * *

म. सा. परिषद आणि म. सा. पत्रिका यांच्या कार्याशी अत्यंत जिव्हाळ्याचा संबंध असलेले यशवंत गणेश फफे (मनोहर) यांच्या दि. २३ मार्च १९६८ रोजी झालेल्या निधनामुळे म. सा. पत्रिकेतला आपला एक जुना पाठीराखा गेल्यासारखे वाटणे स्वाभाविक होय.

कै. फफे यांचा जन्म १५ मे १८७९ रोजी झाला. त्यांना लाभलेले दीर्घ निरामय जीवन त्यांनी अत्यंत साक्षेपीपणे, अध्ययन, अध्यापन आणि लेखनकार्यात व्यतीत करून मराठी भाषा, व्याकरण, छंदःशास्त्र, इतिहास इत्यादी क्षेत्रात फार मोठे आणि महत्त्वाचे कार्य करून पुढील पिढ्यांना उपकृत केले आहे.

कै. य. ग. फफे यांचा जन्म कुलाबा जिल्ह्यातील चौल या गावी झाला, जुन्या, 'थर्ड इयर ट्रेन्ड' शिक्षकांपैकी ते होते. या थर्ड इयर ट्रेन्डच्या प्रणालीत मराठी साहित्याच्या आणि ज्ञानाच्या क्षेत्रांत ज्यांच्याकडून फार मोठे आणि मोलाचे कार्य झालेले आहे अशा कित्येक व्यक्ती आहेत. त्यात दीक्षित, पवार, अन्तरकर इत्यादींबरोबर कै. फफे यांचाही अन्तर्भाव करावा लागेल.

अनुक्रमणिका

वयाच्या १०–१२ व्या वर्षीच विद्याभ्यासासाठी ते घर सोडून बाहेर पडले. लहानपणापासूनच एक हुषार विद्यार्थी म्हणून त्यांची ख्याती होती. प्रवेश परीक्षेपर्यंतचे इंग्रजी शिक्षण झाल्यावर ते ट्रेनिंग कॉलेजात गेले. आपल्या सर्व शिक्षणक्रमात पहिला वर्ग, आणि पहिला क्रमांक त्यांनी अखंडितपणे कायम राखला होता, असे सांगतात. पुढे प्रौढपणात व्याकरण-व्युत्पत्ती, गणित, छंद इत्यादी अनेक क्षेत्रांत त्यांनी सतत परिश्रम आणि अविश्रान्त व्यासंग करून प्रावीण्य संपादन केले आणि स्फुट लेखन व ग्रंथरचना केली.

आपल्या विद्याव्यासंगाच्या कार्यात व्यत्यय येऊ नये म्हणून धुळे येथील ट्रेनिंग कॉलेजात एक वर्ष नौकरी केल्यानंतर त्यांनी आपली बदली पुणे येथे करून घेतली आणि आपल्या नौकरीच्या बाकीच्या कालात बढती मिळण्याची संधी आली असता तिचा अव्हेर करून ते सतत पुण्याच्या ट्रेनिंग कॉलेज फॉरमेनमध्येच सेवानिवृत्त होइपर्यंत प्राध्यापक म्हणून राहिले. त्यांची ही ज्ञाननिष्ठा अपवादात्मकच म्हणावी लागेल. विद्यार्थ्यांना उपयुक्त असे मोडी किते, पाठ्यपुस्तके, वाचनपाठमाला, शालेय इतिहास, यासारखी शालोपयोगी साहित्यनिर्मिती त्यांनी केली. त्याचप्रमाणे ऐतिहासिक संशोधनातील बिकट समस्या आणि व्याकरण, छंद, व्युत्पत्ती या क्षेत्रातील अनेक विषय व कूट स्थळे यांच्याशी संबंधित असे विपुल, शास्त्रीय स्वरूपाचेही विवेचनात्मक संशोधनपर लिखाण त्यांनी केले. त्यांच्या लेखनाचे क्षेत्र जितके व्यापक तितकेच सुफल आहे; आणि त्याची मौलिक चिकित्सक दृष्टी आणि सूक्ष्म निरीक्षण, यांचा त्यांत सर्वत्र प्रत्यय मिळतो.

ग. वि. चिपळूणकर मंडळीच्या महाभारताच्या मराठी भाषान्तराच्या कार्यात कै. फफे यांचा बराच भाग होता. म. सा. परिषदेच्या अनेक समित्यांचे ते सभासद होते. भारत इतिहास संशोधक मंडळाच्या सभांतून त्यांनी वाचलेली अनेक टिपणे आणि निबंध आणि दैद्य घराण्याच्या दप्तरासंबंधीचे त्यांचे काम, उल्लेखनीय आहेत. 'पिंगलावरील काही आक्षेप' यासारखे त्यांचे छंदोविषयक लेख त्या शाखेतील व्यासंगी विद्वानांत मान्यता पावलेले आहेत.

कै. फफे हे बुद्धिवादी होते. कै. ज. वि. गोखले यांच्या गूढविद्या चिकित्सा मंडळाचे ते एक सदस्य असत व त्या नात्याने त्यांनी त्या संस्थेच्या अनेक प्रयोगांत भाग घेऊन कित्येक थोतांडे उघडी पाडण्यास त्याने मदत केलेली आहे. ज्योतिष शास्त्राचे व्यासंगी असल्याकारणाने फल ज्योतिषाचाही त्यांनी अभ्यास केला होता. पण त्या विद्येला ते शास्त्र मानीत नसत. यामुळे त्यांनी वर्तविलेल्या भविष्यावर त्यांचा स्वतः विश्वास नसे. अनेक परिचित मंडळी त्यांच्याकडून आपली भविष्ये वर्तवून घेई व त्यांचा आपल्याला पडताळा पटल्याचे सांगताना दिसे.

कै. फफे यांनी दीर्घ, सफल आणि निरामय जीवन उपभोगले आणि त्याचा अत्यंत उचित वापर करून समाजाची आणि विद्येची फार मोठी सेवा केली. म. सा. परिषदेला व म. सा. पत्रिकेला त्यांनी जे बहुमोल साहाय्य केले आहे त्याबद्दल परिषद व पत्रिका नेहमीच कृतज्ञ राहतील.

**के. नारायण काळे**

• • •

अनुक्रमणिका

# बखरींचे वाङ्मयीन आकलन

● चंद्रशेखर वर्वे ●

वाङ्मयाच्या अभ्यासकांनी वाङ्मयीन दृष्टीनेच बखरींचा अभ्यास करावा हे केव्हाही औचित्याला धरूनच होय अशा प्रकारच्या अभ्यासासाठी ज्या दिशेने जाणे उपकारक ठरते, ती दिशा दाखविण्याचे काम डॉ. ग्रामोपाध्ये, डॉ. हेरवाडकर व प्रा. भीमराव कुलकर्णी यांनी केलेलेच आहे. पण प्रत्यक्षात या दिशेने जाऊन बखरींचे वाङ्मयीन आकलन सूक्ष्मपणे करून घेण्याचा प्रयत्न फारसा व पुरेसा झालेला आहे असे म्हणवत नाही. ेल्या चारपाच वर्षांत महाविद्यालयातील अध्यापनाच्या निमित्ताने असा प्रयत्न केल्यावर मगच, आज हा लेख लिहीत आहे.

बखरी लिहिताना शास्त्रशुद्ध इतिहास लिहिण्याचा बखरकारांचा मानस नव्हता की ऐतिहासिक कादंबरी लिहिण्याचीही त्यांची आकांक्षा नव्हती. काही महत्त्वाच्या 'घटितां'ची ( फॅक्ट्स्‌ची ) जिवंत चित्रे काढणे हा त्यांचा उद्देश होता आणि 'घटित' कालीन तपशिलाच्या अस्तरावर 'रस'रंगाच्या साहाय्याने तशी चित्रे चित्तवेधक शैलीने त्यांनी काढून ठेवली. नामावळ्या, मित्या, तारखा यांचा उपयोग अस्तर तयार करण्यासाठी म्हणजे 'घटित' कालाचा आभास उत्पन्न करण्यासाठी बखरकार करीत होते हे लक्षात घेतले की मग तपशिलाच्या चुका बोचेनाशा होतात आणि 'घटितां'चे कथन–चित्रण आख्यानासारखे आकर्षक करण्यापुरताच रसपूर्ण रीतीचा अवलंब ते करीत होते हे लक्षात घेतले म्हणजे कादंबरीच्या तुलनेने बखरींना पडणाऱ्या मर्यादा अपेक्षाभंग करणाऱ्या वाटेनाशा होतात. मग, 'घटितां'च्या गाभ्यापर्यंत बखरकार जाऊ शकले आहेत की नाहीत आणि 'घटितां'ची चित्रे कोणकोणत्या 'हुन्नरां'च्या—युक्त्याप्रयुक्त्यांच्या ( डिवाइसेस्‌च्या ) साहाय्याने त्यांनी काढली आहेत व ती कितपत प्रभावी, मनोस्पर्शी केली आहेत हे पाहणेच महत्त्वाचे ठरते.

आणखी एक पक्के लक्षात ठेवणे अगत्याचे आहे. समकालीन, उत्तरकालीन हे वर्णन काळाच्या दृष्टीने केलेले वर्गीकरण किंवा शिवपूर्वकालीन, शिवकालीन, पेशवेकालीन असे वर्ण्यकाळाच्या दृष्टीने केलेले वर्गीकरण इतिहासदृष्ट्या जितके उपयुक्त आहे तितके वाङ्मयदृष्ट्या मुळीच नाही. रोखठोक कथन करणाऱ्या बखरी व रसील्या रीतीने कथन करणाऱ्या बखरी हे शैलीच्या दृष्टीने केलेले प्राथमिक वर्गीकरण किंवा त्यापेक्षाही कुलवृत्तान्त सांगणाऱ्या, व्यक्तिचरित्रात्मक, घटनावर्णनपर बखरी असे वर्ण्यविषयाच्या दृष्टीने केलेले औपरान्तिक वर्गीकरण इतिहासदृष्ट्या अनावश्यक असले तरी वाङ्मयदृष्ट्या तेच उपयुक्त ठरणारे आहे. 'घटितां'ची चित्रे पाहात असताना हे मुळीच विसरून चालणार नाही.

वर्ण्यविषयाच्या व्याप्तानुसार बखरकारांना चित्रणासाठी मिळणारा उणाअधिक अवसर ( स्कोप ) ध्यानात घेतला नाही तर सर्व बखरींकडून सारख्याच व म्हणून भलत्याच अपेक्षा केल्या जाण्याची शक्यता फार; आणि स्वाभाविकपणेच बखरींचे नेमके आकलन होण्याचा संभव जवळजवळ शून्य! चुटकेवजा आठवणींतून फुलत जाणाऱ्या 'हरिवंशाच्या बखरी' कडून केवळ सलग, दीर्घ, विस्तृत व्यक्तिचित्रणाचीच अपेक्षा केली तर ती पूर्ण होणार नाहीच आणि बखरीची गोडी कशात आहे हे तर मुळीच कळणार नाही! मल्हारराव रामराव चिटणिसांनी लिहिलेल्या संभाजीराजांच्या चरित्राकडून निव्वळ रसोत्कर्षकारक प्रसंगवर्णनांचीच अपेक्षा केली तर ती कशी पूर्ण होणार आणि मूळ चरित्राचे रहस्य तरी कसे समजणार? 'खर्ड्याच्या स्वारीच्या बखरी' कडून फक्त छोट्यामोठ्या किश्शांची किंवा सुरस आख्यायिकांचीच अपेक्षा करून काय साधणार आणि बखरीचे खरे सामर्थ्य ( जे आहे ते ) कुठून आकळणार! तेव्हा, वर्ण्यविषयानुसार प्रत्येक बखरीतली रसवत्ता वेगवेगळ्या गोष्टीत असणार हे ध्यानात घेऊनच प्रत्येक बखरीचे, तिच्या वेगळेपणाचे आकलन करून घेणे हे श्रेयस्कर! अन्यथा, व्यक्तिवर्णने चांगली आहेत.. अशा गुणग्रहणात्मक किंवा युद्धवर्णने साधलेली नाहीत...अशा

दोषदर्शनात्मक, साचेबंद, सरधोपट, स्थूल श्रेण्यांपलीकडे बखरींचे वाङ्मयीन आकलन जाणे केवळ अशक्य! म्हणून सूक्ष्म आकलनाच्या दृष्टीने अपेक्षामुक्त मनाने वेगवेगळ्या बखरींना वेगवेगळ्या रीतींनी सामोरे जावे हेच सर्वसाधक होय.

'पेशव्यांची बखर,' 'चिटणिशी बखर' (शिवछत्रपतींचे सप्तप्रकरणात्मक चरित्र) व 'भाऊसाहेबांची बखर' या तीन बखरी म्हणजे तीन प्रकारचे नमुने होत. या तीन बखरींना सामोरे जाऊन त्यांचे-त्यांच्या पृथगात्मतेचे, त्यांच्या बलस्थानांचे-अचूक आकलन कसे करून घेता येईल हे यापुढे हेतुतःच दाखवणार आहे. त्यायोगे बखरींच्या वाङ्मयीन आकलनाचे मार्ग, आकलनाच्या पद्धती अधिक स्पष्ट होतील.

※ ※ ※

इ. स. १७१३–इ. स. १८१८ या शंभर वर्षांतील, बाळाजी विश्वनाथापासून बाजीराव रघुनाथपर्यंत झालेल्या सात पेशव्यांच्या कारकीर्दीचा विस्तृत इतिहासपट 'पेशव्यांच्या बखरी'त उलगडण्यात आलेला आहे. पसरत जाणाऱ्या राजकारणाचा, छोट्यामोठ्या जयापजयांचा म्हणजे एकूण मराठेशाहीच्या चढउतारांचा धावता आलेख या बखरीत काढण्यात आलेला आहे. बखरकाराने हे कसे केले आहे? तो कोठे थांबला आहे? कोठे रेंगाळला आहे? कोठे झटकन पुढे गेला आहे? मर्म सांगून गेला आहे की डावलून गेला आहे? त्याने असे का केले आहे– माहितीच्या अपुरेपणाच्या जाणिवेमुळे की रंगत वाढवण्याच्या मोहामुळे? अशा अनेक प्रश्नांच्या अनुरोधाने बखरीचे समालोचन केल्यावर काही विशेष गोष्टी निदर्शनाला येतात.

या बखरीत बहुतेक महत्त्वाच्या ठळक घटनांची ढोबळ माहितीच देण्यात आलेली आहे. या घटनांच्या ऐतिहासिक महत्त्वाचे विवेचन बखरकाराने केलेले नाही किंवा तपशीलवार विवरणही दिलेले नाही. पण विस्तृत इतिहासपट उलगडू पाहणाऱ्या बखरकाराकडून त्याच्या वकुबाच्या व पटाच्या आवाक्याबाहेरच्या विवेचन-विवरणाची अपेक्षा करणेच अस्थानी ठरेल. फारच झाले तर, त्याने 'इंटरप्रिटेशन' केले नाही म्हणून तक्रार न करता, आवश्यक तेथे आपली 'इंप्रेशन्स्' दिली नाहीत, असे म्हटल्यास चालेल. तथापि बखरकाराने मराठी सत्तेच्या उत्कर्षापकर्षाचा आलेख काढताना ठळक स्तंभ (कॉलम्स्) सहसा सुटू दिलेले नाहीत अथवा पुसट होऊ दिलेले नाहीत अशीच नोंद केली पाहिजे. बखरींच्या वाङ्मयीन आकलनाच्या संदर्भात, बखरकाराने केलेल्या विपर्यासांची नोंद करण्यापेक्षा ही आताची नोंद करणे अधिक सयुक्तिक!

तसे पाहिले तर बखरकाराला तपशिलाचे वावडे नाही. घटितांच्या कथनात बारीकसारीक गमतीजमतींचे पुरण त्याने बरेच भरलेले आहे. पण याचा अर्थ, अशा पुरणाच्या साहाय्याने बखरीची गोडी वाढवण्याचे वेडच त्याला आहे, असा नाही. इतिहासाच्या दृष्टीने महत्त्वाच्या असणाऱ्या, प्रकाश पाडणाऱ्या सूक्ष्मासूक्ष्म्या तपशिलापेक्षा सुरस तपशिलाकडे बखरकाराचा ओढा आहे हे खरे; पण या बाबतीतले त्याचे आकर्षण पहिल्यापासून अनावर नाही. सुरुवातीला ते अगदी दबलेले आहे आणि पुढे पुढे ते उफाळत गेलेले आहे. हळूहळू होत गेलेला हा बदल बारकाईने पाहण्याजोगा आहे. पहिल्या प्रकरणात, नको तेथे तपशील भरण्याची बखरकाराची वृत्ती असली तरी रंग भरण्याकडे त्याचा कल दिसत नाही. दुसऱ्या प्रकरणात, धावते चित्रण करीत तो त्वरेने पुढे निघालेला असला तरी अधूनमधून थांबून थोडे रंगही भरू लागलेला दिसतो; मात्र नुसत्या रंगतीचाच मोह त्याला असलेला दिसत नाही. तिसऱ्या प्रकरणात, रंगत साधण्याचा मोह प्रबळ होऊ लागल्यामुळेच की काय मुख्य गोष्टी थोडक्यात सांगून टाकून, झटकन सांधा बदलून, रंगतदार गोष्टीकडे तो मोहरा वळवू लागलेला असला तरी अजून पुरेसे रंग भरताना, रसपूर्ण वर्णन करताना तो दिसत नाही. चौथ्या व पाचव्या प्रकरणांत, अशा वर्णनांकडे तो झुकलेला दिसतो, वेगवेगळ्या रीतींनी रंग भरण्याचे प्रयोग करू लागलेला दिसतो आणि सहाव्या व सातव्या–विशेषतः सहाव्या प्रकरणात तर खुषीत येऊन मोकळ्या मनाने तो रंगकाम करू लागलेला दिसतो, मुक्तहस्ताने रंगांची उधळण करू लागलेला दिसतो.

मराठ्यांच्या रंगत जाणाऱ्या राजकारणाबरोबर बखरीची रंगत वाढत गेलेली असली तरी राजकारण हे याचे कारण नाही. किंबहुना असे म्हणावयास हवे की शंभर वर्षांपूर्वीच्या राजकारणाचे कथन करताना बखरकारावर नकळत दडपण आलेले आहे. त्या राजकारणाचे कथन तो टाळू शकत नाही, पण दूरची मजल मारावयाची असल्यामुळे सुरुवातीपासूनच रमतगमत जाऊन तो रंगत

वाढवूही शकत नाही. जसजसा बखरकार आपल्या काळाला जवळ असलेल्या पेशव्यांविषयी लिहू लागलेला आहे, तसतसा (राजकारणाचे ज्ञान थोडे गृहीत धरले आणि रंगकामामध्ये रममाण झाले तरी चालण्यासारखे आहे असे वाटल्यामुळेच की काय) राजकारणाच्या विकट वाटेवरच्या जाचक चाकोरीतून तो बाजूला होऊ लागलेला आहे. आणि 'निर्झरा' सारखा सलिलक्रीडा करीतकरीत पुढे जाऊ लागलेला आहे. ललित गायनाची प्रकृती असलेल्या गायकाने चांगला रागसुद्धा अनवटासारखा गाऊन भरड करून टाकावा, मग खुबीने रागांची मिश्रणे करून ललित अंगाने गाऊ लागावे, नंतर सरळ खुलेपणाने होरीठुमरी गावयास घेऊन ढंग दाखवावा आणि त्यामुळे मैफल शेवटी रंगत जावी, तशी 'पेशव्यांची बखर' उत्तरोत्तर रंगत गेलेली आहे.

मैफलीसारखी रंगत गेलेली ही बखर असली तरी पूर्णपणे रंगलेल्या मैफलीसारखी ती वाटत नाही. व्यक्तिवर्णने अपुरी आहेत किंवा घटनावर्णनात कोरडेपणा जास्त आहे, हे असे वाटण्याचे कारण नव्हे. पेशव्यांच्या परंपरेचे, चढत्या-उतरत्या पराक्रमाचे कथन करू पाहणाऱ्या या बखरीची रंगत, देहाकृतींच्या वर्णनात किंवा लढायांच्या वर्णनात असेल अशी कल्पना करून घेणे हेच मुळात चुकीचे होय. निजामाच्या दरबारात बाजीराव, 'रमण्या'त दक्षिणा वाटणारे नानासाहेब, सखारामपंतबापूंना वाड्यात बोलावून धाक लावणारे माधवराव, पर्वतीच्या तळ्यात महादजीसमवेत सवाई माधवराव, अशा मासलेवाईक, त्या त्या पेशव्याला उठाव देणाऱ्या प्रसंगांच्या खुलावटीत रंग शोधणे हेच कल्पकतेचे व मर्मज्ञतेचे द्योतक ठरेल. अशा प्रसंगांचे चित्रण तर बखरकाराने चांगले केलेले आहे. आणि या बखरीची वाढती रंगत मुख्यतः अशा प्रसंगचित्रणातूनच साकल्याने निर्माण झालेली आहे. अशी रंगत असूनही ही बखर अर्धवट रंगलेल्या मैफलीसारखी वाटते याचे कारण या बखरीची भाषा लोचदार नाही.

आणि तरीदेखील हे मान्यच केले पाहिजे की इतिहासाचार्य राजवाड्यांनी साधनखंडात प्रसिद्ध केलेल्या कारकूनकृत पेशव्यांच्या बखरीपेक्षा सोहनीलिखित पेशव्यांची बखर ही निःसंशय अधिक विलोभनीय आहे. पहिल्या बखरीत प्रत्येक पेशव्याच्या कर्तृत्वाविषयी, कामगिरीविषयी मार्मिक विधाने आलेली असल्यामुळे ती एखाद्या चिजेच्या नेटक्या बंदिशीसारखी झालेली आहे. दुसरी तशी नसली व पूर्णपणे रंगलेली नसली तरी तिची म्हणून एक खास, कलेकलेने वाढणारी रंगत आहे आणि ती बारीकीने लक्षात घेण्याजोगी आहे हे निश्चित !

* * *

'चिटणिशी बखर' ही चरित्रात्मक आहे. "श्रीशिवछत्रपती अवतार होऊन (त्यांनी) राज्यआक्रमण-पराक्रम केले व धर्मस्थापना केली." हे कसे केले हे स्पष्ट करण्यासाठी 'सप्तप्रकरणात्मक चरित्रा' चे लेखन करण्यात आलेले आहे. महानुभावीय किंवा महिपतिलिखित चरित्रांच्या पार्श्वभूमीवर हे चरित्र प्रथमतः एका गोष्टीमुळे एकदम उठून दिसते. ती गोष्ट म्हणजे चरित्राचा विषय ! संप्रदायपूज्य महंत किंवा बहुजनमान्य संत यांना चरित्रनायक करण्याची परंपरा असताना एका वीरपुरुषाला चरित्रनायक करण्यात आलेले असल्यामुळे 'सप्तप्रकरणात्मक चरित्र' एकदम लक्ष वेधून घेते. ते पाहावयाला लागल्यावर एक मात्र मनात येतेच की, विषय बदललेला असला तरी साचा तोच तर राहिलेला नाही ना ? म्हणजे संतांच्या चरित्रातले लौकिक जसे अलौकिकाच्या पातळीवर चढवले गेले आहे, तसे अवतारी छत्रपतींचे चरित्र अद्भुताच्या कोटीत तर नेले गेले नसेल ना ? विषयाप्रमाणेच या चरित्राचे स्वरूपही वेगळे आहे की नाही ? चरित्रात्मक बखर म्हणून या बखरीचे रूप कसे आहे ? इतर शिवचरित्रपर बखरींशी तुलना केल्यास ते स्पृहणीय वाटते की नाही ? या प्रश्नांचा मागोवा घेत घेत चरित्राचे वाचन केल्यावर पुढील निष्कर्ष निघतात.

'सप्तप्रकरणात्मक चरित्रा'त अनेक प्रकारच्या तपशिलाच्या गफलती असल्या तरी त्यांचाच हिशेब करीत बसण्यात काही हशील नाही—अर्थात वाङ्मयीन अभ्यासाच्या पातळीवर ! या चरित्रात शिवजीवनातील मुख्य घटनांची बरीच खरीखुरी माहिती मिळते, शिवाजीराजांच्या राजनीतिवावतचा व राज्यव्यवस्थेबद्दलचा उद्बोधक तपशील हाती लागतो आणि सर्वांत महत्त्वाचे म्हणजे शिवछत्रपतींच्या कर्तृत्वाचे व व्यक्तित्वाचे प्रभावी दर्शन घडते, या जमेच्या गोष्टी लक्षात घ्यावयास हव्यात. इतिहासाचार्य राजवाडे यांनीही याच आशयाचा अभिप्राय देऊन ठेवलेला आहे, इकडे डोळेझाक करून चालावयाचे नाही. या अभिप्रायापेक्षा, बखरकारांच्या शिवचरित्रविषयक पुराणनिष्ठ दृष्टिकोणाचे जे समर्थन त्यांनी केले आहे,

त्याला अधिक महत्त्व आहे आणि ते नजरेआड करणे इष्ट नव्हे. पण राजवाडे यांचा आधार घेऊन बोलण्यापेक्षा मूळ बखरीचे स्वतंत्रपणे अवलोकन करून बोलणे हे केव्हाही अधिक फलदायी !

शिवाजीराजांकडे पाहण्याचा बखरकाराचा दृष्टिकोण आधी नीट समजावून घेतला पाहिजे. शिवछत्रपतींकडे 'अवतारी' पुरुष म्हणून तो पाहतो, त्यांचे कार्य त्याला 'अमानुषी' वाटते, त्यांचे विभूतिमत्त्व व लोकोत्तरत्व – बखरकाराच्या भाषेत त्यांचे 'विचित्र तेज' व त्यांची 'विचित्र कर्तृत्वबुद्धी' – त्याला जाणवलेली असल्यामुळे तो भारावूनही गेलेला दिसतो. पण या साऱ्यांचा विपरीत परिणाम बखरीवर झालेला दिसत नाही. बखरकाराने शिवछत्रपतींच्या अलौकिकत्वाची जाणीव सतत ठेवलेली आहे, पण त्यांचे चरित्र अद्भुत लोकांत नेलेले नाही; महाराजांच्या लौकिकत्वाची यथोचित बूज त्याने राखलेली आहे, पण त्यांचे सामान्यीकरणही केलेले नाही. त्याच्या शिवचरित्राला 'अलौकिका' चा स्पर्श आहे, पण त्याचा भर 'लौकिका' वरच आहे; शिवाजीमहाराजांमधील 'दैवी' अंशाचे भान चरित्रात जागते आहे, पण त्याच वेळी 'मानवी' गुणांचे स्मरणही त्यात अखंड आहे. तेजोवलयातून हे चरित्र मुक्त झालेले नाही; पण पार्थिवाच्या संपुटातूनही ते बाहेर पडलेले नाही. 'अलौकिक,' 'लौकिक,' 'दैवी,' 'मानवी' ही या चरित्राची चौकट आहे. या चौकटीत शिवछत्रपतींच्या कर्तृत्वाचे, व्यक्तित्वाचे, विभूतिमत्त्वाचे, लोकोत्तरत्वाचे चित्र बखरकाराने काढलेले आहे. आणि इतिहासाच्या दृष्टीने त्याला धारेवर धरणाऱ्यांनासुद्धा त्याचे चित्रणातील असाधारण यश मान्य करणे भाग पडावे, एवढे ते चित्र प्रभावी आहे. या चित्रात शिवाजीराजांचे 'वडे' गुण असे ठसठशीतपणे शब्दांकित करण्यात आलेले आहेत की शिवव्यक्तित्वाचा ठसा वाचकाच्या मनावर खोलवर उमटावा.

शिवव्यक्तित्वाचा संकलित संस्कार चांगला व्हावा यासाठी व्यक्तित्वाचे दर्शन बखरकाराने विशिष्ट पद्धतीने घडवलेले आहे. चरित्र सांगण्याची त्याची पद्धत ही कथाकथनकाच्या थाटाची आहे, हरदासी आख्यानाचा ढंग त्या कथनात आहे. पण हा ढंग त्याने सहसा कोठे निष्कारण वाढू दिलेला नाही. आवश्यक तेथे (उदाहरणार्थ, राज्याभिषेकप्रसंगी) शिवराज्याच्या उत्कर्षाचा प्रत्यय यावा अशी भरघोस वर्णने त्याने केलेली असली तरी एकंदरीत गडकोट-किल्ले, युद्धे, विवाहसोहळे अशा घटनांची वर्णने त्याने टाळलेली आहेत. कुवत नसल्यामुळे असली वर्णने त्याने टाळलेली आहेत आणि ती टाळल्यामुळे बखरीतील रसोत्कटता कमी झालेली आहे असे म्हणणे हे धाष्टर्यांचेच होय. ही बखर चरित्रात्मक असल्यामुळे तिच्यातील चरित्रचित्रात रस वाटतो की नाही हा खरा प्रश्न ! योग्य ते तारतम्य ठेवून पाहिले तर असे दिसून येईल की गोडी वाटावी असेच चरित्रचित्र साधण्याचा आटोकाट प्रयत्न बखरकाराने केलेला आहे. शिवजीवनातील बालपणीची प्रतिज्ञा, अफझलवध, पुरंदरचा वेढा, आग्रा-भेट, व्यंकोजीवरील विजय, राज्याभिषेक, संभाजीचे दुर्वर्तन, क्लेशकारक मृत्यू असे निवडक प्रसंग, क्वचित हेतुतः (?) क्रम बदलून, नाट्यपूर्ण रीतीने एकापुढे एक सांगत सांगत तडक गतीने बखरकार पुढे गेलेला आहे; आणि सर्व प्रसंगकथनाचा रोख त्याने शक्यतो शिवदर्शनाकडे ठेवलेला आहे. शिवदर्शन उठावदार प्रभावी व्हावे म्हणून कधी अतिशयोक्तीचा आश्रय, काही ठिकाणी अद्भुताचा शिडकावा, कोठे आख्यायिका-दंतकथा यांचा उपयोग, नेमक्या जागी पौराणिक दृष्टान्तांचा वापर अशी त्याची हरहुन्नरी कथनशैली आहे. या शैलीमुळे काही जागीं शिव-आयुष्यातील तपशील दुखावला गेला आहे हें खरे; पण शिवजीवनातील तथ्याला, शिवव्यक्तित्वाच्या गाभ्याला थोडाही धक्का लागलेला नाही.

चरित्रात्मक बखरीमध्ये याहून अधिक काय हवे ? खरोखर हे 'सप्तप्रकरणात्मक चरित्र' म्हणजे सात प्रकरणांतून विखुरलेल्या सुट्यासुट्या प्रसंगचित्रांतून साकल्याने सिद्ध झालेले शिवचित्र होय. शेजवलकरांच्या शिवचरित्रासारखे ते भाष्यनिष्ठ, ऊहापोहात्मक राजकीय चरित्र नव्हे की खानोलकरांच्या रवींद्रचरित्राप्रमाणे ते नवनिर्मितिनिर्भर, सर्जनशील वाङ्मयीन चरित्रही नव्हे. विविध तपशिलाच्या अस्तरावर उठून दिसणारे ते शिवव्यक्तित्वाचे चित्र होय. पण कर्तृत्वाच्या 'सुवर्णा'ची 'तुला' करणाऱ्या किंवा 'सागरोपम' व्यक्तित्वाचे 'मंथन' करणाऱ्या क्षीरसागरांच्या आधुनिक विवेचनात्मक, मूल्यमापनात्मक व्यक्तित्वचित्रांशीही त्याचे नाते नाही. तसे त्याचे नाते आहे प्राचीन आदरगर्भ, संकीर्तनात्मक, कथनपर संतमहंतचरित्रांशीच ! तथापि महिपतीच्या 'संतलीलामृता' प्रमाणे सुरस चमत्कारकथेचे

अनुक्रमणिका

रूप त्याला आलेले नाही किंवा म्हाइंभटाच्या 'लीळा-चरित्रा'सारखे ते स्फुट, स्मृतिबंधरूपही झालेले नाही. ते प्राधान्याने पुरुषप्रयत्नाचे, मानवी प्रतापाचे चरित्रचित्र आहे व त्याचे सलग, (हिंदीतील अर्थाने) प्रबंधरूप लक्षणीय आहे. आणि यामुळेच संतमहंतचरित्रांपेक्षा हे वीरचरित्र वेगळे वाटते.

संतचरित्रांपेक्षा 'सप्तप्रकरणात्मक चरित्र' जसे वेगळे वाटते, तसेच ते इतर शिवचरित्रपर बखरींहूनही निराळे, इतकेच काय पण एका दृष्टीने अधिक प्रभावी वाटते. शैलीच्या दृष्टीने दोन टोकांच्या असलेल्या बखरींपुरतीच तुलना करून हे म्हटलेले आहे. ९१ कलमी किंवा सभासदी बखर हे एक टोक, तर चित्रगुप्ताची बखर हे दुसरे टोक. ९१ कलमी बखर किंवा सभासदी बखर यांत 'घटितां'च्या धावत्या नोंदीच जास्त आहेत. काही प्रसंगांचे नीटस चित्रण त्यांतून असले तरी एकूण प्रसंगचित्रणात रंग भरण्याची वृत्ती दिसत नाही. चित्रगुप्ताच्या बखरीत ही वृत्ती प्रकर्षाने दिसते, सभासदी बखरीतले प्रसंग फुलवून-खुलवून डौलदार भाषेत सांगण्याची पराकाष्ठा दिसते. चिटणिशी बखरीत-'सप्तप्रकरणात्मक चरित्रा'त-पहिल्या टोकाच्या चरित्रातील इतिहासाची जाणीव आहे, पण त्यातला रेखीवपणा नाही; आणि दुसऱ्या टोकाच्या बखरीतील रंगत आहे, पण तिच्यातले सौष्ठव नाही. असे असल्यामुळे खरे म्हणजे 'चिटणिशी बखर' ही दोन टोकांच्या बखरींहून हिणकस ठरावी. पण तिच्यातले शिवचित्र अन्य बखरींतील चित्रापेक्षा अधिक ठोसर असल्यामुळे ती वरचढ ठरते. शिवचरित्राचे रहस्य चांगले कळावे इतके तसे उल्लेखच पहिल्या टोकाच्या बखरींत नाहीत आणि दुसऱ्या बखरीत असले तरी ते स्पष्ट, निःसंदिग्ध नाहीत. 'चिटणिशी बखरी'त मात्र इतर अनेक उल्लेखांच्या जोडीला, शिवाजीराजांचे अवतारकार्य, त्यांनी महाराष्ट्रधर्माचे साधलेले पुनरुत्थान, त्यांनी ठेवलेले राजकीय धोरण, त्यांनी केलेले राज्यनियंत्रण यांविषयीचे उल्लेख बखरकाराने पालुपदासारखे पुन्हा पुन्हा केलेले असल्यामुळे त्याने रेखाटलेले, रंगवलेले शिवाजीराजांच्या कर्तृत्वाचे, व्यक्तित्वाचे, विभूतिमत्त्वाचे, लोकोत्तरत्वाचे चित्र चांगलेच उठावदार झालेले आहे. आणि एवढ्यासाठीच 'चिटणिशी बखरी'ची मातब्बरी! आता ही बखर अगदी वैगुण्यविरहित आहे असे मुळीच नाही. पण विरूपतेतूनही सुरूपता लक्षात यावी असे तिचे स्वरूप आहेच आहे! पाण्यावर काढलेला गालिचा काहीसा विस्कळला-विस्कळित झाला तरी तशाही स्थितीत त्याचे मूळचे सौंदर्य जाणवतेच की नाही! 'चिटणिशी बखर' म्हणजे असाच एक विस्कटलेला, पण लक्ष वेधून घेणारा गालिचा होय!

* * *

पुरेसा न रंगलेल्या मैफलीसारखी 'पेशव्यांची बखर' आहे आणि विस्कटलेल्या, पण वेधक गालिचासारखी 'चिटणिशी बखर' आहे, तर सुंदर, सजीव लेण्यासारखी 'भाऊसाहेबांची बखर' आहे. ही बखर ज्या पानिपत प्रकरणावर आहे, त्याच प्रकरणावरच्या आवर्जून दखल घेण्याजोग्या बखरी म्हणजे 'भाऊसाहेबांची 'कैफियत' व 'पाणिपतची बखर'! इतिहासाच्या दृष्टीने विश्वसनीय असल्यामुळे 'कैफियत' ही एखाद्या अभंग, काळ्याशार खडकासारखी दिसते, तर वाङ्मयगुण असल्यामुळे 'पाणिपतची बखर' हीदेखील 'भाऊसाहेबांच्या बखरी' प्रमाणे लेण्यासारखीच भासते. काळ्याशार खडकातसुद्धा वेड लावणारे सौंदर्य असू शकते; व तसे ते 'कैफियती'त आहेही! पण खडकात खोदलेल्या लेण्यांचे सौंदर्य हे अधिक मंत्रमुग्ध करणारे वाटले तर ते स्वाभाविकच होय. या दृष्टीने लेणी खोदणाऱ्या दोन बखरींची तुलना करून पाहिली तर 'पाणिपतच्या बखरी'पेक्षा 'भाऊसाहेबांची बखर' हीच रसिकतेचे पारणे फेडणारी वाटते. पहिल्या बखरीत बरेच वाङ्मयगुण असले तरी दुसऱ्या बखरीतील 'घटिता'च्या गाभ्याला भिडण्याची ताकत, चित्रणातला भेदकपणा, शैलीतला सुढाळपणा इत्यादी गुण तिच्यात नाहीत. आणि असे अनेक गुण असल्यामुळेच 'भाऊसाहेबांच्या बखरी'तले वाङ्मयीन ऐश्वर्य विस्मयचकित करणारे वाटते. बखरीत हे ऐश्वर्य कोणकोणत्या ठिकाणी दिसते? एवढे ऐश्वर्य एका कारकुनी करणाऱ्या (?) बखरकाराला कशाच्या बळावर दाखवता आलेले आहे? हे ऐश्वर्य बखरीच्या परिसीमेत सामावणारे आहे का? असे प्रश्न मनात येतात. बखरीचे खोल आकलन केल्यावर त्यांची जी उत्तरे मिळतात ती पुढे नमूद केली आहेत.

लेण्यांच्या खोदकामातील-कोरकामातील वळणा-वेलांट्यांनी-लपेटींनी लांबूनच लक्ष वेधून घ्यावे, त्याप्रमाणे बखरकाराच्या चित्रणातील ठाशीव, लवलवत्या रेखा प्रथमदर्शनीच लक्ष वेधून घेतात.

या रेखा, वातावरण, घटना, व्यक्तिभाव, क्षणार्धात मूर्त करणाऱ्या वेचक, बोलक्या शब्दांतून दिसतात. या रेखा, थोडक्यात पुष्कळ सांगणाऱ्या, अर्थघन, भावगर्भ वाक्यांतून दिसतात. या रेखा, विविध प्रसंग, मनोभाव, मुद्राविर्भाव, त्यांतल्या छटा झटकन साक्षात करणाऱ्या, समर्पक, सूचक उपमादृष्टांतातून दिसतात. या रेखा, व्यक्तिकृतींवर भाष्य करून जाणाऱ्या, आपलेंचे गांभीर्य प्रत्तीतीला आणून देणाऱ्या चोख, चपखल म्हणी दोहऱ्यांतून दिसतात. या रेखा, जागच्या जागी आलेल्या परिणामसाधक माहिती पुरवणाऱ्या आख्यायिका दंतकथांतून दिसतात. या रेखा अशा कितीतरी गोष्टींतून दिसतात. आणि विशेष म्हणजे या रेखा बखरकाराच्या नुसत्या भाषाप्रभुत्वाच्या किंवा बहुश्रुततेच्या निदर्शक नाहीत, तर त्याच्या विचक्षणपणाच्या, कल्पकतेच्या द्योतक आहेत. या रेखांतूनच 'पानिपत'प्रकरण, थेट मनाच्या मर्मस्थळाला जाऊन भिडेल अशा रीतीने व्यक्त झालेले आहे, म्हणून तर या रेखांचे खास कौतुक!

अशा रेखांच्या साहाय्याने प्रत्यक्ष पानिपतावरील किरकोळ चकमकींचे, टिपरघाईच्या लढायांचे, निकरावर आलेल्या तुंबळ रणसंग्रामाचे, मराठ्यांच्या पाडावाचे, त्यांच्या अभूतपूर्व पळाचे बखरकाराने केलेले चित्रण कमालीचे जिवंत व अक्षरशः विलक्षण प्रत्ययकारक असेच आहे. पानिपतावरच्या युद्धातले वेगवेगळे टप्पे, झुंजणाऱ्यांच्या नानाविध गती हे सारे त्याने बारकाव्यांनिशी असे अचूक टिपलेले आहे की सबंध धुमश्चक्री, रणधुमाळी देखतडोळा समोर घडल्यासारखी वाटते. पराभवानंतर सुरू झालेल्या पळाच्या वर्णनात आलेली ही काही वाक्येच पाहा ना! धरण फुटलेसारखे जाहाले; कोणीकडे पळायाचे सुचेनासे जाहाले, दिशाभूल जाहाली; अवसानरहित होते ते (छकड्यागाड्यांसकट) खंदकात पडले; जीव द्यावा त्यापेक्षा जितरब गेले तरी उत्तम, म्हणोन घोडी सोडली; तांब्या घ्यावयास आनकूल पडेना, तेथे हांडेवासने कोण घेतो; रांडापोरे लष्करास ओढाओढ करू लागले; हजारोहजार मनुष्य, थोरथोर नागवेउघडे, केवळ भिकारी, भीक मागत, अन्नरहित, वस्त्ररहित, कळाहीन, चीलची भाजी खात आले...या वाक्यांतून पळणाऱ्यांची भयग्रस्त, केविलवाणी अवस्था, दुर्दशा कशी झरकन कळून जाते! युद्धाचे हे भीषण-करुण पर्यवसान होण्यापूर्वी पानपतावर उहुळलेला क्रोध, वखवखलेला क्रूरपणा आणि दुर्दशेचा फेरा सुरू झाल्यावर पडलेली अशुभ छाया, या छायेत जाणवणारी जीवनातली जीवघेणी पोकळी, अस्तित्वाची निरर्थकता हे सारे, कुतुबशहाचा वध किंवा बळवंतराव मेहेंदळ्यांच्या पत्नीचे सहगमन यांसारख्या अनेक, विविध भावसंमिश्र प्रसंगांच्या चित्रणातून कसे सरकन अभ्यंतरात शिरते! बखरकाराने काढलेले पानिपताचे चित्र हे इतके प्रभावी आहे.

या प्रभावाचे मूळ चित्रणातील विविधतेत किंवा विस्तृतपणात नसून भेदकपणात व नेमकेपणात आहे. पानिपताचे चित्रण म्हणजे निव्वळ बंदुकातोफांच्या धडाक्यांचे किंवा हत्तीघोड्यांच्या आदळाआदळीचे चित्रण नाहीं, तर शेवटी ते भावक्षुब्ध माणसांच्या झुंजांचे, झुंजांचे रंग फिरविणाऱ्या भिन्न मनोवृत्तींच्या विचित्र लीलेचे चित्रण आहे, याची जाणीव बखरकाराला असली पाहिजे. त्याशिवाय दृष्टिगोचर वास्तवाच्या प्रत्यक्षनिष्ठ चित्रणापलीकडे, मनोगम्य वास्तवाच्या खोल चित्रणापर्यंत त्याची मजल जाती ना! अंतर्दर्शी कल्पक सहानुभूतीचे (इमॅजिनेटिव्ह सिंपथीचे) बळ असल्यामुळेच बखरकाराला असे चित्रण साधलेले असले पाहिजे हे उघड आहे. केवळ स्वकाळाशी समरस होण्याचीच शक्ती त्याच्या जवळ असती तर शाहिरी चित्रणासारखेच 'वरिवरि वीररसें ओलें' चित्रण त्याच्या हातून झाले असते. पण कोणत्याही घटनेत, प्रसंगात अलिप्तपणे तल्लीन होण्याची क्षमता त्याच्या ठायी असल्यामुळेच पानिपताचे भेदक, नेमके प्रभावी चित्रण त्याला साधलेले आहे.

पानिपत ज्या व्यक्तींमुळे घडले आणि ते घडत असताना ज्या व्यक्ती त्यात गुरफटल्या गेल्या, त्या व्यक्तींचे चित्रणही बखरकाराने केलेले आहे. या व्यक्तींत धीरोदात्त व्यक्ती आहेत, तशा कावेबाज-बिलंदर व्यक्ती आहेत; आणि त्यांचे चित्रण हे गुणांचे आहे, तसे अवगुणांचे आहे. भाऊसाहेब, जनकोजी, सुरजमल, मल्हारराव, सुजाउद्दौला, नजीबखान इ. व्यक्तिचित्रे पाहिली तर असे दिसते की दोन धीरोदात्त व्यक्तींतला किंवा दोन कावेबाज व्यक्तींतला फरकही बखरकाराने बरोबर टिपलेला आहे. आणि धीरोदात्त व्यक्तींतले दोष व बिलंदर व्यक्तींतले गुण त्याने हेरून चित्रित केलेले आहेत. भिन्न पक्षांतल्या व्यक्तींचे, विविध मनोरचनांचे घडवता आले तेवढे संमिश्र व सूक्ष्म दर्शन बखरकाराने घडवलेले आहे. असे दर्शन घडवताना मानवी स्वभावातल्या व्यामिश्रतेची

जाणीव त्याला होती असे ठासून म्हणणे अवघड आहे. पण हे दर्शन त्याने अलिप्तपणाने घडवलेले आहे हे निर्विवाद ! व्यक्तिचित्रण करताना विशिष्ट व्यक्तीचा पक्ष बखरकाराने घेतलेला आहे असे म्हणण्यापेक्षा, शक्यतो पक्षातीत दृष्टी त्याने ठेवलेली आहे असे म्हणणे हेच वस्तुस्थितीला जास्त धरून होईल. आणि जे निःपक्षपाती चित्रण त्याने केलेले आहे ते राजकीय न्यायबुद्धीमुळे असे निदान करण्यापेक्षा, मानवी नमुन्यात वाटणाऱ्या रसामुळे असे अनुमान करणे हेच अधिक समुचित ठरेल.

बखरकाराने व्यक्तिचित्रण भेदकपणाने व नेमकेपणाने केलेले आहे हे तर खरेच ! पण मुख्य म्हणजे ते त्याने थोडक्यात आणि तरीही मर्मस्पर्शी रीतीने केलेले आहे. घटनाप्रसंगचित्रणातून पानिपताचे समग्र चित्र आपल्याला उभे करावयाचे आहे हे बखरकाराच्या अंतर्मनात तरी पक्के असले पाहिजे; म्हणूनच सुटीसुटी, विस्तृत चित्रे रंगवण्याच्या नादाला तो लागलेला नाही, तर चित्रण-विवेक जागा ठेवून त्याने आटोपशीर, जोरकस रेखाटनेच तेवढी केलेली आहेत. या रेखाटनांचा रोख शेवटी पानिपताकडे असल्यामुळे घटनावर्णनाचा किंवा प्रसंगचित्रणाचा ओघ कोठेही खंडित झालेला नाही. अशा प्रकारे रोख ठेवताना, असे असे स्वभाव होते म्हणून अमुक अमुक घटना तशातशा घडल्या हा कार्यकारणभाव बखरकाराच्या मनात असेलच असे निश्चयाने म्हणता येणे कठीण आहे. पण त्याने व्यक्तिचित्रण आपल्या उद्दिष्टपूर्तीच्या दृष्टीने विघातक होऊ दिलेले नाही एवढे निश्चित !

स्वभाव > घटना–असा कार्यकारणभाव बखरकाराच्या मनात असो–नसो, त्याने जाता जाता भाष्यवजा विधानांतून पानिपतावरच्या पराभवाची कारणे सूचित केलेली आहेत. मराठ्यांच्यामधला भोळसटपणा, एकजुटीचा अभाव, उतावळेपणा, हेकटपणा ... यामुळे त्यांचे उत्तरेतले राजकारण विघडले आणि म्हणून तिकडे नजीबचे प्राबल्य झाले व अबदालीला भक्कम पाऊल टाकता आले. सर्वत्र मंडळी नूतन, वय नव्या उमेदीचे, पोच नाही, पावले चुकीची, विनाकारण सबुरी, संघटितपणे राहणे नाही, युद्धरीत भलतीच ... यांमुळे भाऊसाहेब बलदंड असूनही पराभूत झाले. आधी राजकारण कौशल्याने, सावधगिरीने हाताळले गेले नाही आणि नंतरचे युद्ध नीट, तडफेने, जुटीने खेळले गेले नाही, हा बखरकाराने केलेल्या पराभवाच्या मीमांसेचा आशय आहे. आधुनिक इतिहासपंडितांनी केलेल्या मीमांसेच्या आशयाशी तो जुळतो मिळतो हे विशेष उल्लेखनीय ! मराठ्यांचा पुनंस्कृतपणा त्यांना भोवला हा अलीकडच्या इतिहासविमर्शकाचा अभिप्राय मूलगामी असेल तर बखरकाराने मराठ्यांच्या राष्ट्रीय स्वभावावर ( ' नॅशनल कॅरॅक्टरवर ' ) जाता जाता केलेली टीकादेखील मूलगामीच म्हणावी लागेल. क्षत्रियधर्माचा कडवा अभिमान, त्यालाही धक्का लागावा इतक्या टोकाला गेलेली परंपरागत रूढ धर्मावरची श्रद्धा, शेवटी जीवित तृणवत मानून इरेस पडण्याची वृत्ती, पाठीशी स्वामी असेल तोवर पराक्रम करण्याची तयारी ( म्हणजे महाराष्ट्रधर्माचा अभाव ? ) नाहीतर सशासारखा पळ काढण्याची चाल, क्रौर्य न मानवणारे, कच्चे मोमदिल ( मेणाचे मन )... यावरील बखरकाराची टीका ही पराभवाच्या कारणांच्या कारणापर्यंत म्हणजे खोल मुळापर्यंत जाणारी वाटते. कदाचित ती जाणीवपूर्वक नसेलही ! पण इतर बखरींत नेणिवेतली टीकाही प्रायः नाही, म्हणून ' भाऊसाहेबांच्या बखरी ' मधली टीका कौतुकास्पदच वाटते.

मराठ्यांच्या इतिहासातल्या एका अविस्मरणीय घटनेचे चित्रण करताना एका बाजूने राष्ट्रीय स्वभावापर्यंत बखरकार गेलेला आहे, तर दुसऱ्या बाजूने त्रिकालाबाधित मानवी मनापर्यंत तो पोहोचलेला आहे. ' जागेपणीच्या सपना' सारख्या भासणाऱ्या, गोंधळात टाकणाऱ्या मनाचे दर्शन बखरकाराने विस्मयकारक रीतीने घडवलेले आहे. शिवाजी खराडा बापासाठी घोड्यावरून खाली येतो, तर गोविंदराव बुंदेल्यांचा पुत्र बापाला टाकून पळ काढतो. खंडेराव निंबाळकर जखमी बळवंतराव मेहेंदळ्यावर आपल्या देहाचे पांघरूण घालतो, तर सोनजी भापकर भाऊसाहेबांना सोडून पळणाऱ्या लोकांस परत फिरवण्यासाठी जातात ते तिकडेच जातात. पठाणास पाझर फुटतो, तर जनकोजीचे पाठीराखे त्याला पाणीही देत नाहीत. आमिष पाहूनही इब्राहिमखान गारदी फितूर होत नाही, तर पैशासाठी रजपूत शिंद्यांचे मारेकरी होतात. नात्यांचे पाश चिवट असतात, पण प्रसंगी ते तुटतातही. धन्यासाठी प्राण ओवाळून टाकले जातात, पण कधी प्राण वाचवण्यासाठी पळही काढला जातो. एखाद्या वेळी पाषाणहृदयीदेखील द्रवतो, पण सगेसोयरे फत्तराहून फत्तर होतात. दिल्या शब्दाचे मोल जिवापेक्षा जास्त मानले जाते, पण

एखाद्या क्षणी पैशासाठी दुसऱ्याच्या जिवावर उठावेसे वाटते. बखरकाराने घडवलेले गूढ मानवी मनाचे दर्शन हे असे आहे.

गूढ मनाप्रमाणेच विचित्र, अनाकलनीय जीवनावरही अधूनमधून त्याने प्रकाशझोत टाकलेला आहे. शिंद्यांचा तेरावा होता, तो तेच दिवशी भागीरथीबाई प्रसूत झाली; दुःख एकीकडे ठेवून साखरा वाटल्या.... ज्या आईवर रुसावयाचे तीच सोडून चालली म्हणून ईश्वरावर रुसण्याचा प्रसंग छोट्या आप्पा बळवंतावर ओढवला...जीवनाची कूटात्मकता बखरकाराने अशा रीतीने प्रकाशित केलेली आहे जीवनाच्या कोड्याप्रमाणेच पानिपताच्या भवितव्याची काळोखी दारेही त्याने जाताजाता किलकिली करून ठेवलेली आहेत. भागीरथीबाईस असे जाहले की आजच भगवंते आपली तोडातोड केली... गोपिकाबाईस वाटले की बाळ आजच आपणांस अंतरले. सर्वत्रांचे मायाजाळ सारखेच! पुढे होणारे भवितव्य विचित्र!...जात्यातील रडती, सुपातील हसती. शेवटी साऱ्यांची गत एकच आहे...ईश्वरे आम्हांस ओढून आणले आहे. एवढ्यावरच मुक्तता नाही. अजूनही महा अनर्थ आहे. ईश्वर पार पाडील तर बरे! नाहीतर रडे लागलेच आहे....अशा स्वतःच्या किंवा इतरांच्या उद्गारांतून पहिल्यापासून चुकचुकणारे दुर्दैव, वैऱ्याच्याही येणार नाही असे मनात डोकावलेले अशुभ, भावी संहाराचे आतून जाणवलेले दुश्चिन्ह, विनाशाचा अटळपणा हे सारे बखरकाराने सहजगत्या ध्वनित केलेले आहे. शेक्सपिअरच्या ट्रॅजेडीज्मधून निघणाऱ्या सोफोक्लिअन ध्वनींसारखे हे ध्वनी भयंकर सूचक आहेत.

लवलवत्या रेखांच्या मिश्रणातून तयार झालेले पानपताचे चित्र पाहताना हे सूचक ध्वनी ऐकू आले म्हणजे महाकाव्याच्या प्रांगणात आपला प्रवेश झालेला आहे असेच वाटते. पानपतावर मराठे व गिलचे यांची 'सुकृते युद्धाच्या ताजव्यात' कशी तोलली गेली, 'प्यादेमात' कशी झाली, 'भाऊगर्दी' होऊन पूर्वी कधी मोडले नव्हते असे मराठे कसे 'मोडले' या साऱ्यांचे पल्लेदार कथन करीत करीत बखरकाराने पानपतावर आंदोळलेल्या जीवनाचे जे अंतर्वेधी चित्र काढलेले आहे ते खरोखरच महाकाव्यात किंवा महाकाव्यसदृश 'पॅनोरमिक' कादंबरीत पाहावयास मिळावे अशाच तोडीचे आहे. 'महाभारत' किंवा 'वॉर अँड पीस' यातल्या एखाद्या पर्वाची किंवा प्रकरणाची आठवण व्हावीच व्हावी असे या बखरीचे स्वरूप नक्कीच आहे. राष्ट्रीय महत्त्वाची (हिस्टॉरिक) घटना, तिच्या पर्यवसानाच्या मीमांसेत अंतर्भूत असलेले युगधर्माचे– किमान 'मराठी' मनोधर्माचे– विश्लेषण, मृत्यूच्या महाछायेत झालेल्या मानवी हालचाली, त्यांचे भेदकपणाने केलेले खोल तलस्पर्शी चित्रण, उफाळून येणाऱ्या रसांची गंभीर अभिव्यक्ती, प्राणवान–गरिमामयी शैलीतला सुढाळपणा, इतिहासाच्या व जीवनाच्या गाभ्याला भिडण्याचे सामर्थ्य या सगळ्यांतून 'भाऊसाहेबांच्या बखरी'चे सौंदर्य निर्माण झालेले आहे·...अशी ही महाकाव्योपम, सौंदर्यसंपन्न बखर स्वयंसिद्ध मोठी आहेच; पण पानिपतविषयक इतर बखरींच्या तुलनेनेही ती वरचढच आहे. एकूण बखरींमध्येदेखील तिचे स्थान वरचे आहे; एवढेच नव्हे तर श्रेष्ठ (मराठी) वाङ्मयातही लक्षवेधक ठरावे इतके ते उंच आहे.

* * *

प्रारंभी सूचित केल्याप्रमाणे, बखरींचे वाङ्मयीन आकलन कसे करून घेता येईल, त्यासाठी कोणकोणते मार्ग चोखाळावयास हवेत, कोणकोणत्या पद्धतींचा अवलंब करावयास हवा, हे चांगले स्पष्ट व्हावे यासाठी तीन बखरींचे (संपूर्ण, सोदाहरण रसग्रहण न करता) आवश्यक तेवढे स्वरूपदर्शन घडवलेले आहे. ... बखर म्हणजे 'घटिता'चे सजीव प्रत्यक्षीकरण, जिवंत चित्र असे म्हटले तरी पुन्हा एक प्रश्न उरतोच. सर्व बखरी म्हणजे 'घटित-चित्रे' खरी! पण ही चित्रे पाहताना अनुभव असा येतो की एखादे चित्र मुळीच लक्ष वेधून घेत नाही, तर एखादे चित्र खिळवून टाकते. हे असे का होते? 'घटिता'कडे पाहण्याचा बखरकाराचा दृष्टिकोण, 'घटिता'च्या रूपाची त्याला असलेली जाण, 'घटित' सजीव करण्याच्या बाबतीतला त्याचा उत्साह, 'घटिता'चे चित्र तयार करताना त्याने काढलेल्या सरल-वक्र रेषा व वापरलेले फिके-गडद रंग, रेषारंगांतून त्याने साधलेली चढती-उतरती किंवा साद्यन्त सम अशी खुलावट, या खुलावटीचे नेमके रहस्य, या साऱ्यांच्या मुळाशी असणाऱ्या त्याच्या वृत्ती, या वृत्तीस कारण होणारा त्याचा पिंड... इत्यादी गोष्टींचे अवधान ठेवले तरच बखरीबखरीत तरतमभाव का, एखादी बखर बखरवाङ्मयातच नव्हे तर एकूण वाङ्मयातही मोठी का ठरते, हे प्रश्न सोडवता येण्याची शक्यता! हे प्रश्न सचले व

सोडवावेसे वाटले तरच त्या त्या बखरीचा पृथक्करणात्मक आस्वाद--अर्थात तिच्या मनावर होणाऱ्या 'संकलित संस्कारा'च्या संदर्भातच--घ्यावा असे मनात येण्याचा संभव! आणि असा आस्वाद घेता आला तरच बखरींचे स्वरूपदर्शन घडून त्यांचे सूक्ष्म वाङ्मयीन आकलन पुरेसे होण्याची खात्री!... बखरी ऐतिहासिक पत्रांइतक्या अस्सल व सत्याशी लगट करणाऱ्या नसतात आणि शाहिरी कवनांसारख्या स्थूल व क्षणैक-रंजनात रमणाऱ्या नसतात हे समजले तरीदेखील त्यांचे सूक्ष्म आकलन होईलच असे नाही. अजून तसे फारसे व पुरेसे झालेले नाही; म्हणून ते कसे करून घ्यावे याचे दिग्दर्शन या लेखात केले आहे.

यादवकालीन राजप्रशस्तिपर लेखांपेक्षा किंवा महानुभावीय गद्यापेक्षा बखरगद्याचे स्वरूप खूपच वेगळे आहे. धर्मसंप्रदायांच्या तत्त्वज्ञानातील बदल व वाङ्मयीन वातावरणातील पालट यामुळेच मुख्यतः ते वेगळे झालेले आहे. या वेगळेपणाचे व त्याला कारण झालेल्या परिवर्तनाचे विवेचनही अजून व्हावे तसे झालेले नाही; म्हणून तेही करण्याची नितान्त आवश्यकता आहे. पण एक तर हा स्वतंत्र लेखाचा विषय! आणि दुसरे म्हणजे बखरवाङ्मयाला विशिष्ट स्वरूप का आले आहे किंवा ते आधीच्या लेखांच्या-गद्याच्या स्वरूपाहून वेगळे का झाले आहे या प्रश्नाच्या विवेचनाआधी, असलेल्या स्वरूपाचे आकलन होणे अगत्याचे! एवढ्यासाठीच ते कसे करून घेता येईल याची दिशा या लेखात दाखवली आहे. ही एकच दिशा आहे असा दावा नाही किंवा नमुन्यादाखल तीन बखरींचे जे स्वरूपदर्शन घडवले आहे तेच अंतिम, निर्णायक मानले जावे असा दुराग्रह नाही. पण वाङ्मयाच्या अभ्यासकांनी बखरींचे सूक्ष्म वाङ्मयीन आकलनच करून घेतले पाहिजे एवढा आग्रह मात्र जरूर आहे.

• • •

## साभार-स्वीकार

**ज्ञानदेवी : नववा अध्याय**--अरविंद मंगरूळकर व वि. मो. केळकर, १७५८ सदाशिव, पुणे २; १५ रु.

**विवेकवाद**--नी. र. वऱ्हाडपांडे, डी. एच. क्यू. पी. ओ. नवी दिल्ली ११.

**समीक्षाः हरीभाऊंच्या कादंबरीतील व्यक्ती**--उषा हस्तक, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३४; ३ रु.

**षड्जगांधार**--(संगीत विषयक लेख) कृ. द. दीक्षित, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; २० रु.

**चंबळेच्या पलीकडे** (ऐति. कादं.)--स. शं. देसाई, विदर्भ-मराठवाडा बुक कं. पुणे २; १५ रु.

**त्रिशंकू** (कादं.)--चिं. त्र्यं. खानोलकर, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ११ रु.

**सूर्य** (कथा)--श्री. दा. पालवणकर, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ७॥ रु.

**पाडस** (कादं. अनुवाद)--राम पटवर्धन, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ११ रु.

# श्री. कैलासम् यांचे इंग्रजी वाङ्मय

● गणेश चिंतामण वझे ●

( १ )

श्री. कैलासम् ह्यांच्या जीवनातला विरोधाभास, त्यांच्या वाङ्मयविषयक कामगिरीतही प्रकर्षाने दिसून येतो. मूळचे तामिळ असूनही ते अर्वाचीन कन्नड रंगभूमीचे नाट्याचार्य म्हणून मान्यता पावले. एवढेच नव्हे तर इंग्रजीत नाटके रचण्यात त्यांनी आपली लेखणी--नव्हे वाणी--झिजविली. ह्या दोन्ही भाषांतील त्यांच्या साहित्य-सेवेचा विचार करता त्यांत साम्यापेक्षा विरोधच अधिक आढळतो. त्यांची सामाजिक नाटके तेवढी कन्नड भाषेत तर पौराणिक इंग्रजीमध्ये आहेत. विषयांच्या बाबतीतच नव्हे तर 'प्रकृति'ने सुद्धा ती अगदी भिन्न-किंबहुना परस्परविरोधी वाटतात! त्यांची सामाजिक नाटके हास्यरसपरिपूर्ण तर त्यांच्या पौराणिक नाट्यकृती विनोदाचे वावडे असणाऱ्या गंभीर भीषण शोकान्तिका आहेत. त्या त्या विषयांच्या स्वभावानुसार भाषा-पद्धतीतही त्यांनी अनुकूल फरक केलेला आढळतो. इंग्रजी नाटकांत-ती मुख्यतः इंग्रजी जाणणाऱ्या भारतीयांसाठीच लिहिलेली असल्याने व भारतीय तत्त्वज्ञानातील पारिभाषिक संज्ञा इंग्रजीत नेमक्या व्यक्त करणे कठीणही असल्याने, काही संस्कृत शब्द त्यांनी जसेच्या तसे वापरले आहेत.. याच्या उलट, त्यांच्या कन्नड नाटकांत म्हैसूरमधील तत्कालीन सुशिक्षितांची भाषा इंग्रजीने अतिशय प्रभावित झालेली असल्याने, वास्तवदर्शनासाठी-इंग्रजी वाक्यांनी आणि वाक्प्रचारांनी त्यांचे कन्नड संवाद लिडबिडलेले आहेत. त्यामुळे उभय भाषांतील नाटकांच्या भाषेत अपरिहार्यपणे 'संकर' झाला आहे. ह्या अर्वाचीन कन्नड नाट्याचार्यांच्या कन्नड कृतीपेक्षा त्यांची इंग्रजी नाटके अधिक सरस आहेत असे *जाणत्यांचे मत आहे.

कैलासम् यांचे केवळ खालील इंग्रजी नाट्यग्रंथ उपलब्ध आहेत.

( 1 ) Purpose—A drama.

( 2 ) Little lays and plays ( Collection of poems and two one-act plays.

( 3 ) The Brahmin's Curse ( Karna )—A drama.

( 4 ) Keechaka—A drama.

महाभारतातील 'एकलव्य', 'कर्ण', 'कीचक' यांच्यावरील त्यांची नाटके, एकलव्याने, कर्णाने व कीचकाने कोणत्या स्थितीत मृत्यूला मिठी घातली याचे दिग्दर्शन करतात. 'Burden' ह्या एकाच एकांकिकेत दशरथाच्याच्या मृत्यूची वार्ता भरताला कळल्यानंतर त्याच्या मनांत उसळलेला आगडोंब आणि कैकेयी-विषयीची त्याची प्रतिक्रिया यांचे दर्शन घडते. कैकेयीवर लिहिलेली कैलासम् यांची इंग्रजी कविता त्या विषयावर आणखी प्रकाश टाकते. वास्तविक एक भरत सोडला तर या बाकीच्या व्यक्ती 'उपेक्षित' किंवा 'अधिक्षेपित' आहेत. पण कैलासम्नी आपल्या समर्थ लेखणीने त्या व्यक्तींचे उदात्त मनोहर चित्र बहुजनसमाजाच्या पूर्वापार चालत आलेल्या समजुतीविरुद्ध असताही रंगविले आहे; एवढेच नव्हे तर ज्या कुशलपणे लोकांच्या गळी ते उतरविले आहे, ते पाहता 'पंचरात्र', ऊरुभंग' लिहून दुर्योधनाला उचलून धरणाऱ्या प्रतिभावंत भासाची आठवण व्हावी! मात्र 'उपेक्षित' वा 'अधिक्षेपित' थोर व्यक्तींची केवळ बाजू मांडावी म्हणून कैलासम्नी ती नाटके लिहिली आहेत असा समज करून घेणे चुकीचे होईल. महाभारतातील विविध व्यक्ती त्यांच्या मनांत घर करून राहात, त्या कोणत्या ना कोणत्या गुणाचे व भावनेचे मूर्तिमंत मानवी रूप म्हणून, असे त्यांच्या उपलब्ध नाटकांचे अभ्यासावरून दिसून येते. त्यांच्या वाऱ्यावर उडून गेलेल्या अथवा संकल्पिलेल्या नाटकांच्या नावांवरूनही कैलासम् यांच्या मनात कोणकोणत्या व्यक्तींनी कोणकोणत्या गुणाचे वा भावनेचे रूप घेतले होते, याची कल्पना येते. त्यांपैकी काही नावे अशी--

( १ ) Expiation प्रायश्चित्त-श्रीकृष्णाचे महाप्रस्थान. त्यांनी केलेल्या एका अन्यायाचे 'प्रायश्चित्त' होते हे त्यात ते दाखविणार होते.

* कन्नडद्हास – कैलासम्.

( २ ) The Fear—मार्कंडेय.
( ३ ) The Torture–हरिश्चंद्र–हिंसा.
( ४ ) The vow–द्रोण-द्रुपद.
( ५ ) The Remorse–राम.
( ६ ) Abnegation–भीम.
( ७ ) त्रिशंकु–( ? )

'प्रायश्चित्त' नाटकातील घटनांची कल्पना विशद करणारे आणि 'त्रिशंकु' नाटकाची मध्यवर्ती कल्पना सांगणारे असे दोन लेख कन्नडमध्ये समीक्षकांनी लिहिले आहेत.

याशिवाय आणखी काही संकल्पित नाटकांची नावे उपलब्ध आहेत. त्यावरून आणखी कोणते विषय त्यांच्या मनात घोळत होते हे कळून येते.

( 1 ) The house of Wodeyars
( 2 ) Matadhipati
( 3 ) The Passing of Radha
( 4 ) Bheeshma
( 5 ) Renuka

एकलव्याच्या सुपरिचित अंगुष्ठदानाच्या कथाभागावर आधारलेली Purpose आणि श्रीकृष्णांनी केलेल्या एकलव्यवधावरील Fulfilment ही एकांकिका उपलब्ध आहे. एकलव्यवधाचे परिणाम दाखविणारे 'Expiation' नावाचे तिसरे एक नाटक ते लिहिणार होते असे त्याच्या कथानकाची मध्यवर्ती कल्पना सांगून एका थोर समीक्षकांनी आपल्या लेखात नमूद केलें आहे,* त्यावरून दिसून येते.

'एकलव्या' वरचे पहिले दोन अंकी नाटक 'Purpose' हे लिहिताना कैलासम्नी मूळ आख्यानातील तपशीलात काही बदल केले आहेत.

* कैलासम् यांचा एकलव्य-डॉ. सर सी आर. रेड्डी. पण ते नाटक लिहून झाले नसावे. त्यापैकी Purpose चा मराठी अनुवाद 'प्रयोजन' या नावाने. श्री. के. नारायण काळे यांनी केला असून त्याला कविवर्य श्री. द. रा. बेंद्रे यांची प्रस्तावना आहे. तसेच २१ जून १९६२ रोजी नभोनाट्याच्या अखिल भारतीय कार्यक्रमात, श्री. शं. वा. शास्त्री यानी केलेल्या अनुवादाच्या आधारे त्याचा प्रयोगही नभोवाणीवर सादर करण्यात आला होता.

( १ ) मूळ महाभारताप्रमाणे एकलव्य निषाद होता म्हणून नव्हे, किंवा तो सर्वश्रेष्ठ धनुर्धर होईल याची भीती वाटली नव्हे, तर सम्राटांच्या नातवांना, शिक्षण दिल्याशिवाय कोणाला शिष्य म्हणून पत्करणार नाही, असे वचन द्रोणाचार्यांनी भीष्मांना दिलेले असल्याने त्यांनी नाइलाजाने किंबहुना दुःखित अंतःकरणाने, एकलव्याला नकार दिला.

( २ ) एके दिवशी द्रोण आणि अर्जुन अरण्यातल्या वाटेने बोलत चालले असता, लांबवर, एक लांडगा आणि त्याचा पाठलाग करीत चाललेला एक धनुर्धर अशी जोडी ते पाहतात. नंतर त्यांना त्या लांडग्याच्या मस्तकाच्या खालच्या भागात एकामागून एक असे निदान शंभर तरी बाण अवघ्या तीस पावलांच्या मजलीत मारलेले, व त्यामुळे त्याचा मेंदू अगदी करवतून काढल्यासारखा दिसतो. द्रोण ते हस्तलाघव पाहून थक्क होतात आणि तो धनुर्धर अर्जुनाच्याच काय पण स्वतःच्याही फार पुढे गेलेला असला पाहिजे, असे बोलून दाखवितात. अशा महाधनुर्धराला एकाच बाणात त्या लांडग्याला ठार मारता आले असते, पण त्या लांडग्याबद्दल त्याला भयंकर चीड वाटत असली पाहिजे म्हणून हाल हाल करून ठार मारण्याची ती क्रूर पद्धत त्याने अवलंबिली असली पाहिजे असे अनुमानही ते व्यक्त करतात. आणि एका झाडाच्या आड निरीक्षण करण्यासाठी उभयता उभे असता, त्यांना त्या धनुर्धराचे लांडग्याला उद्देशून काढलेले उद्गार ऐकायला मिळतात. 'मार'! अशाच किंकाळ्या मार हिंस्त्र श्वापदा! शरीरात असेल नसेल ती सारी शक्ती खर्च करून, मारवतील तितक्या जोराने किंकाळ्या मार! वेदना असह्य होऊन तू मारलेल्या त्या किंकाळ्यांनी काल दुपारभर तू ज्याची लांडगेतोड केलीस त्या गरीब बिचाऱ्या पाडसांच्या अंतःकाळच्या आरोळ्यांची तुला नुसती आठवण झाली तरी आपल्या ह्या यातनांतून मुक्त होण्यासाठी पुरेसे दुःख तू भोगलेस असे मी समजेन!' ( मूळ महाभारतात, लांडग्यांच्या ऐवजी भुंकणाऱ्या कुत्र्याच्या तोंडांत अस्त्रविद्येतील कौशल्य दाखविण्यासाठी एकलव्याने एकदम सात बाण मारले, त्या वेळी द्रोण हजर असत नाहीत आणि एकलव्याने वर उद्धृत केलेले उद्गारही नाहीत. )

( ३ ) एकलव्याला धनुर्विद्या संपादिण्यात द्रोणाचार्य पुतळ्याच्या रूपाने अप्रत्यक्षरीत्या का होईना, कारणीभूत

झालेले पाहून, असूयाग्रस्त अर्जुन त्यांना वचनभंगा-बद्दल छेडतो. असत्य वक्ता म्हणून लोकांनी नाके मुरडा-वीत अशी अपकीर्ती द्रोणाचार्यांच्या कपाळी येणार व सर्वश्रेष्ठ धनुर्धर म्हणून वैयक्तिक कीर्ती मिळवावी येवढेच आणि म्हणून निकृष्ट उद्दिष्ट अर्जुनाचे असल्याने पुढेही एकलव्याला तो मागे टाकू शकणार नाही; हे द्रोणाचे बोलणे ऐकून द्रोणभक्त एकलव्य आपला अंगठा आपणहून तोडून देऊन, आगातिक द्रोणांची मानहानीच्या प्रसंगातून सुटका करतो. (मुळात सर्वश्रेष्ठ धनुर्धर करण्याचे अर्जुनाला दिलेले वचन पाळण्यासाठी, द्रोणाचार्य एकलव्याकडे जाऊन गुरुदक्षिणा म्हणून त्याच्या उजव्या हाताचा अंगठा मागतात हे सर्वश्रुतच आहे).

कैलासम् यांचा 'एकलव्य' हा असा उदारचरित दिसतो. धनुर्विद्या आत्मसात करण्याच्या त्याच्या दुर्दम्य प्रेरणेचा आणि एकमेवाद्वितीयम् अशा त्याच्या साधनेच्या दिव्यशक्तीचा उगम त्याच्या कुसुमकोमल स्वभावातच होता, असे कैलासम्‌नी दाखविले आहे. जन्माने निषाद असूनही, गोरगरिबांची लूटमार करण्यासाठी किंवा निष्पाप प्राण्यांची हत्या करण्यासाठी धनुर्विद्येचा उपयोग कर-ण्याची त्याची इच्छा नव्हती. तो आणि त्याची आई अर-ण्यात राहात असल्याने, तेथे पक्षी, हरणे, पाडसे, इत्यादींचा तुटवडा नव्हता. तरीही मृगयेवर उपजीविका न करता ती उभयता केवळ धान्य, दूध, कंदमुळे यांवर गुजराण करीत असत!

निषादांचा राजा-महाराजा-सम्राट-हिरण्यधनूंचा हा मुलगा. वडील धर्मयुद्धात-पतन पावल्यानंतर, आपल्या आईसमवेत अशा तऱ्हेने कालक्रमणा करीत असताना, लांडग्याच्या भयाने अहोरात्र थरथरणाऱ्या व त्यामुळे बाहेर पडण्याचा धीर न झाल्याने, दिवसच्या-दिवस चाऱ्याच्या अभावी उपासमार सहन करीत असलेल्या आणि तहानेने व्याकुल होणाऱ्या हरिणशावकांची अनुकम्पनीय अवस्था तो पाहतो. एवढेच नव्हे तर रात्री काळोखाचा फायदा घेऊन लांडगे त्या पाडसांच्या कळपावर हल्ला चढवीत आणि त्यांची कच्ची बच्ची पळवून नेत, तेव्हा त्यांच्या मरणकाळच्या किंकाळ्या आणि त्यांच्या मातांचे दीन असहाय आर्त आक्रोश ऐकून, एकलव्य आणि त्याची आई बेचैन होऊन रात्रभर तळमळत!*

जवळच्या अरण्यात एका ऋषीच्या आश्रमात आणि केवळ आश्रमाच्या परिसरातच प्रभावी ठरणाऱ्या त्याच्या तपोवलाने लांडगे आणि पाडसे गुण्यागोविंदाने राहात असलेली पाहून लहानग्या एकलव्याला आपल्या वनातल्या पाडसाची लांडग्याच्या त्रासापासून सुटका करण्यासाठी आपणही तपोवल मिळवावे असे वाटू लागते. त्याबद्दल आपल्या आईला त्याने विचारता, "तुला नाही मिळविता यायचे ते या जन्मी, कारण तू जन्माने निषाद आहेस, पण जर तू या जन्मी जातिधर्मानुसार वागलास, तर पुढे केव्हा तरी आर्यकुलात तुला जन्म मिळेल आणि मग तुला त्या ऋषीसारखे तप करता येईल.' असे सांगून आपल्या धर्मानुसार लांडग्यांना ठार मारून पाडसाचे रक्षण करण्यात पुण्यच लागेल असा 'रक्षायोग' ही तिने त्याला सांगितला. तो 'योग' आचरण्यासाठी जगातला सर्वश्रेष्ठ धनुर्धर होण्याचा तो निश्चय करतो. धनुर्विद्या शिकण्याचा उत्तम उद्देश म्हणजे स्वतःला यत्किंचितही लाभ नसला तरी इतरांना आपल्या परिश्रमाचा फायदा मिळावा अशी एकमेव इच्छा धरणे ('कर्मणा परार्थः') असे विवेचन 'द्रोणाचार्यांनी' या नाटकात केले आहे, त्याचे मूर्तिमंत प्रतीक एकलव्य होता.

वरे, लांडग्यांची हिंसासुद्धा अनिर्वाहपक्ष म्हणूनच तो करणार होता! कारण लांडग्यांना मृत्युमुखात लोटणे म्हणजे ज्यांनी कोणाचे काही वाकडे केले नसेल अशा त्यांच्या कच्च्याबच्च्यांना पोरके करणेच होते, अशी त्याची धारणा होती. तसेच त्याच्या थोर आईची शिकवण ग्रहण करण्याची आणि त्यांतील मर्म जाणण्याची बुद्धिमत्ताही त्याच्यापाशी होती. द्रोणाचार्यांनी त्याला शिष्य म्हणून पत्करण्याची असमर्थता व्यक्त केली, तेव्हा शक्य असते तर त्याला अंतःकरणपूर्वक शिकविण्याची आपली तयारी होती, अशी कबुली एकलव्याने त्यांच्याकडून चतुराईने वदवून घेतली.

साधनेच्या प्राथमिक भूमिकेची प्रभुता, एकाग्र होण्याची शक्ती, गुरुबद्दलचे गाढ प्रेम हे सारे त्याच्यापाशी होतेच. गुरूची शिष्याला शिकवायची मनापासूनची इच्छा ही एक आवश्यक गोष्ट मिळविल्यानंतर, गुरूचा मातीचा पुतळा तयार करून तो आपल्या साधनेची सुरुवात करतो.

गुरुप्रेमाच्या जोरावर **प्रार्थनामार्गाने** म्हणजेच आत्म-बलाने धनुर्विद्येची अशी साधना करणारा, सरळ हृदयाचा एकलव्य आपल्या अरण्यातील सर्व लांडग्यांचा संहार

* महाभारतात 'मृगभयस्वप्न' या प्रकरणात धर्म-राजाच्या स्वप्नात शिकारीमुळे नष्ट होत चाललेली जनावरे येऊन काकुळतीने संहार थांबविण्याची विनंती करतात, त्याची आठवण होते.

करून, सर्व पाडसांची पीडा आणि मृत्यूच्या भीतीतून कायमची मुक्तता करण्याचे आपले ध्येय गाठण्याच्या समीप आला असताना, स्वतःच्या गुरूवर, अर्जुनाला दिलेल्या वचनाचा भंग झाल्याने साऱ्या जगाच्या कुचेष्टेचा विषय होण्याचे संकट आलेले पाहतो. त्याबद्दल आपणच अप्रत्यक्षरीत्या का होईना कारणीभूत झाल्याचे पाहून मागचा पुढचा विचार न करता आपले सर्वस्व असलेला हाताचा अंगठा तोडून मोकळा होतो आणि गुरूंची त्या कलंकापासून मुक्तता करतो! पण दुसऱ्याच क्षणी पाडसांच्या भीषण भवितव्याचा विचार मनात येऊन दुःखाने आणि पश्चात्तापाने त्याचे मन भरून येते. तो म्हणतो '...... गुरुजींबद्दलच्या वेड्या प्रेमाच्या त्या एका क्षणी मी तुम्हा सर्वांना विसरलो. धनुर्विद्या संपादन करण्याचा माझा मूळ उद्देशच विसरलो.'

एका दृष्टीने ते अटळ होते, कारण त्याच्या साधनेचा 'जीव' च असलेली गुरुनिष्ठा पणाला लागलेली होती. गुरु द्रोणाचार्यांचे संकट निवारण्याचा एकमेव उपाय गंभीर आणि आत्यंतिक वृत्तीच्या ( Tragic nature ) उदारचरित एकलव्याच्याच हाती असल्याने, अंगुष्ठदानाची करुण घटना अनिवार्य ठरली. विधिघटनेने निर्माण केलेला पेचप्रसंग दुर्निवार होता. 'Character is destiny' हे शेक्सपिअरच्या शोकनाट्याचे सूत्र येथे लागू पडते.

परंतु ज्या अतिचांगुलपणाला-साधुत्वाला-अकल्पित, अद्भुत, मोहक पण कटु 'प्रयोजना' चे फळ आले, त्याच परमकारुणिक वृत्तीचा अतुलनीय साधनेचे प्रयोजन हा एक मधुर परिपाक होता हे विसरता येत नाही. 'प्रयोजना' चे हे दुहेरी स्वरूप मांडणे हे ह्या नाटकाचे एक 'प्रयोजन' आहे असे मानता येते, पण हे नाटक 'एकलव्या' वरच्या एकंदर तीन नाटकांच्या मणिमंगलसूत्रातले एक आहे. ह्या तिन्हींत अनुस्यूत असलेले सूत्र हे दुसरे प्रयोजन ठरेल.

* * *

श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणतो, 'शिशुपाल, जरासंध आणि एकलव्य यांना तुझ्या कल्याणासाठीच युक्तीने मी त्यांच्या त्यांच्या देशांत ठार केले.'

एकलव्याच्या मृत्यूचा त्याच्या गुरुदक्षिणेच्या दिव्य प्रसंगानंतरचा उपरनिर्दिष्ट उल्लेखच काय तो महाभारतात मिळतो.

श्री. कैलासम् यांनी एकलव्यवधाच्या येवढ्या उल्लेखावर 'फुलफिलमेंट' ही एकांकिका रचिली आहे. श्रीकृष्ण आणि एकलव्य ही दोनच पात्रे त्यात आहेत. कुरुक्षेत्रावर कौरव-पांडवांचे युद्ध होऊ घातले आहे. एकलव्य कोणत्या पक्षाला मिळणार हे शोधण्यासाठी श्रीकृष्ण एकलव्याच्या अरण्यातील निवासस्थानी जातो. तो कौरवांना मिळणार असल्यास त्यापासून त्याला परावृत्त करायचे आणि तो कबूल न झाल्यास त्याचा निःपात करायचा त्याचा बेत असतो. श्रीकृष्ण तेथे पोचतो त्या वेळी एकलव्य असत नाही. तो परततो तेव्हा आपल्या पाडसांना श्रीकृष्णाने वासरीने मुग्ध केलेले पाहून चकित होतो. श्रीकृष्णाच्या दिव्य व्यक्तिमत्त्वाने स्वतःही भारावून जातो. मात्र श्रीकृष्णाने "रानटी तिरंदाज, विन अंगठ्याचा निषाद–एकलव्य तो तूच ना?" असा बोचक प्रश्न विचारताच, एकलव्य संतापाने उत्तर देतो, 'होय! मीच तो रानटी एकलव्य!' वडिलांच्या प्रमाणे आपणही निषादांचा राजा असल्याचे सांगून, त्याच्याप्रमाणे आपणही आपल्या राजाकरिता लढण्याचा निश्चय केल्याचे सांगतो. त्यावर श्रीकृष्ण म्हणतो, 'ज्याच्यासाठी तुझे वडील लढता लढता धारातीर्थी पतन पावले तो राजा सच्छील होता, ज्याच्यासाठी तू आपले धनुष्यबाण विटाळणार आहेस तो मात्र अधर्मी आहे.' एकलव्याने उत्तर दिले, 'माझ्या राजाच्या धर्माधर्माचा विचार करणे हे माझे काम नाही. राजाज्ञा होताच धनुष्यबाण सज्ज करून त्याच्या शत्रूचा निःपात करणे हा माझा धर्म आहे!' स्वतःचे जीवितध्येय विसरून व जातिधर्माप्रमाणे आत्मपतनाला तो सिद्ध झाला आहे. 'जन्मजात जातियमांनी' त्याला मर्यादा घालून दिल्या आहेत. त्यांचे उल्लंघन त्याला कसे करता येईल? हरिणशावकांचे रक्षण ऋषीप्रमाणे तप करून त्याला जसे ह्या जन्मी करता येणार नव्हते, तर जन्माने निषाद असल्यामुळे लांडग्यांना ठार करूनच ते करणे प्राप्त होते, तसेच आज्ञापालन हा त्याचा ह्याप्रसंगी धर्म होता. अंती श्रीकृष्णाच्या हातून त्याचा वध होतो. श्रीकृष्णाने एकलव्याच्या आवडत्या वनवासाविषयी गोष्टी काढून त्याचे मन गुंतविले आणि तो बेसावध आहे असे पाहून त्याच्या पाठीत जंबिया खुपसला!

प्रथमदर्शनी एकलव्य श्रीकृष्णाच्या व्यक्तिमत्त्वाने भारला होता. येवढेच नव्हे तर श्रीकृष्णाने अशा तऱ्हेने पाठीत वार केला असताही अगदी प्रयत्न करूनसुद्धा एकलव्याला त्याचा तिरस्कार वाटत नाही. फक्त आपल्याला का मारले

यावद्दलची जिज्ञासा त्याला होती. श्रीकृष्ण उत्तर देतो, 'माझ्या पाडसांना उपसर्ग पोहोचविणारा तूं, तुझा राजा आणि त्याचे मित्र सारेजण लांडगे आहात आणि म्हणूनच तुम्हां साऱ्यांना यमसदनाची वाट धरावी लागेल!' "पृथ्वीवरील सर्व मानवी लांडग्यांचा संहार करून मृत्यू अगर इजा यांच्या त्रासातून साऱ्या मानवी पाडसांची मुक्तता करणे", हे आपल्या अवताराचे कारण असल्याचा खुलासा श्रीकृष्णाने यापूर्वीच केला होता.

एकलव्याने, 'धनुर्धारी पार्थ म्हणजे एक गरीब विचारे पाडस असावे तुझ्या मते, ' असे खोचकपणे विचारताच श्रीकृष्णाने, 'उद्या पार्थ आणि त्याचे सहकारी हेही माझ्या पाडसांना उपसर्ग पोहोचविणारे लांडगे निघाले तर त्यांचीही गत तुमच्यासारखीच होईल' असे उत्तर दिले.

एकलव्य निःशस्त्र असता पाठीत वार करून त्याचा अन्यायाने प्राण घेण्याच्या आक्षेपार्ह कृत्याबद्दल, लांडग्याच्या जबड्यात सापडू नये इतक्या दूर अंतरावर सुरक्षित उभे राहून पोलादी बाणांनी त्याचा जीव घेण्याच्या एकलव्याच्या पद्धतीपेक्षा अकाली त्याला ठार मारण्याची रीत अधिक अन्यायी नव्हती असा युक्तिवाद करून, श्रीकृष्णाने 'जीव घेण्याचे बरे वाईटपण, जीव कसा घेतला यापेक्षा तो कोणत्या हेतूने घेतला यावर अवलंबून आहे' अशी पुस्ती जोडली.

संभाषणाच्या ओघात, 'पुनर्जन्म का प्राप्त होतो? 'सुख आणि दुःख हे कसे सापेक्ष आहे,' 'आसक्तीमुळे सुख हे अन्ती केवळ दुःखच,' 'आनंद म्हणजे परिणामतः यातनाच हे का व कसे अनुभवास येते' आणि शेवटी, 'अक्षय सुख म्हणजे काय आणि अक्षय सुख मिळवून देणाऱ्या गोष्टीचे चिंतन केव्हा करता येईल यावद्दलचा उपदेश श्रीकृष्णाने एकलव्याला केला. त्याने सांगितले, 'जेव्हा ह्या जगातील सर्व वस्तू तुला इतक्या सारख्या दिसतील की, निरनिराळ्या वस्तूंतील भिन्नत्व तुला भासणार नाही, सांगता येणार नाही, तेव्हा! जेव्हा तुला माणूस आणि पशू, मित्र आणि शत्रू, अरण्य, झाड, झुडुप, पान आणि गवताचे पाते, टेकडी, ढिगारा, पर्वत, वाळवंट रेतीचा ढीग आणि रेतीचे कण; महासागर, समुद्र, नदी, मेघ आणि दवबिंदू ह्या साऱ्या वस्तूंत कोणताही वा कसलाही वेगळेपणा दिसणार नाही, त्यांपैकी कोणत्याही वस्तूवर स्वामित्व असण्याने सुख आणि ती गमावल्याने दुःख वाटणार नाही, तेव्हा! जगापासून फार दूरवर राहून पाहणाऱ्याला (ईश्वराला) जसे हे जग दिसते, तसेच तुझ्या डोळ्यांना दिसेल, तेव्हा!'

एकलव्य 'अनासक्तियोगा'चा हा विचार ग्रहण करण्याच्या अवस्थेत उरलेला नसतो. श्रीकृष्णाच्या कुशाग्र बुद्धीची जाणीव मात्र त्याला झालेली असते आणि त्याच्या बोलण्यातील सत्य त्याला अंतर्यामी पटलेले असते. श्रीकृष्णाला तो आपली अखेरची विनंतिवजा इच्छा सांगतो, "...हे काम तुला कसे पार पाडता येईल याची मला कल्पनाही करता येत नाही, पण ते करण्यास लागणारी हुषारी तुझ्यात आहे येवढे निश्चित! माझ्यासारखा मुलगा गमावण्याचे माझ्या आईला एक क्षणभर देखील दुःख होऊ नये–यातना सहन कराव्या लागू नयेत असे कसेही करून–काहीही करून करशील?"

श्रीकृष्णाचे होकारार्थी आश्वासन मिळताच एकलव्य प्राण सोडतो. योगेश्वर श्रीकृष्णाचेही चित्त क्षणभर मोहाविष्ट होते. आणि त्याच्या डोळ्यांतून दोन अश्रू एकलव्याच्या कलेवरावर पडतात; तो लागलीच आपले मन आवरतो आणि आश्वासनानुसार एकलव्याच्या शोधार्थ येणाऱ्या वृद्ध आईची चाहूल लागताच, तिला काहीही कळू न देता हातांतल्या रक्तलांछित जंबियाने तिचा अन्त करतो! येथे पडदा पडतो.

ह्या एकांकिकेतील घटना दोन-तीन तासांच्या आत आणि एकाच स्थळी घडतात. उपकथानकाचाही अभाव आहे. त्या दृष्टीने, 'ग्रीक नाट्यशास्त्रातील स्थलकाल आणि कथावस्तू यांच्या संबंधीचे कडक कायदे ह्यात पाळण्यात आलेले दिसतात.' चौथा कडक निर्बंध म्हणजे, "ते (ग्रीक लोक) करुण आणि हास्य यांना एका नाट्यकृतीत स्थान देत नसत." तो यात हास्याचा पूर्णपणे अभाव असल्याने आणि कारुण्याचा प्रभाव पडल्याने; भंग पावलेला नाही. ग्रीक शोकनाट्याचे पाचवे आणि सर्वांत महत्त्वाचे व्यवच्छेदक लक्षण म्हणजे सद्गुणसंपन्न नायकावर येणाऱ्या संकटास कोणत्यातरी देवतेचा कोप कारणीभूत होणे," तेहि एकलव्यासारख्या साधुवृत्तीच्या तरुणावर आणि आपल्या मुलाला उत्कृष्ट नीतिशिक्षण देणाऱ्या त्याच्या निरपराध आईवरही 'श्रीकृष्ण' देवतेचा कोप झालेला दाखविल्याचे ह्या एकांकिकेत सापडते. हे पाहता ही एकांकिका 'ग्रीक ट्रॅजेडी' आहे असे म्हणता येईल!

परिपूर्तीनंतर एक्स्पिएशन (प्रायश्चित्त) नावाचें नाटक श्री. कैलासम् लिहिणार होते. डॉ. सर सी. आर रेड्डी हे त्या-

बावत म्हणतात, " ग्रीक व हिंदू यांच्या श्रद्धेप्रमाणे प्रत्यक्ष देवदेखील नियतीने बद्ध झालेले आहेत, कठोर कर्मगतीच्या पलीकडे त्यांनाही जाता येत नाही.

" नाटककाराच्या नाट्यकृतीत जो ' काव्यगत न्याय ' ( Poetic justice ) प्रकट होत असतो तो कर्मगतीचे, नियतीचे, पार्थिव किंवा ऐहिक प्रतीक होय. कैलासम् यांचे यापुढे एकलव्याच्या कथानकाशी संबद्ध असे तिसरे एक प्रायश्चित्त नावाचे नाटक आहे. त्यात त्यांनी कृष्णालाही ' प्रायश्चित ' देऊन काव्यगत न्याय घडवून आणण्यात आपल्या प्रतिभेची चुणूक दाखविलेली आहे. त्यात श्रीकृष्ण शेवटी आता आपली इहलोकची यात्रा संपवावी या विचारात निमग्न असे एका झाडाखाली बसले असताना त्यांच्या गुडघ्याला एका निषादाचा बाण येऊन लागतो, हा बाण मारणारा निषाद दुसरा तिसरा कोणी नसून एकलव्याचा मुलगाच आहे असे श्री. कैलासम् यांनी या नाटकात दाखविले आहे. "

' प्रयोजन,' ' परिपूर्ति ' आणि अलिखित ' प्रायश्चित्त ' ही तीन नाटके एकलव्याशी संबंधित आहेत. ग्रीक नाटककारांच्या त्रिनाट्याप्रमाणे–विशेषतः ' सोफोक्लीस ' प्रमाणे. ' सोफोक्लीस'चे समकालीन नाटककार जे त्रिनाट्य लिहीत ते अशा स्वरूपाचे असे की, ही तीन नाटके मिळून एक कथानक पुरे होई. सोफोक्लीसने त्रिनाट्याच्या या स्वरूपात अत्यंत क्रांतिकारक असा बदल केला. त्रिनाट्यातील प्रत्येक नाटक हे आपल्या परीने संपूर्ण असावे व असे असूनही या तीन नाटकांचे मिळून एक सलग कथानक ठेवावे अशी त्याने आपल्या त्रिनाट्याची रचना केली.

कैलासम् यांचे ' प्रयोजन,' ' परिपूर्ति ' आणि अलिखित ' प्रायश्चित्त ' ही आपापल्या परीने संपूर्ण दिसतात; ' परिपूर्ति ' आणि ' प्रायश्चित्त ' ही त्याचबरोबर एकमेकांशी संबंधितही दिसतात. परंतु वरवर पाहता अंगुष्ठदान करणारा विद्यार्थी एकलव्य डोळ्यासमोर उभा करणारे ' प्रयोजन ' आणि मृत्यूशय्येवरील एकलव्य आणि श्रीकृष्ण यांच्यातील चर्चा निवेदन करणारे ' परिपूर्ति' यांना जोडणारा काही बळकट धागा खरोखरीच आहे किंवा कसे हा प्रश्न महत्त्वाचा आहे. तो तसा असावा–नव्हे–आहेच, हे दोन्ही नाटकातील नाटकांकडे थोड्या निराळ्या दृष्टीने पाहिले असता कळून येईल.

' प्रयोजन ' नाटकात गुरु द्रोणाचार्यांवर वचनभंगाचा आरोप येतो आहे हे पाहून, परदुःखाने दुःखित होणारा एकलव्य प्रत्यक्ष गुरूच संकटात सापडलेला पाहून पाडसांच्या रक्षणाचे ध्येय क्षणभर विसरतो आणि गुरूला संकटातून मुक्त करण्यासाठी अंगठा तोडून देतो आणि अशा तऱ्हेने गुरूच्या अंगावर बेतलेले संकट, आपला अंगठा गमावून दूर करतो !

' परिपूर्ति'त जातिधर्मानुसार आज्ञापालनाच्या बंधनामुळे एकलव्याला कौरवांच्या बाजूने उभे राहण्याचा निर्णय घ्यावा लागतो. त्याचे पर्यवसान ह्या खेपेस त्याचा स्वतःचा प्राण गमविण्यात होते ! एकलव्याच्या ध्येयच्युतीचे, परिस्थितीप्रमाणे कमी-अधिक गंभीर स्वरूपाचे परिणाम ' प्रयोजन ' ' परिपूर्ति ' या दोन नाटकांत दाखविण्यात आले आहेत. हा त्या दोन्ही नाटकांना जोडणारा समान धागा म्हणता येईल.

या नाटकाचे तंत्रात्मक वैशिष्ट्यही डोळ्यात भरते. महाभारतातील एकेक व्यक्ती प्रचंड सुळक्यासारखी भासते. त्यांना गवसणी घालण्यासाठी ग्रीक ट्रॅजेडीचा त्यांनी अवलंब केला आहे. ' प्रयोजन ' नाटकाचा विचार केला तर शेक्सपिअरच्या रोमॅन्टिक ट्रॅजेडीच्या तंत्राचा उपयोग केलेला दिसतो. पण, ' प्रयोजन, ' ' परिपूर्ति ' आणि संकल्पित, ' प्रायश्चित्त ' यांचा साकल्याने विचार केला तर सोफोक्लीसच्या त्रिनाट्याच्या तंत्राशी साम्य दिसून येते. पण ' त्रिनाट्या'तील पहिले शेक्सपिअरन शोकांतिकेनुसार लिहून, ग्रीक आणि शेक्सपिअरन शोकान्तिकांच्या तंत्रांचे मिश्रण केले आहे. ग्रीक शोकान्तिकेचे तंत्रही जसेच्या तसे न वापरता काही बाबतींत थोडे स्वातंत्र्यही घेतले आहे. ' परिपूर्ति'त एकलव्याचा वध प्रत्यक्ष घडताना दाखविला आहे. ग्रीक ट्रॅजेडीच्या नियमानुसार रंगभूमीवर अशा दृश्यांना मज्जाव होता.* कोरसच्या अभावाचाही उल्लेख करता येईल.

' प्रयोजना'च्या तुलनेने, ' परिपूर्ति ' नाट्यकृती म्हणून फार थिटी वाटते. तत्त्वचर्चेने त्यातील नाट्य झाकोळले

* " ...Yet it must be owned that some conventions of the Greek theater seem far from happy. Thus it is a rule that acts of violence must take ' off ' " F. L. Lucus Introduction to Greek drama for Everyman.

आहे. त्यातील कृष्णैकलव्यसंवाद कठोपनिषदातील यमनचिकेत संवादाची आठवण करून देतो. तपशीलाच्या दृष्टीनेही 'परिपूर्ति'त एकलव्याला मुलगा असल्याचा किंवहुना त्याचे लग्न झाल्याचाही पुसटसा उल्लेख आलेला नाही.

वास्तविक त्यापुढील 'प्रायश्चित्त' नाटकात श्रीकृष्णाच्या निर्याणाचे निमित्त ठरलेला बाण ज्या व्याधाने मारला होता तो व्याध एकलव्याचा मुलगा होता असे ते दाखविणार होते; तेव्हा पूर्वीच्या नाटकात उपरोक्त तपशील अवश्य हवा होता. कदाचित् 'परिपूर्ति'ची सुधारून वाढविलेली आवृत्ती काढण्याचे राहून गेले असावे असे दिसते, प्रा. द. रा. येंद्रे यांनी म्हटले आहे, 'Fulfilment' हे एकांकी दृश्य Little lays and plays ह्या संग्रहात १९३३ साली प्रसिद्ध झाले खरे परंतु १९४४ च्या The purpose बरोबर प्रसिद्ध केले नाही.' Little lays and plays ची दुसरी आवृत्ती १९६४ मध्ये श्री. कैलासम् यांचे अंतेवासी श्री. बी एस. रामराव यांनी प्रसिद्ध केली आहे. त्यात 'Fulfilment' च्या अगोदर दोन अंक असून ते 'Kailasam miscellany' या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या संग्रहात समाविष्ट असतील असे म्हटले आहे. ते उपलब्ध होईपर्यंत, श्री. कैलासम् यांच्या हयातीत प्रसिद्ध झालेल्या प्रस्तुत सदोष एकांकी-वरूनही नाट्यतंत्राचा एक अभिनव प्रयोग आणि भव्य आशयाचा आवाका यांचे स्तिमित करणारे दर्शन घडते.

• • •

## साभार-स्वीकार

**अंधार यात्रा** (काव्यसमीक्षा) — त्र्यं. वि. सरदेशमुख, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ८ रु.

**वाट्टेल ते** (विनोदी स्फुटे)—ल. ना. गोखले, केसरी प्रकाशन, पुणे २; ६ रु.

**भारतीय न्यायव्यवस्था** – वि. न. गाडगीळ, रुची प्रकाशन, पुणे २; ६ रु.

**भारतीय स्त्री** (लेखसंग्रह) – हिंगणे स्त्री-शिक्षण संस्था, पुणे ४; १० रु.

**पूर्व आणि पश्चिमेच्या संत महिला**– नॅशनल बुक ट्रस्ट ऑफ इंडिया, नवी दिल्ली, ५ रु.

**अर्धविराम** (आत्मकथा) – ग. रा. भागवत, प्रा. सौ. आशा भागवत, यंत्रपूर, हरिहर; २॥ रु.

**राणी दुर्गावती** – दत्तू गोरे, अरगडे आणि मंडळी, पुणे २; २॥ रु.

**राजमाता जिजाबाई** – अप्पासाहेब पाठक अरगडे कुलकर्णी प्रकाशन, पुणे २; १॥

**भारतीय मुस्लिम : आव्हान आणि आवाहन** – अनु. अनिरुद्ध पुनर्वसु, आनंद भारती, पुणे २; ३ रु.

**भारतातील जातीयवादाची समस्या** – महेश्वर करंदीकर, साधना प्रकाशन, पुणे २; १ रु.

**स्वतंत्र भारतातील सुधारणांची वाटचाल व राजकीय व कायदेविषयक वस्तुस्थितीचे विवेचन** – ले. म. बी. मोर, अनु. व प्रकाशक–शं. रा. सोमण, सांगली; १ रु.

# प्रबोधचन्द्रोदय आणि दस्तूरे-उश्शाक

**● देवीसिंग चौहान ●**

" प्रवोधचंद्रोदय " नावाचे नाटक कृष्णमिश्र या आचार्याने शक नवशतोत्तर काळात लिहिले. हे नाटक निर्णयसागर मुद्रणालयाने जवळ जवळ पाऊणशे वर्षांपूर्वी छापले. त्याची सहावी आवृत्ती एका छोट्याशा संस्कृत प्रस्तावनेसह शक १८५७ साली प्रसिद्ध झाली. तदनंतर सांवशिवशास्त्री या पंडिताने त्रिवेंद्रम येथील शासन मुद्रणालयातून छोट्याशा इंग्रजी प्रस्तावनेसह ते शक १८५८ साली प्रसिद्ध केले. सांवशिवशास्त्री यांनी सांगितले आहे की हा ग्रंथ शकाच्या १० व्या शतकात लिहिला गेला. कृष्णमिश्राचा हा ग्रंथ भारतात बराच लोकप्रिय झालेला होता. वेदान्तदेशिक या पंडिताने प्रवोधचंद्रोदय नाटकाच्या पार्श्वभूमीवर एक नवीन " संकल्पसूर्योदय " नावाचे नाटक लिहिले. नलदमयन्ती कथेवर आधारलेले, संस्कृत पंचमहाकाव्यांपैकी शेवटले महाकाव्य " नैषधचरितम् " हे श्रीहर्ष या पंडिताने शकाच्या अकराव्या शतकात लिहिले. या काव्यात श्रीहर्षाने कृष्णमिश्राची उसनवारी केलेली दिसून येते. माधवाचार्य नावाच्या एका आचार्याने निरनिराळ्या भारतीय तत्त्वज्ञानांचा संग्रह आपल्या " सर्वदर्शनसंग्रह " ग्रंथात केलेला आहे. माधवाचार्य शकाच्या तेराव्या शतकात होऊन गेल्याचे नमूद आहे. लोकमत किंवा सामान्यतः चार्वाकमत म्हणून ओळखल्या जाणाऱ्या दर्शनाची ओळख करून देण्यासाठी कृष्णमिश्राने आपली पात्रे महामोह किंवा चार्वाक यांच्या तोंडी घातलेल्या मतांचा माधवाचार्याने " सर्वदर्शनसंग्रहा "त उल्लेख केलेला आहे. चार्वाकावरील आपल्या छोटेखानी सुंदर पुस्तकात प्रा. आठवले यांनी वरील गोष्टीचा उल्लेख केलेला आहे.

कृष्णमिश्र हा कीर्तिवर्मा नावाच्या राजाच्या दरबारी होता, असे त्यांच्या संस्कृत नाटकावरून दिसून येते. कीर्तिवर्मा हा मगधपती म्हणजे आधुनिक विहारचा राजा होता. चेदिपती अर्थात आधुनिक बुन्देलखण्डचा राजा कर्ण याने कीर्तिवर्म्याचा पराभव केला व त्याचे राज्य उखडून पाडले. परन्तु कीर्तिवर्मा याने गोपाल या आपल्या प्रधानाच्या साहाय्याने आपली घडी पुन्हा बसवली, व त्याने शक ९८७ मध्ये चेदिपती कर्णदेवाचा पराभव केला. याचा अर्थ असा की—" प्रबोधचंद्रोदय " नाटक या वर्षाच्या पुढेमागे केव्हातरी लिहिले गेले. कृष्णमिश्र हा कीर्तिवर्म्याच्या राज्यात नांदत होता व तो त्याचा समकालीन होता.

" प्रबोधचंद्रोदय " या नाटकाचा परिणाम भारत, आशियातील इराण, तुर्कस्तान इत्यादी देश व इंग्लंड येथे झालेला दिसून येतो. गुजराती भाषेत या प्रवोधचंद्रोदयाचे अनुकरण फारच जुने असल्याचे दिसून येते. भीम नावाच्या कवीने या संस्कृत नाटकाचा काव्यरूप अनुवाद शक १४११ मध्ये " प्रबोधप्रकाश " या नावाने गुजरातीत केलेला आहे. या ग्रंथाचे संपादन केशवराम काशीराम शास्त्री यांनी शक १८५७ मध्ये अहमदावादेहून गुजरात व्हर्नाक्युलर सोसायटीच्या वतीने प्रसिद्ध केलेले आहे. भीमविरचित " प्रवोधप्रकाश " काव्याच्यापूर्वी " प्रबोधचिन्तामणि " नावाचे काव्यरूप अनुवादन जयशेखरसूरी या जैन पंडिताने गुजराती भाषेत शक १३२७ मध्ये केलेले होते. तत्पूर्वी कोणा जिनप्रभू नामक कवीचे " मोहराजविजयोक्ति " उपलब्ध आहे. परंतु गुजरातीतील सर्वप्रथम अनुवाद जिनप्रभाचार्य पंडिताने " भव्यचरित " या रूपकात, अर्थात नाटकात केलेला आहे. भोगीलाल सांडेसरा या गुजराती विद्वानाने " भव्यचरित " ग्रंथाचे संपादन करून ते श्री फार्बस गुजराती सभेच्या त्रैमासिकात छापलेले आहे. वरील चार गुजराती अनुवादांखेरीज त्या भाषेत सहजसुंदर या कवीने प्रबोधचंद्रोदयाचे " आत्मराज रास " या नावाने शक १४४७ त अनुवादन केले आहे. जयशेखरसूरीच्या ' प्रबोधचिन्तामणिवरून ' सुमतितरंग या कवीने शक १५८७ मध्ये ' मोहविवेकनी चौपाई ' या नावाने आणि धर्ममंदिर या कवीने शक १६०५ त ' मोहविवेकनो रास ' या अभिधानाने गुजराती अनुवाद केलेले आहेत. याशिवाय जिनदास या कवीने शक १६५५ त ' व्यापारीरास ' या नावाने एक काव्य लिहिले. तसेच शक १६६५ तील प्रेमानन्द कवीचे ' विवेकवणझारो ' आणि जीवराम भट्टाचे ' जीवराजशेठनी मुसाफरी ' हे दोन

अनुवाद गुजरातीत उपलब्ध आहेत. यावरून असे दिसून येते की, शक १२००–५० पासून शक १६६५ पर्यंतच्या काळात गुजराती भाषेत एकूण दहा अनुवाद झालेले आहेत.

मराठी भाषेत दामोदर विश्वनाथ नेवाळकर यांनी शक १८३० मध्ये " मनोविजय " नावाचे नाटक लिहिलेले आहे. त्यावरही' प्रबोधचंद्रोदया 'चा अथवा त्याच्या अनुवादाचा प्रभाव दिसतो.या नाटकासाठी त्यांनी कथानक,पात्रे कोठून घेतली,किंवा ती त्यांची स्वतंत्र निर्मिती आहे, याचा नेवाळकरांनी उल्लेख केलेला नाही. नाटकाला प्रस्तावना नाही. लेखकाने कसलीही माहिती दिलेली नाही. परंतु " प्रबोधचंद्रोदय " व " मनोविजय " ही दोन्ही नाटके वाचली म्हणजे असे वाटायला लागते की नेवाळकरांनी " प्रबोधचंद्रोदय " वाचलेले होते व ' मनोविजय ' हे नाटक प्रबोधचंद्रोदयाचे अनुवादरूप असावे.*

याखेरीज माधवस्वामी नावाचा एक रामदासी कवी तंजावर ( मद्रास ) नगराच्याजवळील तिरुवेळंदूर, त्रिवंदूर, येथील रामदासी मठात मराठी काव्यरचना करीत होता; त्याचा काल साधारणतः शक १५७० ते १६३५ असा मानण्यात येतो. त्याने विपुल कविता केलेली आहे. त्याने वरील प्रबोधचंद्रोदय नाटकाची एक काव्यरूप नाटककथा लिहिलेली आढळते. ( म. सारस्वत तुळपुळे पृ. ८९२ ) हे काव्य बहुधा वरील नाटकाच्या कथानकावरच आधारलेले असावे. ते अद्यापि अप्रसिद्ध असून हस्तलिखित तंजावर येथील सरस्वती महाल ग्रंथालयात आहे.

## फार्सी भाषेत

याप्रमाणे प्रबोधचंद्रोदय या एका परीने अद्वितीय अशा नाटकाचा प्रभाव जसा भारतात दिसून येतो, तसा तो इराण अर्थात पर्शियाच्या फार्सी भाषेतही दिसून येतो, असे मला या लेखात दाखवावयाचे आहे. फार्सी भाषेत " दस्तूरे–उश्शाक " या नावाचे ४६६६ द्विपंक्तीचे काव्य शक १३५८ हिजरी ८४० मध्ये अफगाणिस्तान, रशिया व इराण यांच्या सीमा मिळत असलेल्या खुरासान या प्रांताच्या आग्नेय भागातील नैशापूर या शहरी ( ५८° ५०′ पूर्व–३६° २०′ उत्तर ) मुहम्मद यहिया इब्न सीबक या पंडिताने लिहिले. फताही हा त्याचा लकब किंवा त्याचे कविनाम. या फताहीने १०–११ ग्रंथ फार्सी भाषेत लिहिलेले आहेत. आपल्या " दस्तूरे–उश्शाक " अर्थात " प्रेमिकांचा धर्म " किंवा " साधकांचा मार्ग " या ग्रंथाचा त्याने स्वतःच गद्यात अनुवाद केला व त्याचे नाव त्याने " शबिस्ताने–खयाल " अर्थात " विवेकाचे शय्यागृह " असे ठेविले. त्याने हा ग्रंथ शक १३६१ त लिहिला. फताहीने याच आपल्या ग्रंथाचा अनुवाद " हुस्न व दिल " या गद्यग्रंथात यानंतर केला. हुस्नो–दिल या ग्रंथाची भाषा अत्यंत अलंकृत आहे. बाणभट्टाच्या कादम्बरीतील किंवा स्वर्गीय नांदापूरकर यांच्या " मराठी मायबोली " या पुस्तिकेतल्या सारखी भाषा या ग्रंथात फताहीने वापरलेली आहे. हा ग्रंथ फारच लोकप्रिय ठरला. फार्सीला शेजारी असणाऱ्या व फार्सीमुळे प्रभावित झालेल्या तुर्की भाषेत या " हुस्नो–दिल " ( सौंदर्य व मन ) या ग्रंथाचे चौघा लेखकांनी अनुवादन केलेले आहे. लामई या साहित्यिकाने शक १४५३ त ( हिजरी ९३८ ) त्याचा गद्य अनुवाद केला. शक १५१७ मध्ये आही या लेखकानेही गद्यात अनुवाद केला. सदकी या कवीने " हुस्नो–दिल " याचे काव्यमय रूपांतर केले. आणि वाली या कवीने शक १५२२ मध्ये फताहीच्या ग्रंथाला काव्यबद्ध रूप दिले.

भारतामध्ये इराणी मुसलमानांचे व फार्सी भाषेचे पाय या काळात चांगलेच टेकलेले होते. भारतातही " हुस्नो–दिल " या ग्रंथाचे बरेच अनुवाद झाले. दाऊद एलची या लेखकाने शक १५६६ त ( हि. १०५४ ) या गद्य ग्रंथाला काव्यमय रूप दिले. विजापूर येथे राहणाऱ्या शाह वैरुल्ला मुजरिमी ( कवीनाम ) या कवीने शक १५९७ मध्ये (हि. १०८६) या ग्रंथावरून एक प्रेमाख्यानक काव्य अर्थात मस्नवी फार्सी भाषेत लिहिले. औरंगजेब बादशाहाच्या काळात खाजा मुहम्मद बे-दिल या साहित्यिकाने " हुस्नो-दिल " या ग्रंथाचा अनुवाद गद्यात शक १६०५ ( हि. १०९५ ) मध्ये पूर्ण केला. दक्षिणेतील शाह हुसेन जौकी या कवीने शक १६१९ ( हि. ११०९ ) मध्ये वरील ग्रंथाचा पद्य अनुवाद करून त्याचे नाव " प्रेमिकमीलन " असे ठेविले. अशा रीतीने फताही याने लिहिलेल्या " हुस्नो-दिल " ग्रंथाचे चार अनुवाद फार्सी गद्यपद्यात भारतात झाल्याचे नमूद आहे. " हुस्न व दिल "

*प्रबोधचंद्रोदयाचा पहिला मराठी अनुवाद ( मूळ सहांपैकी फक्त तीन अंकांचाच ) अमरापूरकर व बापट या शास्त्रीद्वयाने १८५१ साली केलेला आहे. विचारसार (१८५४)' सायुज्य सदन '(१८६८) संस्कारअंतःपुरपर्यटन रूपक ( १८७१ ) ही नाटके ' मनोविजया 'च्या पूर्वी मराठीत अवतरली.





या ग्रंथात ४५० ओळी आहेत असे नमूद आहे. या ग्रंथाचे इंग्रजी भाषान्तर शक १७२३ मध्ये आर्थर ब्राऊन याने डब्लिन येथून प्रसिद्ध केले होते. ते पुष्कळ ठिकाणी चुकीचे असल्याची तक्रार या संपादनाविषयी करण्यात येते. शक १७४० मध्ये वुइल्यम प्राईस याने दुसरे इंग्रजी भाषान्तर प्रसिद्ध केले. शक १८११ मध्ये जर्मन पंडित डॉ. रूडोल्फ द्वोरक याने या ग्रंथाचे भाषान्तर केले. ते व्हियन्ना अकादमीच्या शक १८११ च्या कार्यवाहीत प्रसिद्ध झालेले आहे. डॉ. द्वोरक याने टीकात्मक संपादन करण्यासाठी या गद्यग्रंथाच्या तीन हस्तलिखित प्रतींचा उपयोग केलेला आहे. आपल्या प्रस्तावनेत कवीचे चरित्र, काव्यातील मालारूपकाचे सविस्तर विशदीकरण आणि काव्याचा सारांश सम्पादकाने दिलेला आहे. शक १८४८ मध्ये आर. एस. ग्रीनशील्ड्स् या आय. सी. एस. निवृत्त पंडिताने या ग्रंथाची संहिता लंडन येथून प्रसिद्ध केली आहे. या पुस्तकाला केवळ चार पानी प्रस्तावना असून प्रस्तावनेतील कविचरित्रविषयक माहिती डॉ. द्वोरक यांच्या ग्रंथावरून घेतली आहे असे ग्रीनशील्ड्स् याने स्वतःच नमूद केले आहे.

### दक्खिनी हिन्दीत

फताही याच्या "हुस्न व दिल" या ग्रंथाचा अनुवाद दक्खिनी हिन्दीत (भाषा खडीबोली, आजची हिन्दी व लिपी फार्सी) झालेला आहे. अब्दुल्ला कुतुबशाह या गोवलकुण्डा येथील राजाच्या काळात त्याच्या दरबारातील एक सिद्धहस्त पंडित मुल्ला वजही याने एक अनुवाद गद्यात "सबरस" या नावाने शक १५५७ (हिजरी १०४५) मध्ये केलेला आहे. या वजही कवीचे एक "कुतुब-मुश्तरी" नावाचे प्रेमाख्यानक काव्य शक १५३१ (हिजरी १०१८) मध्ये लिहिलेले उर्दू व हिन्दीतून प्रकाशित झालेले आहे. वजहीचा "सबरस" ग्रंथ उर्दूतून दोनदा सम्पादित व प्रसिद्ध झाला आहे. पैकी डॉ. अब्दुल हक (शक १८५४) यांचे सम्पादन बरे झालेले आहे. हैद्राबादकर डॉ. श्रीराम शर्मा यांनी ते हिन्दीत प्रसिद्ध केले आहे (शक १८७७). वजही याचा "सबरस" ग्रंथ मराठी विद्वानांना व मराठीच्या अभ्यासकांना अत्यंत महत्त्वाचा आहे.

## प्रबोधचंद्रोदय नाटकाचा वंशवृक्ष

प्रबोधचंद्रोदय (शक ९२२)



दक्खिनी हिन्दीचा अभ्यास मराठी भाषेच्या अभ्यासाच्या दृष्टीने महत्त्वाचा आहेच; परंतु त्यातल्या त्यात वजहीचे दोन्ही ग्रंथ विशेष महत्त्वाचे आहेत. कारण वजहीच्या गद्यपद्य लिखाणात दक्खिनी हिन्दीवर झालेल्या मराठीच्या प्रभावाचा परमोच्च विन्दू दृष्टीस पडतो. या मराठी प्रभावाच्या खोलीचा थांग येथे घेणे कठीण आहे. त्याच्याकरिता स्वतंत्रपणे अवकाश काढला पाहिजे. येथे या गोष्टीची आठवण ठेवणे बरे की, कोणाही भारतीय पंडिताने हुस्न व दिल याचा अनुवाद फार्सीत करण्याच्या अगोदर मुल्ला वजहीने तो दक्खिनीत केला. वजहीचा ग्रंथ दक्खिनी साहित्यात तर अपूर्व आहेच. परंतु सर्व हिन्दी साहित्यात देखील फारच वरचे स्थान पटकावील असाच आहे.

### प्रबोधचंद्रोदय

प्रबोधचंद्रोदयाचे कथानक परिचितच आहे. विवेक हा प्रधान नायक, मति ही त्याची पत्नी, संतोष हा विवेकचा मित्र होय. पुरुष हा उपनिषत्पती असून प्रबोधोदय हा पुरुषचा पुत्र आहे. श्रद्धा, शान्ती, करुणा, मैत्री, विष्णु-भक्ती, उपनिषत् ( स्त्री ), सरस्वती, क्षमा इत्यादी स्त्रीपात्रे विवेक राजाच्या सेविका, दासी इत्यादी होत. महामोह अर्थात मोहसेन हा विवेक राजाचा शत्रुपक्ष आहे. काम, क्रोध, लोभ, दम्भ, अहंकार हे मोहसेनाचे अमात्य आहेत. संकल्पात्मक मन हा मोहसेनाचा साथीदार आहे. दिगम्बर, भिक्षू, क्षपणक व कापालिक हे बुद्धजिनांचे अनुयायी, अर्थात वैष्णवपंथानुयायी विवेकाचे शत्रू व पर्यायाने मोहसेनाचे सहकारी होत. मोहसेनाने वार्हस्पत्यदर्शनानु-यायी चार्वाकालादेखील या द्वंद्वात हाताळलेले आहे. मिथ्यादृष्टी, रती, हिंसा, तृष्णा हा मोहसेनाचा दासीगण आहे. विवेक व मोहसेन यांच्यामधील द्वंद्वाचे प्रयोजन जीवन्मुक्ती असे कृष्णमिश्राने सांगितले आहे. जीवन्मुक्ती असे नाव सहाव्या अंकाला देण्यात आले आहे. पहिल्या अंकाला मायाविलास, चौथ्याला विवेकोद्योग व पाचव्याला वैराग्यप्रादुर्भाव ही नावे दिलेली आहेत.

### दस्तूरे-उश्शाक

आता फताहीच्या दस्तूरे-उश्शाक ( साधकांचा मार्ग ) या काव्यातील पात्रे पाहा. अक़्ल ( बुद्धी, विवेक ) नावाचा ग्रीस ( यूनान ) या पाश्चात्त्य देशाचा राजा असतो. त्याचा पुत्र दिल ( मन ) आहे. अक़्लराजाचा प्रधान वहम ( संकल्प ) असून सब्र ( शान्ती ) हा त्याचा सेनानी आहे. तन ही अक़्लराजाची राजधानी होय. नजर हा दिल या राजपुत्राचा शूर व चतुर मित्र होय. आफियत ( सुरक्षा ) व जहद ( संयम ) ही अक़्लच्या राज्यातील प्रमुख नगरे होत. आफियतचा राजा वा मांडलिक नामोस ( कीर्ती ) व ज़हद नगरचा राजा ज़रक ( शुभ्रता ) हे होत. फताहीने हिम्मत ( धैर्य ) हा त्र्ययस्थ राजा निर्मिला आहे. त्याने शेवटी शिष्टाईचे कार्य केले आहे. क़ामत ( साहस ) हा हिम्मत राजाचा भाऊ.

नाटकातील खलनायक पक्ष पुढीलप्रमाणे आहे. इश्क ( प्रेम ) हा पौर्वात्यदेशातील राजा असून त्याला हुस्न ( सौंदर्य ) या नावाची कन्या असते. मिहर (कृष्ण) हा इश्क राजाचा प्रमुख सेनानी आहे. खयाल ( विचार, संकल्प ) हा हुस्न राजकन्येचा स्वामिभक्त सेवक, ख़ाल ( शारीरिक सौंदर्य, त्वचा ) ही तिची सखी व हम्जाद ही तिची भगिनी आहे. नाज़ ( अहंकार ), ग़म्ज़ा ( कामचेष्टा ), शैवा ( प्रेमरीती ) नखरा, ( प्रेमाचे चार ) हे हुस्न राजकन्येचे सेनानी आहेत. तिच्या पदरी हिलाल ( म्हणजे कलापूर्ण चंद्र परंतु येथे कलापूर्ण भ्रूविकार ) नांवाचा एक धनुर्धारी योद्धा आहे. ज़ुल्फ ( केस ) नावाचा तिचा एक चतुर सेवक आहे. अशी या दस्तूरे-उश्शाक काव्यातील दोन्ही पक्षांची पात्रे. एकदा दिल राजपुत्राला आवे-हयात ( अमृत ) प्राप्त करून घेण्याची इच्छा होऊन तो त्यासाठी बेचैन होतो. मग तो नज़र या आपल्या चतुर विश्वासू दूताला तत्प्राप्तीसाठी देशांतरास पाठवितो. त्याला प्रवासात हुस्न राजकन्येची माहिती मिळते. तो तिला भेटतो व परतून तिचे रूपवर्णन दिल या आपल्या स्वामी-जवळ करतो. हे ऐकून दिल बेभान होतो. त्याला हुस्न-शिवाय काही सुचत नाही. म्हणून तो नज़रला हुस्नराज-कन्येच्या प्राप्तीसाठी पाठवून देतो. हुस्न राजकन्याही या प्रेमात सापडते. आपल्या प्रेमाची खूण म्हणून ती नज़र-जवळ एक अंगठी देते. ती दिल राजपुत्राला मिळताच तो वडिलांना न कळवता राजकन्या हुस्नच्या नगरीत जातो. परंतु तेथे त्याला हुस्नपिता इश्कराजाचे सैनिक पकडतात. व बंदिवासात टाकतात. दिल गुप्त पत्राने ही हकीकत आपल्या वडिलांना म्हणजे अक़्ल बादशाहास कळवतो. अक़्ल राजा आपल्या सर्व लावलष्करानिशी इश्क राजावर चालून जातो. या लढाईत अक़्ल राजाचा इश्क राजा-कडून पराभव होतो. आणि अक़्ल बादशाहालादेखील इश्क राजाच्या तुरुंगात खितपत पडावे लागते. अक़्ल राजाची ही दुर्दशा त्याचा परम मित्र हिम्मत याला

कळते. तोही अक्ल राजा व त्याचा पुत्र दिल यांना सोडविण्यासाठी इश्क राजावर चालून जातो. परंतु शेवटी हिम्मत विचार करतो की इश्क राजा हा मोठा सम्राट व प्रबळ शत्रू आहे. त्याच्याशी युद्ध करण्याने यशःप्राप्ती नाही. म्हणून तो विचार करतो की आता दोन्ही राजांत समेट घडवून आणणे हेच सद्यःपरिस्थितीत इष्ट व श्रेयस्कर आहे. म्हणून तो इश्क राजाकडे निरोप पाठवतो. अदबी, शिष्टाचार, चातुर्य, लीनता यांच्या साहाय्याने तो इश्क राजाला समज देतो. नंतर तो अक्ल-राजाला तुरुंगांत भेटतो. अक्लराजाने सम्राट इश्कचे प्रधानपद स्वीकारावे असा समेट निश्चित होतो व हुस्न राजकन्येचा दिल राजपुत्राशी विवाह होतो. दिल राजपुत्राला आबे-हयातही (अमृत) इश्क राजाच्या राज्यातच असल्यामुळे प्राप्त होते.

## फताही हा अनुवादक

प्रबोधचंद्रोदय व दस्तूरे-उश्शाक या दोन साहित्य कृतींतील विषय व पात्रे यांच्याकडे पाहिल्यानंतर सहजच असे वाटायला लागते की, फताही हा कृष्णमिश्राचा अनुवादक असावा. दोन्ही कृतींतील विषय भक्ती वा ज्ञानयोगाचा आहे. फार्सी साहित्य व इराण देश या दोन्हींत भक्तियोगाला सूफीपंथ असे म्हणतात. इराण-मधील हा सूफीपंथ ख्रिस्ती धार्मिक विचार व भारतीय भक्ति पंथ यांच्यापासून प्रभावित आहे असे विद्वान संशोधकाचे मत आहे. अशा प्रकारची नोंद आंग्ल ज्ञानकोशाच्या नवीनतर आवृत्तीत उद्धृत केलेली आढळते. हा दूरान्वय सोडून देऊनही हे मान्य होण्यास हरकत नसावी की दोन्ही ग्रंथांत एकच विषय चर्चिलेला आहे. दोन्ही कृतींतील पात्रेही मुख्यतः एकच आहेत. प्रबोध-चंद्रोदयाचा प्रधान नायक विवेक असून फताहीने त्याचे नाव अक्ल असे ठेविले आहे. संस्कृत नाटकातील खल-नायक मोहसेन राजा असून फार्सी काव्यात इश्क (प्रेम) आहे. फताही जर अनुवादक असेल तर त्याने नाटक विषयातल्याहून थोडीशी भिन्न रचना आपल्या काव्यात केलेली आहे. वाह्यतः फताहीच्या काव्यात बुद्धी व प्रेमाचे द्वंद्व हा विषय आहे. परंतु हा भेद केवळ बाह्यच आहे. स्वतः फताही याने स्पष्टीकरण केलेले असल्यामुळे दोन्ही कृतींतील विषयैक्य कायम राहते. याची चर्चा पुढे येईलच. नायक पक्षातील मती व संतोष ही पात्रे कृष्ण-मिश्राने निर्मिली आहेत, तर फताहीने दिल व सब्र (शांती, संयम) यांची योजना केली आहे. आफियत, नामोस, जहद, हिम्मत या फताहीच्या पात्रांच्या जोडीला संस्कृत नाटकात वैराग्य, प्रबोधोदय, पुरुष, श्रद्धा, करुणा, विष्णुभक्ती यांची योजना केलेली आहे. खलपक्षीयांपैकी संस्कृत नाटकात चार्वाक, दिगंबर, भिक्षू, क्षपणक, कापा-लिक, मत्सर, काम, क्रोध, लोभ, दंभ, अहंकार हे सेनानी सिद्ध आहेत तर दस्तूरे-उश्शाकमध्ये ख़याल-ख़ाल, गमजा हिलाल, रकीब, जुल्फ इत्यादी युद्धनिपुण कटिबद्ध आहेत. यावरून दोन्ही कृतींतील प्रमुख पात्रे एकच आहेत हे दिसून येईल.

कालदृष्ट्या प्रबोधचंद्रोदय पूर्वीचे असल्यामुळे अनुवाद असलाच तर तो फताही हाच अनुवादक असू शकतो. कालदृष्ट्या हे जमतेही. प्रबोधचंद्रोदय नाटक शक ९२२ च्या पूर्वीचे आहे असा विद्वानांचा निष्कर्ष आहे. दस्तूरे-उश्शाकचे वर्ष या काव्यातच दिलेले आहे. फार्सी-तील अवजदपद्धतीनुसार त्याचे वर्ष " खुर्रम " या शब्दा-वरून मिळते. वरील पद्धतीनुसार " ख़े " अक्षराचे मूल्य ६००, " र " अक्षराचे २०० आणि " म " अक्षराचे ४० एकूण ८४० हिजरी हा या कृतीचा लेखनकाल. हिजरी ८४० म्हणजे १३५८ म्हणजे फताहीने किमान-पक्षी कृष्णमिश्राच्या नंतर चारशे सव्वाचारशे वर्षांनी आपली काव्यकृती निर्माण केली. जाता जाता हे सांगा-वेसे वाटते की ग्रीनशील्ड्स् याने कालनिर्देशक म्हणून " दार खुर्रम " या दोन शब्दांचा उल्लेख केलेला आहे. हे चूक आहे. " दार " शब्दातील अक्षरमूल्ये मिळून २०५ ही संख्या येते म्हणजे लेखनकाल वर्ष १०४५ येते. अर्थातच हे चूक आहे.

## काव्यप्रयोजन :

प्रबोधचंद्रोदय नाटकात जीवन्मुक्ती असे शेवटच्या अंकाला नाव दिलेले आहे. त्याव्यतिरिक्त नाटककाराने आरम्भीच सूत्रधाराच्या तोंडी-

> विवेकेनेव निर्जित्य कर्णं मोहमित्रोर्जितम् ।
> श्रीकीर्तिवर्मनृपतेर्बोधस्येवोदयः कृतः ॥ ९

हा संकल्प घालून नाटकप्रयोजनाची नांदी केलेली आहे. नाटकाचा शेवटही तदनुसार झालेला आहे. दस्तूरे-उश्शाकमध्ये फताहीने विषयाची व प्रयोजनाची हाताळणी थोडीशी भिन्न केलेली असली तरी त्याच्या प्रयोजना-बद्दल कसलीही शंका राहात नाही. त्याची मुख्यतः दोन

कारणे आहेत. एक तर फताहीने दिल या नायक राजपुत्राला आबे-हयात म्हणजे अमृत याच्या प्राप्तीसाठी आर्तता झाली होती असे कथानकाच्या ओघात आवर्जून सांगितलेले आहे. कथानकात आबे-हयातच्या प्राप्तीचा प्रयत्न व तत्प्राप्ती दोन्ही वर्णिलेली आहेत.

**प्रत्यक्ष पुरावा**

आपल्या दस्तूरे-उश्शाक या ग्रंथाची रचना करण्यासाठी आपण कोणापासून प्रेरणा घेतली याचा उल्लेख फताहीने केलेला नाही. कोणाही पूर्ववर्ती फार्सी, अरबी वा अन्यभाषीय पंडित वा ग्रंथाचा आधार घेतल्याचेही सांगितले नाही. तरीपण या काव्याच्या समारोपप्रसंगी व काव्यप्रयोजनाच्या स्पष्टीकरणाच्या प्रास्ताविकात काही श्लोक आलेले आहेत. त्यावरून वराच बोध होण्यासारखा आहे. फताहीने असे उल्लेखिले आहे की ह्याला " मश्रिक' अर्थात पूर्वेकडून एका श्रेष्ठ पुरुषाचे मार्गदर्शन झाले, प्रकाश मिळाला. फताहीने पूर्वेकडील श्रेष्ठ पुरुषाचा हा उल्लेख खालीलप्रमाणे केला आहे.

व-मश्रिक रह-नमूदश पीरे-वाला।
ज़ि पस्ती दस्ते-क़दरश साख़्त वाला।
नज़र अज़ ख़ाके-मश्रिक शुद तरब-नाक
कि हस्त इशराके-नूरे-इज़्ज़त अज़ ख़ाक।
दयारे-इश्के-इफी ख़ुदाईस्त
कि बो रा अज़ मुहब्बत रहनुमाईस्त।
( ग्रीनशील्ड्स्, पृ. ४०२ )

पूर्वेकडून एका श्रेष्ठ पुरुषाने मार्ग दाखविला. गर्तेतून त्याच्या दैवी कराने उच्च बनविले. पूर्वेच्या मृत्तिकेपासून दृष्टी आनन्दमय बनली. कारण की या मृत्तिकेतून श्रेष्ठत्वाचा प्रकाश उदय पावला. ईश्वरज्ञानाच्या प्रेमाचा प्रान्त हेच ईश्वरत्व होय. कारण त्याला प्रेमामुळे मार्गदर्शन आहे.

वरील तीन श्लोकांचा रोख अगदी स्पष्ट आहे. पूर्वेकडील एका पुरुषाने मार्ग दाखविला. प्रकाश मिळाला. गर्तेतून वर काढले. ईश्वरसाधनेचा मार्ग दाखविला. ही दोनचार वाक्ये मर्मगर्भ व उपयुक्त आहेत. कृष्णमिश्र हा निश्चितच फताहीचा पूर्वदिग्वासी आहे. संस्कृत भाषा ही फार्सी भाषेच्या पूर्वेला वसत आहे. फताहीने प्रत्यक्ष कृष्णमिश्र वा त्याच्या प्रबोधचंद्रोदयाचा उल्लेख केलेला नसला तरी त्याने पूर्वसूरीच्या मार्गदर्शनाकडे अंगुलिनिर्देश निश्चितपणे केलेला आहे. तसेच फताहीने इश्क या राजाला पौर्वात्य राज्यपद बहाल केलेले आहे; हेही देखील सार्थ व अभिप्रायगर्भ आहे.

• • •

## साभार स्वीकार

**सती** ( नाटक )—व्यंकटेश माडगूळकर, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे २; २॥ रु.

**नयन तुझे जादूगार** ( नाटक )—पुरुषोत्तम दारव्हेकर, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३४; ५ रु.

**पर्वकाळ ये नवा** ( नाटक )—सौ. मालतीबाई दांडेकर, जोशी ब्रदर्स, पुणे २; ३ रु.

**ही आपली सीमा** ( नाटक )—मनोहर देखणे, जोशी ब्रदर्स, पुणे २; ३ रु.

**राजकन्या नीलमपरी** (विनोदी बालनाट्य)—शाम फडके, जोशी ब्रदर्स, पुणे २; २ रु.

**जावळीचा राणा** ( ऐति. नाटक )—प. का. जोशी, जोशी ब्रदर्स, पुणे २; २॥ रु.

**जैन संस्कृति**—ना. हि. शहा, सन्मति साहित्य-सभा, सोलापूर २; ४ रु.

**माध्यमिक शिक्षणाच्या व्यवस्थापनाची नवी दिशा**—ग. वि. अकोलकर व वि ह. सहस्रबुद्धे, धरमपेठ, नागपूर; १ रु.

**देह चंदनाचा** ( चरित्रात्मक )—सुधाकर जोशी व अरविंद पाठक, वैद्य मो. दा. संत स्मा. समिति, पारोळे; ५० पैसे.

अनुक्रमणिका

# केशवसुतांच्या " श्रेया " ची अर्थनिश्चिती

● रा. अ. काळेले ●

" हरपलें श्रेय " हे केशवसुतांचे भावलोभस गीत त्यांच्या लेखणीतून शेवटचे उतरलेले. या गीताची झपाटती जादू वाचकाच्या चित्तास डोलविते. परंतु चित्ताचा गोंधळही करते. गीताचा भाव मधुर पण अवोध वाटतो. कडव्याचे दुवे नीट जुळत नाहीत. अर्थ पुरता लागत नाही. कवितेच्या सुरुवातीस केशवसुतांची टीप आहे. शिवाय त्यांच्या बंधूंनी पुस्ती जोडलेली आहे. परंतु टीपांपासून कवितेचा अर्थ उमगण्यास फारसे साह्य होत होत नाही. टीपांत काही शब्द असे आहेत की त्यामुळे " हरपलें श्रेय " ही कविता अध्यात्मपर आहे असा समज होतो. या चिंतनिकेवर आध्यत्मिक भाष्यही झालेले आहे. या कवितेचे वेगवेगळ्या टीकाकारांनी वेगवेगळे अर्थ लावलेले दिसतात. परंतु एकही पर्याय सर्वस्वी समाधानकारक वाटत नाही. बहुधा जे होते ते असे की टीकाकार आपला तर्क चालवून आपला अर्थ लावतात. त्यामुळे कवीचा अर्थ कधी बाजूस राहातो. कवीचा अर्थ कवीलाच विचारला पाहिजे. तो अर्थ कवीच्या शब्दकोशात शोधला पाहिजे. तो कवीच्या अन्य वचनांच्या संगतीने कविसामग्ऱ्याच्या यथार्थदर्शनानुरूप लावला पाहिजे. " हरपलें श्रेय " या कवितेचा अर्थ तशा रीतीने लावण्याचा प्रयत्न येथे करून पाहायचा आहे.

कवितेची सुरुवात धुंडीत हिंडण्यापासून आहे. केशवसुतांच्या कवितेत त्यांचे असे हिंडणे, भटकणे, फिरणे वारंवार आढळते--" फिरत असतो नित्य० ", " कुठेतरी मी हिंडतां० ", " मी . . . फिरतसे बहुवार० ", इत्यादी.

केशवसुत फिरतात, भटकतात, हिंडतात कसे ? कुणाच्या संगतीत ते फिरत नाहीत. ते नेहमी एकटेच फिरतात. आणि फिरतात कुठे ? जनपदात, वस्तीत फिरत नाहीत. तर एकांतात, रानात कुठेतरी फिरत असतात. " नदीच्या तीराने...तृणाची खाली रुचिर हिरवी चादर ...लतांची वृक्षांची निविड फुगडी शोभत...फुलें तीं स्वनांहीं...सुगंधें...स्थल भरुनि गेलें अतिशय..." अशा ठिकाणी केशवसुतांचे भ्रमण असते. ते असे फिरून करतात काय ? ते काहीतरी शोधतात. ते रानावनात शोधतात का ? बाजारात का नाही शोधत ? कारण ते जे शोधतात ते भिकार जगी मिळू शकणार नाही. " जेथें ओढे वनराजी " तेथेच ते सापडू शकते. तेथे त्यांना काय भेटते ? तर केशवसुत प्रचीतीने बोलतात की, "...तेथे, मज गमतसे, लौकिक नव्हे--असे कांहीं होतें, कथन करण्या जें मज नये,..." असे ते अलौकिक, अकथनीय काय ? केशवसुत वर्णन करतात—

" वसे तो विश्वात्मा वरुनि कवितादेविस तिथे "

" विश्वात्मा " या शब्दप्रयोगावरून " विश्वात्मक देव " हा शब्द आठवेल. परंतु केशवसुतांना " तो विश्वात्मा " म्हणजे ज्ञानेश्वरांचा " विश्वात्मक देव " नव्हे ही गोष्ट ध्यानात आणावयास हवी. केशवसुत परमात्म्याचे भक्त नसून रम्यात्म्याचे परमभक्त होते. त्यांचा तो विश्वात्मा म्हणजे रम्यात्मा आहे. तो विश्वात्मा रम्यात्मा विश्वात्मक देवाचा अंश होय एवढे म्हणता येईल. विश्वान्तरी जे जे श्रीमत् ( म्हणजे सुंदर ) तो परमेश्वराचा अंश जाणावा असे गीतावचन आहे ( अध्याय १०, श्लोक ४१ ). केशवसुत तोच अभिप्राय देतात—

" दिव्य शक्तीनें स्फुरे गंध पुष्पीं
रंग खुलतीही तिनें इन्द्रचापीं
सृष्टिमाजीं जें रम्य असे काहीं
तीच कारण त्या शक्ति असे पाही । "

तो विश्वात्मा किंवा " विपिनदैवत " हेच केशवसुतांचे कवितादैवत. त्याचे आराधन करीत ते रानोमाळ हिंडतात. विपिनभ्रमणातील आपला मनोहित हेतू केशवसुत सांगतात तो हा, की—

" मनीं माझ्या व्हावी चलित कविताशक्ति..."

त्यांच्या " श्रेया " चा अर्थ या ठिकाणी लागू शकतो का ? " कर्तव्य आणि प्रीती " या कवितेतील एका महत्त्वाच्या पाठभेदाकडे येथे मी मुद्दाम लक्ष वेधू इच्छितो. पाठभेद असा—

खगांच्या गानें तें विपिन मधुरे ! फार गढलें
अशाठायीं माझें मज हरपलें श्रेय गवसे.

केशवसुतांना त्यांचे " हरपलें श्रेय " रमणीय वनस्थलीत गवसते अशी ही त्यांची स्पष्ट ग्वाही आहे. कविताशक्ती चलित व्हावी यासाठी ते विपिनात जातात. तेथे कविता-देवीस वरणारा विश्वात्मा त्यांच्या प्रचीतीस येतो. आणि " हरपले श्रेय " हाती लागते. हे सर्व विचारात घेता " श्रेय " म्हणजे कवित्वचालना, स्फूर्ती असा अर्थ निष्पन्न होतो. श्रेय या शब्दाचा मोक्ष असा एक अर्थ आहे. परंतु केशवसुतांची एकंदर विचारसरणी आणि त्यांची वृत्ती लक्षात घेता केशवसुतांच्या " श्रेया " चा मोक्ष असा अर्थ घेणे चूक होईल. केशवसुतांनी प्रत्यक्षपणे किंवा अप्रत्यक्षपणे मोक्षाचा विचार मनातदेखील आणला नव्हता. ते मुमुक्षू कधीच नव्हते.

" श्रेय " हरपले असे केशवसुत का म्हणतात ? या संबंधात एक उपपत्ती अशी आहे की केशवसुतांची काव्य-स्फूर्ती उत्तरोत्तर मंदावत जाऊन शेवटी संपुष्टात आली होती. आणि ते जर अधिक जगते तर कविता लिहू शकले नसते. केशवसुतांच्या काव्यकर्तृत्वाच्या वीस वर्षांच्या काळाचे प्रथम, मध्य, उत्तर असे तीन विभाग कल्पून त्यांमधील काव्यनिष्पती संख्येने मोजल्यास ती उत्तरोत्तर कमी झालेली दिसते हे खरे. १८८५ पासून पहिल्या सहा वर्षांत ६१ कविता, तर दुसऱ्या आणि तिसऱ्या सप्तकात कवितांची संख्या अनुक्रमाने ४७ आणि २४ पडते. परंतु कवितांची संख्या उतरत गेली असली तरी श्रेणी उत्तरोत्तर चढत गेली होती. सुरुवातीच्या ६१ कवितांमधे नाव घेण्याजोग्या कविता हाताच्या बोटांवर मोजण्याइतका असतील नसतील. नंतरच्या ४७ कवितांत " तुतारी " " झपूर्झा " " स्फूर्ती ", " रांगोळी ", " नैर्ऋत्येकडील वारा ", " नवा शिपाई ", इतक्या कविता तरी डोळ्यात सहज भरतात आणि शेवटच्या २४ कवितांमध्ये " निशाण ", " कवितेचे प्रयोजन ", " सतारीचे बोल ", " कोणी-कडून कोणीकडे ", " म्हातारी ", " आम्ही कोण ", " गोफण ", " हरपलें श्रेय ", अशा वरचढ कविता चमकताना दिसतात.[1] केशवमुत पुढे जगते तर ते कविता लिहू शकते ना यावर खुद्द केशवसुतांची साक्ष विरुद्ध पडते. आपल्या प्रियेला कवीचा निरोप असा आहे की–

प्रेमें आण मनांत हें–" जर सखा माझा पुढे वांचता
या पद्यांहुनि फार सुंदर अशा पद्यांस तो गुम्फिता...

केशवसुतांची प्रतिभा बहुप्रसू नसेल. पण ती कधी अप्रसू झाली नाही, आणि झाली नसती. श्रेय " हरपले " याचा अर्थ ते खलास झाले असा घ्यायचा नसून, ते असून दिसेनासे, किंवा दिसताच दिसेनासे होत होते, असा अर्थ घ्यायचा आहे—

स्वभाव दावुनि
परि तें झटदिनि
जाई लोपुनि !

तसेच पाहा– " अन्तर्हित झाली रामा " केशवसुतांची कवितेबद्दल फिर्याद ही की ती क्षणमात्र कानात गुण-गुणते आणि जाते. ती " पुरता न अनुग्रह करितां " डोळ्याआड होते. त्यांना कवितेचा अधिक कृपाप्रसाद " पुरता " अनुग्रह पाहिजे होता तो त्यांना मिळाला नाही. काव्यनिर्मितीच्या बाबतीत केशवसुत महत्त्वाकांक्षा बाळगीत होते असे त्यांच्या अनेक उद्गारांवरून दिसते.– " माझ्या......मुखामधुनि या चालावयाचा पुढें आहे–सुंदर तो सुधासरसवाङ्निष्यन्द ", " ... फार सुंदर अशा पद्यांस तो गुम्फिता ", " वाग्देवीसुत जन्मला ". " एक शब्द बोलेन जरी, सकलां कुंठित करिन ". इत्यादी. कांही स्फुट कविताच ते लिहू शकले. त्याने त्यांचे समाधान झाले नव्हते. प्रदीर्घ रचना, महाकाव्य लिहावे असा केशवसुतांच्या मनाचा लाहो असावा. रहाळकरांना लिहिलेल्या पत्रात ते म्हणतात– " A century has passed without producing a long Marathi poem worth the name ". आपल्या निर्मितीचे अल्पत्व ( " a dwarf " )केशवसुतांना तीव्रतेने जाणवत होते. लघु काव्यापलीकडे विशाल उड्डाण घ्यावे हा त्यांच्या मनाचा लाहो होता. परंतु तितकी ताकद आपल्या प्रतिभेच्या पंखांत अजून आलेली दिसत नाही ( " ...don't show any signs as yet of outgrowing.") म्हणून त्यांचे मन आत कुढत होते. ("crab in my heart" ). आपल्या हातून काही बृहत्तर रचना व्हावी यासाठी ते विशाल स्फूर्तीचे अखंड अन्वेषण करीत होते. उपाय शोधत असून निरुपाय झाला होता म्हणून ते व्यथित होते. ( But alas ! When is the restorative !" )

१ कवितांचा संख्याक्रम, कालानुक्रम प्रा. भ. श्री. पंडित संपादित " समग्र केशवसुत " प्रमाणे.

केशवसुतांच्या पत्राचा भाव हा आहे. आपली मनःस्थिती संत्रस्त झाली आहे. अंतःकरण द्विधा झाले आहे, त्यावर शांती हा एकमेव उपाय, तो आपणांस कधी मिळेल का? असा केशवसुतांच्या पत्राचा अर्थ लावणे त्यांच्या भूमिकेशी आणि वैचारिक प्रणालीशी सुसंगत वाटत नाही. सुख, शांती, मोक्षप्राप्ती यांपैकी कशासाठी केशवसुत त्रिखंड धुंडीत नव्हते. काव्यनिर्मितीबद्दल ते दांडगी आकांक्षा धरून होते. त्यासाठी ते विशाल स्फूर्ती धुंडीत होते, विशाल स्फूर्तीसाठी "जीव पाखडीत" होते. त्यांना रहाळकरांनी "एखादे मोठे काव्य" लिहावे "ती दिव्य स्फूर्ती आपणांत आहे" असे लिहिले होते. आपल्याला विशेष प्रतिभा लाभली आहे असा विश्वास स्वतः केशवसुतांना होताच. ते "श्रेय" ला (विशाल स्फूर्तीला) हक्काने "माझे" म्हणतात. एवढी प्रतिभा असून ("अशी आगळी") आपल्या लेखणीतून किरकोळ चुटक्यांपलीकडे काही उतरत नाही ("परी वावळी आहे दुवळी") ही गोष्ट केशवसुतांच्या जिवास खात होती.

केशवसुतांच्या "श्रेय" शब्दाचा विशाल स्फूर्ती हा अर्थ कसा लागतो ते आपण पाहिले. त्याप्रमाणे आता संबंध कवितेचा अर्थ कसा लावता येईल ते आपण पाहू. या गीताची कडवी ध्रुवपदाशी नीट जुळत नाहीत असा टीकाकारांना अनुभव आलेला आहे. प्रा. रा. श्री. जोग यांनी त्यासंबंधी विवेचन आपल्या ग्रंथात केले आहे. [2]प्रा. भ. श्री. पंडित यांच्या मते या गीताची कडवी "परस्परांपासून पूर्णतया विभक्त आहेत. मात्र त्यांचा संबंध पालुपदाशी स्वाभाविकरीत्या सांधण्यात आला आहे.[3] कडव्यांतील विषय परस्परांहून वेगळे, म्हणजे स्वतंत्र मानले तर त्यांना एका पालुपदाशी जोडण्यात स्वारस्य कोणते? ध्रुवपद हा मुख्य विचार आणि कडवी म्हणजे त्या विचाराचा विस्तार अशी सामान्यतः गीताची व्यवस्था असते. मात्र "हरपलें श्रेय" यातील कडव्यांचा मेळ ध्रुवपदाशी घालणे सकृत्‌दर्शनी अवघड वाटते हे खरे. तथापि अशा तऱ्हेच्या इतर गीतांमधून सामान्यतः दिसून येणारी केशवसुतांची विचार प्रक्रिया लक्षात आणल्यास, तसेच त्या गीतांमधील विचार "हरपले श्रेय" यामधील विचारांशी तुलनेने पाहिल्यास त्याच्या कडव्यांचा संबंध समजण्यास साह्य होऊ शकेल.

दिव्य, रम्य यांच्या विचाराबरोबर केशवसुतांच्या मनात बहुधा बाल्याचा विचार वाहून येतोच. "पुष्पाप्रत" (क्र. ६४), "म्हातारी", या कविता पाहाव्यात. "हरपले श्रेय" या गीताच्या ध्रुवपदात "श्रेय" (स्फूर्ती) हा विचार आहे. तेव्हा वरील प्रक्रियेप्रमाणे काव्यस्फूर्तीच्या विचारास लागून प्रथमच शैशवाचा विचार यावा हे साहजिक वाटते.

सत्य हे कल्पनेहून भिन्न आहे. कल्पनासृष्टी ("लुट्पुटीच्या"०) जितकी सुखमय तितकी सत्यसृष्टी ("खऱ्या घरी०") कटु कष्टमय असते. माझी ती कल्पलता कल्पकता कुठे गेली? मला सुचेनासे झाले आहे. हा कडवे क्र. १चा भाव.

कडवे क्र. २ मध्ये श्रेयाचा (विशाल काव्यस्फूर्तीचा) पुढे विचार आहे. भाव असा.—पूर्वसुकृतामुळे ("मोल") प्रतिभा मिळते असे म्हणतात. देवाजवळ प्रतिभा मागितली ती देवाने दिली. (देवाने) दिले सोने बावनकस ("हिरण्मय") परंतु हातात झाले ते हिणकस ('मृण्मय'). मोठी प्रतिभा मिळूनदेखील हातून क्षुद्र लेखन झाले! [लोकोत्तर प्रतिभावंतांनी "geniuses" लहानसहान कविताच लिहून कालाचा अपव्यय करू नये ("not to waste time in writing short poems only.")] असे केशवसुतांचे मत होते. प्रतिभा देण्याघेण्यात काही चूक झाली. माझ्या हातून गमावलेली ती विशालस्फूर्ती मला फिरून कशी मिळेल?

कडवे क्र. ३ मध्ये कविसुलभ कल्पनाप्रवणतेचा विचार आहे. स्फूर्ती शोधीत असताच केशवसुतांना झरोक्यातून येणाऱ्या किरणात उडणारा अणू दिसला. असे काही अद्‌भुत पाहिले की केशवसुतांची तरल कल्पना कंप पावते. ते प्रत्यक्षातून परोक्षात (कल्पनेत) वाहून जातात. हवेवर तरंगत आलेल्या म्हातारीस पाहून त्यांची तशी स्थिती होते.— "... अद्‌भुत तें काहीं; प्रत्यक्षांतुनि तें परोक्षीं शीघ्र मला नेतें..." तसेच येथेही —"अणूसवें त्यातून उडे–परोक्षविषयीं मन माझें...." कल्पनेत, कवितेत रमत बसल्याने इतर गोष्टींकडे दुर्लक्ष होते. परंतु त्याची दरकार केशवसुतांना वाटत नाही. (पाहा–"त्यामुळे परी न मनाला घालितों कधीहि

२ "केशवसुत" पृ. १२५

३. "केशवसुत—पाच चिंतनिका" पृ. ११८.

विषादीं०" ). " वेडी होऊनि." इ० पाहा—"जिनें मला वेडा केलें०".

कडवे क्र. ४ मागे विचारात घेतले आहे. "स्वच्छंदे त्या आळवित्ये", म्हणजे काव्यस्फूर्तिहेतूभूत, रम्याधिशायी, दिव्य, अकथनीय अशा त्या सत्त्वाचे, त्या विश्वात्म्याचे-आराधन करिते.

कडवें ५. याचाही विचार वर आला आहे. "भीडभाड माझी फिटली—जग म्हणतें कीं 'ही उठली'!".—पाहा—"आप्तवर्ग म्हणती—" "यातें कुठली ही जडली व्याद!...झालों छंदीफंदी मी तुझिया नादीं०". "जन मर्यादा धरुनि कसे अमर्याद०"— कवितेमागे झेप घ्यायची तर लौकिकाचा विचार सोडला पाहिजे.

कडवे क्र. ५ मध्ये कवित्व नाही तर कवीस "संसारात राम नाही" कवित्वहीन जिण्यापेक्षा मरण पत्करले हा विचार आहे. कवीस स्फूर्तिहीनत्व हे वैधव्यासारखे आहे. "संसृतिविमुखी"—पाहा–"संसारीं मन करमेना दीपशिखेवरि." हा दृष्टान्त येथे चपखल वसत नाही. दीपशिखा हरपली म्हणून प्राणाहुती देत नाही. ती असतानाच तो तिच्यात झेप टाकतो. "मी न करिन का तेवि." स्फूर्तीशिवाय कवीस जीवन असह्य आहे. स्फूर्तीसाठी तो प्राणाचेही मोल देईल. "हिरोनी नेले."—कारण देवाने तर दिले होते ते हातातून गेले. याचा अर्थच की कोणीतरी ते हिरावून नेले.

केशवसुतांच्या मनात अहर्निश घोळणारा एकच विषय कविता. त्या विषयावर त्यांनी सर्वांत जास्त कविता लिहिल्या आहेत "हरपले श्रेय" ही कविता त्यापैकीच एक. "हरपले श्रेय" हे वर्डस्वर्थच्या Ode to the Intimation of Immortality चे रूपांतर आहे असा कित्येक टीकाकारांचा अभिप्राय दिसतो. केवळ काही कल्पनासाम्यांवरून काढलेला तो निष्कर्ष बरोबर नाही. Ode आणि "हरपले श्रेय" या कवितेच्या कर्त्यांच्या वैचारिक भूमिकाच मुळी अगदी भिन्न आहेत. Ode हे बोल आस्तिकश्रद्धावंताचे, तर "हरपले श्रेय" हे उद्गार कलावंताचे आहेत. Ode मध्ये "खरें घर तें" अशा प्रकारची अंतःप्रतीती आहे, तर "हरपले श्रेय" यात "मज लाभेल कसे" अशी अंतरीची खंत, अशांती आहे. केशवसुतांच्या या अशांतीचा श्रद्धेच्या अभावाशी काहीएक संबंध नाही हेही येथे स्पष्ट केले पाहिजे. "हरपले श्रेय" हे परप्रत्ययाचे बोलणे नाही. ते कवीच्या स्वप्रत्ययाचे हृदयोद्गार आहेत. असो.

"हरपले श्रेय" या गीताचा अर्थ कसा लागू शकतो ते आपण पाहिले. आता राहिली स्वतः कवीची टीप. तिचा अर्थ असा–"उदात्त बुद्धी" म्हणजे अलोट कल्पनाशक्ती (genius), ती ज्याला लाभली आहे. त्याची जीवनमूल्ये लौकिकाहून वेगळी. त्याला सांसारिक सुखाचे महत्त्व वाटत नाही. "तिला काही पाहिजे असते ते तिच्या हक्काचे असून" इ० याचा संबंध विशाल काव्यस्फूर्तीशी आहे. "प्राप्तिकरिता....झुरत० "विशाल स्फूर्तीसाठी केशवसुत रानोमाळ हिंडत कवितादैवताचे आराधन करीत होते. त्या झुरण्यालाच केशवसुत "crab in my heart" म्हणतात.

अशा रीतीने "हरपले श्रेय" या गीताचा आणि कवीने गीताच्या सुरुवातीस दिलेल्या टीपेचा सुसंगतीने अर्थ निश्चित होतो.

केशवसुतांनी रघुवंश, किरातार्जुनीय यातील सर्गांची भाषांतरे केली. यावरून प्राचीन महाकाव्यांकडे त्यांचा ओढा सुरुवातीपासूनच होता हे दिसून येते. त्यांच्या "कचाप्रत देवयानी", "राजा शांतनु" या कवितांकडे मोरोपंती पद्धतीवर प्रदीर्घ काव्य रचण्याचे अयशस्वी प्रयत्न या दृष्टीने पाहता येईल. त्या दोन कवितांच्या पाठोपाठच केशवसुतांच्या लेखणीतून शेवटी "हरपले श्रेय" उतरले, आणि मनामधील "Crab" विषयी विषण्ण उद्गारही बाहेर पडले.

• • •

अनुक्रमणिका

सांवत्सरिक समालोचन

# आजची कविता :

## १९६६ मधील मराठी कवितेच्या निमित्ताने

● सुधीर रसाळ ●

१९६६ मध्ये प्रकाशित झालेल्या मराठी कवितेसंबंधी या लेखात जो विचार करावयाचा आहे तो अर्थातच त्या सालातील कवितेपुरता मर्यादित करणे शक्य होणार नाही. कारण एकतर ह्या वर्षात प्रकाशित झालेल्या कवितासंग्रहातील कविता ह्या गेल्या काही वर्षांमध्ये लिहिल्या गेलेल्या असणार, आणि दुसरे म्हणजे कुठल्याही वाङ्मय प्रकारातील लेखनाची एका वर्षातील निर्मिती अलग करून तिचा विचार करणे शक्य नसते. जेव्हा आपण एखाद्या कालखंडातील वाङ्मयाचा विचार करतो तेव्हा आपण एक ऐतिहासिक दृष्टिकोण स्वीकारीत असतो. असा ऐतिहासिक दृष्टिकोण स्वीकारावयाचा म्हणजे आपणास आपोआपच त्या विशिष्ट कालखंडाच्या अलीकडे पलीकडे जावेच लागते. तेव्हा १९६६ साली प्रकाशित झालेल्या मराठी कवितेच्या निमित्ताने आजच्या अलीकडच्या १०-१२ वर्षांतील कवितेचा हा विचार होणार आहे.

येथे आणखी एक गोष्ट स्पष्ट केली पाहिजे ती अशी की ह्या लेखात जो विचार केला जातो आहे त्यात ह्या वर्षात प्रकाशित झालेल्या सर्वच कवितासंग्रहांचा विचार केला जाणार नाही. तसेच ह्या वर्षाच्या आगेमागे जी स्फुट कविता प्रकाशित झाली आहे तिच्याही संदर्भात विचार करण्याचा प्रयत्न येथे केला आहे.

१९६६ हे वर्ष कवितेच्या दृष्टीने महत्त्वाचे वर्ष आहे कारण या वर्षी मराठीतील काही महत्त्वाच्या कवींचे काव्यसंग्रह प्रकाशित झाले आहेत. पु. शि. रेगे यांचा "दुसरा पक्षी", मंगेश पाडगावकरांचा "विदूषक", सदानंद रेगे यांचा "देवापुढचा दिवा", इत्यादी. विविध कारणांसाठी गाजलेला नारायण सुर्व्यांचा "माझे विद्यापीठ" हा संग्रहही याच वर्षातला. हैद्रावाद साहित्य संमेलनाच्या अध्यक्षांना—प्रा. वा. ल. कुलकर्णी यांना—अर्पण केलेला "पुन्हा कविता" हा अनेक कविकृत कवितांचा संग्रहही याच काळातला. त्यामुळे रेगे, पाडगावकर यांसारख्या कवींच्या कवितेचा आणि "पुनः कवितेच्या" संदर्भात एकूण आजच्या कवितेचा विचार करण्याची सोय झाली आहे.

१९३० पासून पु. शि. रेगे यांचे काव्यलेखन सातत्याने चालू आहे. जवळपास सुरुवातीपासूनच पु. शि. रेग्यांनी स्वतःची वाट चोखाळलेली दिसून येते. रेग्यांच्या कवितेवर निकटच्या काव्यपरंपरेचे जसे सखोल संस्कार नाहीत तसेच रेग्यांच्या कवितेचेही मराठी कवितेवर सखोल संस्कार झाले नाहीत. केशवसुतांपासून जी एक परंपरा निर्माण झाली त्या परंपरेच्या कुठल्याही धाग्याशी रेग्यांचे नाते नाही. केशवसुतांपासून निर्माण झालेल्या परंपरेशी जसा तिचा संबंध नाही तसाच मर्ढेकरांच्या कवितेशीही तिचा संबंध नाही. म्हणूनच अलीकडच्या काव्यपरंपरेत रेग्यांची ही कविता अगदी एकाकी आहे. रेग्यांचे मोठेपण सहसा नाकारले जात नसले तरी ह्या कवितेकडे, तिच्या अंतःप्रवृत्तीकडे सामान्यपणे दुर्लक्षच होताना दिसते.

पौर्वात्य आणि पाश्चात्त्य वाङ्मयातील क्लासिकल परंपरा रेग्यांनी आत्मसात केल्या आहेत. मराठी कवितेने ज्याची कधी फिकीर केली नाही त्या कवितेच्या घाटाची एक सूक्ष्म समज रेग्यांच्या कवितेतून सतत व्यक्त होत आली आहे. रेग्यांची अनुभव घेण्याची पद्धतच मराठी कवितेत अनोखी आहे. संवेदनांगातून अनुभवांचा स्वीकार करणे हे रेग्यांच्या अनुभव घेण्याच्या पद्धतीतील खास वैशिष्ट्य आहे. भावनांगाने अनुभव घेणे रेग्यांनी सतत टाळले आहे, आणि विचारांगाने अनुभव घेणे रेग्यांना जमलेले दिसत नाही. त्यामुळेच रेग्यांची कविता ही "कालिक" वाटत नाही. भावनांगाने आणि विचारांगाने कवितेचा आस्वाद घेऊ पाहणाऱ्या पारंपरिक अभिरूचीला ही कविता कळत नाही किंवा ती "कविता" आहे असेही वाटत नाही.

अनुक्रमणिका



विविध संवेदनांची एक लयबद्ध अशी आकृती रेग्यांच्या कवितेतून प्रकट होते. कविता ही शब्दांची रचना आहे ही जाणीव रेगे कधी विसरले नाहीत. त्यामुळे येथे शब्द हीच कविता असते. शब्दांतील संवेदनार्थ हे रेग्यांच्या कवितेत पुरेपूर वापरले जातात. एवढेच नव्हे तर शब्दांमध्ये नवनवे संवेदनार्थ निर्माण करण्याचा प्रयत्न रेग्यांच्या कवितेत सतत होताना दिसतो. असे संवेदनागर्भ शब्द रेग्यांच्या संवेदनासंपृक्त प्रतिमा घडवितात. रेग्यांच्या कवितेतील प्रतिमा ही एकाच वेळी संवेदनासाधर्म्याच्या आणि संवेदनावैधर्म्याच्या दुहेरी ताणाने घडलेली असते. शब्दाशब्दांतील, प्रतिमा-प्रतिमांतील साधर्म्य–वैधर्म्यातील अनेक ताणांतून रेग्यांच्या कवितेचा घाट सिद्ध होत जातो. शब्द, प्रतिमा, लय हे सर्व घटक खूपसे संवेदनसहचर ( associations of various sensations ) वाचकाच्या मनात निर्माण करून त्यांची विशिष्ट आकृती साधतात. विविध संवेदनांची आकृती साधू पाहणाऱ्या या कवितेत प्रत्येक चरणातील शब्दाच्या स्थानाला, शब्दांच्या, प्रतिमांच्या न्यासाला, शब्दांच्या न्यासातील अनुप्रासांना, चरणांतीच्या यमकांना, चरणातील शब्दांच्या संख्येला, कडव्यातील ओळींच्या संख्येला ह्या सर्वांनाच अर्थपूर्ण महत्त्व प्राप्त झालेले असते. ह्या साऱ्या वरवर तांत्रिक वाटणाऱ्या गोष्टी रेग्यांच्या कवितेतून व्यक्त होणाऱ्या संवेदनाकृतीत भर घालीत असतात. अनेकदा तर रेगे दोन कडव्यांमध्ये कागदावर जी मोकळी जागा सोडली जाते तिचाही उपयोग शब्दांतील संवेदनार्थाला उठाव देण्यासाठी करून घेतात.

पहाटेचा वारा कधी डिवचत नाही
तो असतो सुखावलेल्या पांघरूणासारखा
त्याच्या दाही दिशांना असतात सुगंधाचे पल्लव
लवलव
पोपटी पाखरांच्या चलविचलीची......
( ' पुष्कळा ' पृ. ५५ )

" लवलव " ह्या शब्दातील संवेदनार्थाचे सामर्थ्य रेग्यांनी दोन कडव्यांतील कोऱ्या जागेच्या वापरातून वाढविले आहे.

रेग्यांच्या कवितेत हाताशी असलेल्या सर्व साधनांचा वापर पुरेपूर केला जातो. त्यामुळे तिच्या आस्वादकाली वाचकास अतिशय जागरूक राहावे लागते. रेग्यांनी जी एक गोळीबंद ( compact ) रूपप्रधान कविता दिली तिला अर्थातच मराठी कवितेत तोड नाही.

" पुष्कळा " (१९५९) या संग्रहापासून मात्र रेग्यांची कविता बदलू लागलेली दिसते. " पुष्कळा " नंतर रेग्यांनी " सावित्री " व " अवलोकिता " ह्या दोन लघुकादंबऱ्या लिहिल्या. ह्या कादंबऱ्यांमधून व्यक्त होणाऱ्या जाणिवा, त्याच सुमारास लिहिल्या गेलेल्या व " दुसरा पक्षी " ह्या संग्रहात समाविष्ट करण्यात आलेल्या कवितांमधून उमटलेल्या दिसतात. " पुष्कळा " नंतर रेग्यांचे लक्ष वस्तुदर्शन ( perception ) आणि वस्तूचे दर्शनबाह्य अस्तित्व यांतील नाती शोधण्याकडे, यातून निर्माण होणारे विविध ताण शोधण्याकडे लागले आहे. विषय-विषयीसंबंधाचे हे एक चिंतन आहे. रेग्यांच्या जाणिवांमध्ये स्वतःला होणाऱ्या बाह्य वस्तूंच्या संवेदनांना केन्द्रस्थान आहे. ही संवेदनाच खऱ्या अर्थाने अस्तित्वात आहे. या संवेदनांमधून आपण बाह्य वास्तव आपलेसे करतो. बाह्य वास्तवाची संवेदनाच फक्त " आपली " असते, बाह्य वास्तव मात्र आपले नसते. ह्या संवेदनेमधून जे आपलेसे करतो तेच " आपण " असतो. ती आपलीच रूपे असतात. " आपल्या ' मध्ये परस्परसंबंध नसलेले ( व बाह्य वास्तवाने सिद्ध झालेले ) कितीतरी " आपण " असतो. एकाच वेळी हे जे अनेक " आपण " आपल्यामध्ये आहेत त्यांच्या आकृती, त्यांच्यातील परस्पर ताण अभिव्यक्त करण्याचा प्रयत्न " सावित्री " आणि विशेषत: " अवलोकिता " यांतून रेग्यांनी केला आहे. ह्याच जाणिवेतून " दुसरा पक्षी " यातील बहुतेक कविता साकार झाली आहे. " पक्षी जे झाडावर गाणे गातो " ही कविता याच जाणिवेचे चित्र रेखाटते आहे.

अलीकडे रेग्यांच्या काव्यलेखनातून जे चिंतन व्यक्त होत आहे ते काव्यात्म पातळीवर कितपत जाते आहे ? " दुसरा पक्षी " या संग्रहातील कविता वाचीत असताना ही शंका सतत निर्माण होते. कमालीचे सूचकत्व, शब्दांचा केला जाणारा पुरेपूर उपयोग, त्यामुळे लाभलेले अल्पाक्षरत्व हे विशेष याही कवितेतून जाणवत राहतात. येथे शब्दांचे जे विविध अर्थ आहेत त्यांची संघटना करण्याचा प्रयत्न रेगे करतात. त्यांची " दार " ही कविता या दृष्टीने लक्षात घेता येईल. परंतु या प्रयत्नातून त्यांच्या कवितेतील प्रत्ययकारी संवेदनसगर्भता मात्र नष्ट होऊन गेलेली दिसते. शब्द-शब्दातील साधर्म्य-

वैधर्म्ययुक्त " अर्थाची " लयबद्ध अशी रचना येथे केली जाते. त्यातील मूलभूत संवेदनात्मकता नष्ट झाल्याने तिला केवळ कल्पनान्यासाची Wit ची पातळी लाभते. अनपेक्षितपणे शब्दाशब्दांतील अर्थ एकत्र आणून वाचकांना सुखद धक्के देत राहणे एवढेच येथे उरते. " दाराला फट असावी–दुसऱ्यांच्या " या प्रकारच्या Wit चा रेग्यांना मोह पडत राहतो. " Aina, प्रेमा, मग काहीही करा " या कवितेतील पुढील ओळी पाहा :

" मी उठून मला विचारलं
मी इथून कुठं जाऊं बघतो, धजतो ?
जे पांगतात त्यांना एकत्र करायला बोल
आहेत काय ?
रंगविलेली चित्रं मुळांतच हरवलेली असतात
गाण्यांना सूर असतात गायब लयीचे
वाचणाऱ्यांना आधार फक्त चष्म्याचा.
त्यांच्यातून माझी अव्यक्त हाक कुठवर जाणार ?
आणि तरीही थांबून पुनः म्हणतो
या सर्वांत निरंतर कसब असतंच की नाही ?
मग आपल्या ल्हानग्या अवतारांना कांही
अर्थ असतो का ?
अर्थ प्रश्नाला असतो, उत्तराला नसतो
जे बदलतं तें उत्तर
प्रश्न तसाच पुढे जातांनाही निरुत्तराचं सूक्त
मंत्रित असतो.
एवं आपल्याला कुठंच आसरा ठेवतां नये
प्रत्येक नव्या अवतारांतहि
कारण नव्याला अस्तित्व असतं जुन्या इतकचं
जें आहे तेंच तेवढंच.
मी होतो तेव्हां सर्व होतं
मी आहे तेव्हां सर्व आहे
मी असेन तेव्हां सर्व असेल

येथे फक्त चकित करणारी Wit उरली आहे, सूत्रमय, काहीशी संदिग्ध आणि विरोधाभासाचं नाट्य फुलविणारी ही Wit आहे. कवितेतील अनुभव कवीने भावनांगाकडून स्वीकारला पाहिजेच असा आग्रह जरी धरता येत नसला तरी त्याला कवितेतील अनुभव संवेदनाविहीन बनवता येत नाही. अनुभवातील संवेदनांग काढून घेतले की तो अनुभव उरत नाही. अशा प्रयत्नात कवितेत फक्त विधाने येऊ शकतात. रेग्यांची ही कविता अशा विस्मयचकित करणाऱ्या Wit मध्ये, Wit मधून साधलेल्या आकृतींमध्ये रस घेऊ लागली आहे.

* * *

सदानंद रेग्यांचा " देवापुढचा दिवा " हा या वर्षी प्रकाशित झालेला उत्कृष्ट कवितासंग्रह आहे. पु. शि. रेग्यांप्रमाणेच सदानंद रेग्यांची अनुभव घेण्याची पद्धतीही मराठी काव्यपरंपरेला पूर्णपणे अनोखी आहे. एका तिरक्या पातळीवरून सदानंद रेगे अनुभव टिपीत असलेले दिसतात. हा अनुभव उच्चसखल पृष्ठांच्या आरशात पडणाऱ्या प्रतिबिंबासारखा असतो. चित्र्यांच्या कवितेत अनुभवाची जी पूर्णपणे मोडतोड होते तसे येथे होत नाही. एकीकडे त्यात अनुभवाच्या लौकिक पातळीवरील अंतस्थ सलगता टिकविली जाते तर दुसरीकडे ह्या अनुभवाचा पृष्ठभाग, त्याच्या बाह्यरेषा विरूप केल्या जातात. त्यामुळे त्या अनुभवाच्या अवयवांना एक वेगळेच अनपेक्षित आणि विक्षिप्त रूप प्राप्त होते. हा विक्षिप्त अनुभव कधी विदूषकी असतो तर कधी वेडसरपणाच्या पातळीवर जातो. असे असले तरी त्यात एका गहिऱ्या आणि अस्सल दुःखाची पाळेमुळे लपलेली असतात.

जगण्याची ओढ आणि मृत्यूची जाणीव यांच्यातील लोकविलक्षण ताणांतून सदानंद रेग्यांच्या जाणिवा घडल्या आहेत. येथे प्रकट होणारे ताण हे साधे एकपदरी असत नाहीत. जगण्याची नैसर्गिक ओढ सदानंद रेग्यांची कविता नाकारीत नसली तरी जगण्यातला अंधार तिला विशेषत्वाने जाणवला आहे. आणि पुनः या " अंधारावर " एका अनाकलनीय अशा मृत्यूचा दुसरा " अंधार " आहे. अशा दोन अनाकलनीय अंधारांतून उमलणारे ताण सदानंद रेग्यांच्या समर्थ अशा प्रतिमासृष्टीने सहजगत्या पेलले आहेत. सदानंद रेग्यांची प्रतिमासृष्टी अतिशय ठसठशीत, चमकदार आणि चित्रमयी स्वरूपाची आहे. विविध पातळ्यांवरचे विरोध ( paradoxes ) ती एकदम साकार करते. प्रतिमांमधील हा विरोध अनपेक्षित, स्फोटक आणि उत्कृष्ट असा असतो.

रेग्यांनी " मृत्यूच्या कविता " ज्या पातळीवरून लिहिल्या आहेत ती पातळी मराठी कवितेला तरी नवीन आहे. ही पातळी एखाद्या कवितेत अतिशय casual, सरळ, साधे रूप घेते ( " मी मरणार नाही " ही कविता

अनुक्रमणिका

पाहा. ) तर एखाद्या कवितेत ती अनेक उपस्तरांच्या न्यासातून साधली जाते. हे उपस्तर भिन्न काळाच्या, भिन्न संस्कृतीच्या आणि भिन्न भावकृतींच्या प्रतिमान्यासाने घडविले गेले आहेत. ह्या सर्व स्तरांमधून एका भयावह जाणिवेला गहिरेपणा देणारा विक्षिप्त उपहास सतत प्रकट होत राहतो. रेग्यांच्या कवितेतील पुढील ओळी पाहा :

" हे मृत्यो, तुला आमचा कोपरापासून नमस्कार !

तू आहेस म्हणून माणसाच्या मेंदूला प्रश्नांचा ट्युमर तरी झाला आहे.

तू आहेस म्हणून देव काचेच्या कपाटात तरी आहेत.

तू आहेस म्हणून आम्हांला श्राद्धांची जेवणं तरी चापायला मिळतात.

तू आहेस म्हणून कावळ्यांना रेशनकार्डाविना तांदूळ मिळतो.

... हे मृत्यो तू विदग्ध आहेस, एकर्षी आहेस.
तू बकासुराचा खापरपणजा आहेस.
तूच खरा आदिमायेचा सत्पती आहेस.
आम्ही तुझं केळीच पान ... चटणी कोशिंबीर ...
सर्पाच्या कातेसारखी मलूल रांगोळी ...
तूच आमचं हवापाणी ... तूच आमची वेधशाळा
हे माये ! आई मुलाला पदराखाली घेते
तसं तू आम्हांला कफनाखाली घे.
आम्हाला असमृद्धी दे – असमाधान दे ... अज्ञान दे.
( मृत्यूपनिषद )

येथे येणारे हे एकाच पातळीचे भिन्न स्तर, भिन्न भिन्न स्तरांवरील भावसहचरांच्या अनेक समूहांना आवाहन करीत अनेक स्तरी, अनेक पदरी अशा अनुभवास वाचकाच्या मनात संघटित करतात. " मृत्यूच्या कविता " सारखी समृद्ध कविता क्वचितच लिहिली गेली आहे.

ज्या विशिष्ट पातळीवरून सदानंद रेगे अनुभवांचे संघटन करू पाहतात त्या पातळीत एक धोकाही दडला आहे. आणि सदानंद रेगे ह्या धोक्याला सतत टाळू शकतात असेही नाही. भिन्न आणि विरोधी पातळ्यांवरील वस्तूंच्या, घटनांच्या विक्षिप्त व अचानक संघटना साधल्या जात असताना वाचकास जे अनपेक्षिततेमुळे धक्के बसत असतात त्या धक्क्यांना एक रंजक मूल्य असते ( व या रंजक मूल्यांचा मोह कवीला होऊ शकतो). अशा वेळी अनेक भिन्न व विरोधी पातळ्यांच्या संघटना करण्याचा व त्याचा अनपेक्षित न्यास साधण्याचा प्रयत्न थोडासा योजनाबद्ध ( Schematic ) व तांत्रिक होण्याची भीती असते. अशा प्रकारच्या कवितेत पातळ्यांचे भिन्नत्व ठळठळीतपणे वाचकांच्या लक्षात आणून द्यावे लागत असते. वाचकांच्या हे लक्षात यावे म्हणून प्रत्येक पातळीवरील प्रतिमा व त्यांचा न्यासही ठळठळीत व अनपेक्षित असावा लागतो. त्यामुळे अशा कवितेतील प्रतिमा मोंगली सुभेदारांसारख्या केंद्रवर्ती सत्ता कमकुवत होताच स्वतंत्र बनू लागतात. त्यामुळे स्वतःचे अस्तित्व स्वतंत्रपणे लक्षात आणून देणाऱ्या प्रतिमांचीं असंघटित व विस्कळित मालिका हे रूप ह्या कवितांना येऊ लागते. सदानंद रेग्यांच्या " गंधर्व " ह्या संग्रहात अशी कविता विशेषत्वाने पाहावयास मिळते. त्याच्या " देवापुढील दिव्या " त हा धोका बराच टाळला गेला आहे.

* * *

१९६० पासून पाडगावकर आपल्या काव्यलेखनास एक नवे वळण लावून ते गिरविण्याचा प्रयत्न करू लागले. आजूबाजूच्या वास्तवातील कृत्रिमता, भयावह मूल्यविहीनता टिपण्याचा प्रयत्न ते करू लागले. आजूबाजूच्या वास्तवातील, व्यक्तींच्या जीवनातील, त्यांच्या कृतिउक्तींतील विसंगती साकार करताना एक उपहासगर्भ असा सूर या कवितांतून व्यक्त होऊ लागला.

हळव्या निरागस अशा निसर्गप्रतिमांच्या रचनेतून एक मुग्ध, तरल, नाजूक अशी मनोवस्था साकार करणाऱ्या त्यांच्या यापूर्वीच्या कवितेच्या कक्षा अतिशय मर्यादित होत्या. पाडगावकरांनी सुरुवातीला एक नवे अनुभवविश्व मराठी कवितेत रुजविले असले तरी आपल्या अनुभवांची, मनोवस्थांची संघटना शोधण्याची प्रेरणा त्यांच्या कवितेतून हळूहळू लुप्त होत गेली, आणि त्यांची जागा निसर्गविषयक काही पक्क्या श्रद्धांनी ( convictions ) घेतली.

१९६० पासून मात्र पाडगावकर सभोवतालच्या वास्तवात रस घेऊ लागले. परंतु असे असूनही त्यांच्या कवितेने खऱ्या अर्थाने नवे अर्थगर्भ वळण कितपत घेतले ? हा प्रश्न सतत निर्माण होत राहतो. पाडगावकरांच्या

कवितेतील तपशील बदलला, सूर बदलला, परंतु त्यांच्या जाणिवांना नवे धुमारे कितपत फुटले ? त्यांच्या अनुभव घेण्याच्या पद्धतीत काही मूलभूत बदल झाला काय ? हे प्रश्न मात्र ह्या कवितेत सतत उभे राहतात.

पाडगावकरांच्या ह्या कवितेचा पृष्ठभाग खरवडताच तिच्या मागील जाणिवा बदललेल्या नाहीत हे लक्षात येते. निसर्ग—एका विशिष्ट रूपातला निसर्ग हे पाडगावकरांचे एक श्रद्धास्थान बनून चुकले आहे. ह्या निसर्गाला त्यांच्या जाणिवांमध्ये श्रेयसाचे, मूल्याचे स्थान प्राप्त झाले आहे. हा निसर्ग म्हणजे प्रकाशाची—अमृताची वाट आहे. तो मानवाच्या क्षुद्रत्वावर, यांत्रिकतेवर, मूल्यविहीनतेवर, एक रामबाण इलाज आहे. ह्या श्रद्धेतून पहात राहणे येथे पाडगावकरांना टाळता आलेले नाही. इतिहास, विज्ञान, खगोल, भूगोल वगैरे वगैरे शास्त्रांत पारंगत होऊनही आषाढाच्या पहिल्या दिवशी कोसळणाऱ्या सहस्र धारांची जादू माणसाच्या डोळ्यांना दिसत असूनही खऱ्या अर्थाने दिसलेली नसते म्हणून खंत करायला लावणारी ही श्रद्धा आहे. " विदूषक "मध्ये नेतेपण सोडून झाडांची भाषा जाणवून घेणाऱ्या रावसाहेब पटवर्धनांना वंदन आहे; घृणास्पद, क्षुद्र जीवन जगणाऱ्या व बसच्या रांगेत उभ्या असणाऱ्या माणसाचे अचानक " छोट्याशा हिरव्यागार काचेसारख्या बागेत " स्वतःला हरवून जाणे आहे; झोपेतून उठताच खिडकीतून " निळ्या तुकड्याचे " दर्शन घडल्याने गावेसे वाटू लागणाऱ्या, मांजराच्या पिलासारख्या कपाला " हॅलो " म्हणावे असे वाटणाऱ्या माणसाचे चित्र आहे.

ज्यांची-हृदयें झाडांचीं
त्यांनाच फक्त फुलें येतात.
तेच वाढतात, प्रकाश पितात,
तेच ऋतू झेलून घेतात

म्हणून अशांना " व्याख्यानबाज कंठांची " व " आध्यात्मिक घंटांची " गरज नसते; अशी त्यांची भलावण आहे. एकूण जीवनातील लौकिक दुःखांवर, अमानुष क्षुद्रतेवर, " निसर्ग " हे श्रेयसच फक्त उत्तर आहे ही जाणीव या संग्रहातील कवितांत प्रामुख्याने व्यक्त झाली आहे. आतापर्यंत पाडगावकरांची कविता निसर्गचित्रांबरोबर निसर्गाचे महत्त्व पटवू पाहात होती, तर सध्या ती निसर्गवंचित व मानवनिर्मित जीवनाचे क्षुद्रत्व पटवून देऊन पर्यायाने निसर्गाचे महत्त्व सिद्ध करीत आहे.

अशा या निसर्गाशेजारी " मानवता " हे आणखी एक श्रेयस आहे. तथाकथित " मानवता " आणि नैतिक पातळीवरील पारंपरिक मानवी मूल्ये यांचे पाडगावकरांना असलेले आकर्षण येथे स्पष्ट झाले आहे. आत्मवंचना करणाऱ्या नकली माणसांच्या मध्ये अनामिकपणे, अज्ञानपणे वावरणारा, किरकिरणाऱ्या हुरुख्या पोरांना धुणारा, स्वतःशीच गुणगुणणारा, पोलिओने पाय गेलेल्या एका अनोळख्या मुलाशी हात हलवून हसणारा असा हा खराखुरा " माणूस " आहे. अर्थात हाच " माणूस " कवीतही जागृत झालेला आहे; जीवनातील मूल्यविहीनतेला टिपतो आहे; तिचा उपहास करतो आहे. या जगात दुर्दैवाने या माणसाला " विदूषकी " करावी लागत आहे. परंतु अशा वेळी त्याच्या " शेपटीला " एक " मुंगी " डसते आहे, कमरेत वाकून हसताना त्याची जीभ कडू होते आहे; आणि हरवून गेलेल्या मुलासारखे त्याला रडू येते आहे. जेव्हा एकीकडे जथ्या-जथ्याने माणसे " व्यापारी रेडिओने शिंकरलेली गाणी " ऐकताना दिसतात व दुसरीकडे मात्र फुटपाथवर " केशवसुतांची समग्र कविता " चार आण्यात मिळताना दिसते तेव्हा साहजिकच कवीच्या मनातील या " माणसाला " खंत वाटते.

उथळ स्वरूपाच्या आणि पारंपरिक मूल्यांच्या जाणिवेतून पाडगावकरांची ही उपहासगर्भ कविता जन्माला आली आहे. यातही पाडगावकरांची या मूल्यांवर अविचल अशी श्रद्धाही आहे. त्यामुळे ह्या कवितांतील उपहास अभिनिवेशी बनला आहे.

मंगेश पाडगावकरांच्या कवितेबाबत जे घडते आहे तेच एका वेगळ्या प्रकारे नारायण सुर्व्यांच्या कवितेबाबतही ( ' माझे विद्यापीठ ' बाबतही ) घडते आहे. तथाकथित मानवता, तथाकथित मानवी मूल्ये गृहीत धरून पाडगावकर आपल्या कवितेतून बाह्य वास्तव संघटित करू पाहतात. नारायण सुर्वेही एका स्थिरपद व बंदिस्त अशा मार्क्सवादी भूमिकेवरून बाह्य व आंतर वास्तव संघटित करू पाहतात. मराठी कवितेत जे वास्तव कधीच डोकावले नाही असे एक वास्तव या कवितेतून व्यक्त होत आहे. ( आणि ह्या वास्तवातील नावीन्याला एक रंजक मूल्य आहे. ) आपल्या कवितेतील वास्तवाचे नावीन्य सुर्व्यांच्याही लक्षात आले असावे कारण ही कविता या नावीन्यात बराच रस घेते आहे.

अनुक्रमणिका

सुर्व्यांच्या कवितेतील जाणिवांनी अजून सुसंघटित रूप धारण केलेले नाही. त्यांच्यात बऱ्याच वेळा परस्परछेदक पदर उमटत राहतात. सुर्व्यांचा व्यक्तीच्या, व्यक्तिसमूहाच्या सामर्थ्यावर विश्वास आहे. त्यामुळेच मानवाला क्रांतिप्रवृत्त करण्याची धडपड त्यांची कविता करते. ती क्रांतीची स्वप्ने रेखाटू पाहते. ह्या स्तरावरील सुर्व्यांच्या जाणिवा मार्क्सवादी विचारांनी भारलेल्या आहेत. त्या अंतिम आणि संशयातीत आहेत अशी सुर्व्यांची श्रद्धा असल्याने त्यांचा शोध घेण्याची त्यांना कधी गरजच वाटत नाही असे दिसते.

वरील पातळीला छेदक अशा दुसऱ्या पातळीवर मात्र सुर्वे संपूर्ण सांस्कृतिक परंपरेत आणि संपूर्ण समष्टीत स्वतःच्या अस्तित्वाचा, स्थानावर शोध घेऊ पाहात आहेत. सर्वसामान्यपणे आजच्या कवितेतील जाणिवांचा जो सूर आहे तोच येथेही आहे. घरदार, गणगोत नसलेल्याच्या, सांस्कृतिक पूर्वसंचिताशी कसलेही नाते नसलेल्यांच्या या जाणिवा आहेत.

वाढले म्हणतात पृथ्वीचे वय, संस्कृतीचेही, फक्त
वयेच वाढत गेली सर्वांची.
छान झाले. आम्हीही वाढतो आहोत नकाशावर
गफलत खपवीत जुळाऱ्याची.

ह्या ओळींमधून जी एक जाणीव व्यक्त होते आहे तिला मार्क्सवादी श्रद्धा सतत छेद देताहेत असे सुर्व्यांची कविता वाचताना वाटत राहते.

सुर्व्यांची कविता प्रामुख्याने कथात्म अंगाने लिहिली जाते. त्यामुळे तिच्यात तपशीलाला अतिशय महत्त्व प्राप्त होते. ही कविता विविध व्यक्ती, त्या व्यक्तींच्या जीवनातील घटना यांचे एक उत्कृष्ट आणि गोळीबंद चित्र जेव्हा रेखाटते तेव्हा ती एक उत्कृष्ट अस्सल रूप धारण करते. येथे ती व्यक्ती त्यांच्या सभोवतालचे जीवन, त्यांचे भावजीवन, त्यांची मूल्ये यांच्यातील अनेक अदृश्य नाती टिपते. "सत्य" "पाणी घे" "वरं कारे पोरा!" "पोष्टर" यासारख्या मोजक्याच कविता ह्या पुस्तकी श्रद्धांच्या चिमटीतून निसटतात. उरलेली कविता मात्र असंघटित, वक्तृत्वपूर्ण, प्रदर्शनवृत्तीची वाटत राहते.

परंतु हे केवळ मंगेश पाडगावकरांबद्दल किंवा सुर्व्यांबद्दलच होते आहे असेही नाही. अगदी अलीकडची उपहासगर्भ कविताही कुठल्या ना कुठल्या भूमिकांवरील कवीच्या अविचल श्रद्धेमुळे अभिनिवेशी, वक्तृत्वपूर्ण, प्रदर्शन प्रवृत्तीची बनलेली दिसते. आजची ही कविता प्रचलित पारंपरिक मूल्ये नाकारू पाहणारी "विद्रोही" कविता आहे. जी मूल्ये नष्ट होऊ लागली म्हणून पाडगावकरांना खंत वाटते तीच मूल्ये निरर्थक म्हणून आजची कविता नाकारते आहे. ह्या कवींना केवळ मूल्येच नाहीत तर मानवी अस्तित्व, त्याच्या सभोवतालच्या सर्व घटना आणि वस्तूही निरर्थक वाटत आहेत. येथे ही जाणीवही पाडगावकरांच्या जाणिवांसारखी पक्की, अविचल आणि स्थिरपद श्रद्धा बनली आहे. एखाद्या पंथाच्या आंधळ्या सहचराच्या भूमिकेवरून ही जाणीव व्यक्त होत आहे. त्यामुळे प्रदर्शनवृत्ती, अभिनिवेशी वक्तृत्वपूर्णता, नाटकी भावविवशता यांनी ह्या कवींची कविता जागोजाग डागाळली गेली आहे. आपली पंथीय भूमिका जाहीर करण्याची वृत्ती वसंत आबाजी डहाके यांच्या "योगभ्रष्ट" (सत्यकथाः मे १९६६) या कवितेतील पुढील ओळींमधून दिसून येते.

असेच बसून राहायचे अनंतकाळ
सारेच अर्थशून्य. निरर्थक. निरर्थक......
......धर्म, नीति, राष्ट्र, संस्कृति, विश्वसंघटना
कीर्ति-संपत्ति
ह्या सर्व मूर्खपणाच्या गोष्टी आहेत......
......नो ॲटॅचमेंट
सर्वांपासून दूर अलग
भयंकर एकटेपणा. जिवाला जाळणारा
(योगभ्रष्ट)

अशी प्रत्यक्ष विधाने करून घाईघाईने आपल्या तथाकथित जाणिवांचे प्रदर्शन केले जाते व त्यांना, भडक, वक्तृत्वपूर्ण अशा प्रतिमांची पेरणी करून फुसक्या भावविवशतेने नटविले जाते—

सूर्य दिवस चराचरा कापीत जातो
सारा अवकाश रक्ताने भळभळतो

अशा भडक नाटकी प्रतिमा ह्या कवितांमधून भेटू लागतात.

आजची ही कविता वास्तव जीवनाच्या तपशीलातील सवंग नाट्यावर जगत असलेली दिसते. वसंत दत्तात्रेय गुर्जर यांची "आम्ही माणूस म्हणून जन्माला आलो"

अनुक्रमणिका

( असो—पृ. १६० ) ही कविता आयुष्यातील "रूटीन" चा खूपसा निरर्थक तपशील देते. आणि अधूनमधून " आम्ही माणूस म्हणून जन्माला आलो चांगलं झालं" ह्या पालुपदाने सवंग तांत्रिक उपहास साधू पाहते.

असाच निरर्थक तपशील सुधीर कोलटकर यांच्या " रस्ते " (असो–पृ. १६२) ह्या कवितेतही आला आहे–

महालक्ष्मीच्या रस्त्यावर झिजते रामनाम

ही ओळ वाचताच त्यातील सूक्ष्म विरोधाभासाने आपल्या अपेक्षा वाढतात पण पुढील

आम पावलांच्या खाली जाते चिरडलें

हे स्पष्टीकरण ह्या विरोधाभासाच्या कक्षा गोठवून टाकते आणि मग उरतो तो कविता फुगविणारा उघड ( obvious ) तपशील–

कोल्हापूरचा गूळ सौराष्ट्रात विकतात. साईबाबाची कृपा.
साईबाबाची खिन्न मूर्ती फुलांनी सजलेली.
उदबत्तीच्या वासात गुदमरते.

हा सारा तपशीलही कधी भावविवशतेसह तर कधी विरोधी पक्षाच्या जहाल अग्रलेखाच्या भाषेतील वक्तृत्व-पूर्ण शैलीत येत राहतो.

काही वेळा तपशीलाऐवजी कवितेत " तात्त्विक प्रश्न " उपस्थित करून कवितेला एक व्याजगंभीर रूप दिले जाते.

क्षुद्रातिक्षुद्र माणसांच्या या जगात मी जन्माला आलो
जगावें कसे ?–हाही माझा प्रश्न नाही
मला पूर्ण आयुष्याचा अर्थ हवा आहे.
मी जगतो कां ?
तू जन्मलास कां ?
जगणे अपरिहार्य आहे काय ?
( 'संपूर्ण आयुष्याचा अर्थ–' शरद साटम.
सत्यकथा जून १९६६ )

आजची ही कविता वाचताना प्रामुख्याने जाणवते ते हे की आजूबाजूच्या घडामोडींबद्दल व प्रचलित कवितेच्या स्वरूपाबद्दल एक तीव्र असंतोष येथे धुमसतो आहे. ही कविता " विद्रोही " " मूर्तिभंजक " बनू पाहते आहे. प्रचलित जीवनाचा, मूल्यांचा उपहास करू पाहते आहे. परंतु ही कविता लिहिणाऱ्या कवींमध्ये खास त्यांचेच असे सुसंगत चिंतन नाही. प्रचलित जीवनाबद्दलच्या असंतोषाच्या मर्मस्थानांचा शोध घेण्याची त्यांना फिकीर नाही. कुठेतरी रेडीमेड संकल्पना मिळाल्या आहेत व आपल्या जीवनातल्या वास्तवातील विसंगती उघड उघडपणे दिसताहेत. तेव्हा ह्या रेडीमेड संकल्पना आणि सभोवतालच्या वास्तवातील तपशील यांचे लग्न लावून देण्याची घाई ह्या कवींना झाली आहे. तसेच ह्या सर्वांच्या लेखनामागे कवितेच्या प्रचलित रूपापेक्षा वेगळ्या रूपाची स्वप्नेही नाहीत. एक तर ही कविता प्रचलित कवितेचे तथाकथित काव्यात्म रूप नाकारते पण सरळ सरळ " गद्य " च लिहिते. किंवा या तथाकथित योजनाबद्ध ( schematic ) कवितारूपात आपल्या जाणिवा बसवून एक कलाविहीन तडजोड साधते.

खरे म्हणजे आजची कविता प्रामुख्याने योजनाबद्ध ( schematic ) स्वरूपाची कविता आहे. येथे कविता लिहिताना बारीकसारीक कोरीव काम केले जाते. कवितेच्या घाटात ढोबळ साधर्म्ये—वैधर्म्ये टिपून एक बटबटीत लय साधली जाते. त्यामुळे ही कविता Wit च्या पलीकडे फारशी जात नाही. पुढील कविता पाहा :

एकदा हातातल्या रेषाच हरवल्या
आणि झाले ते रिकामे अगदीच
झाडांची पानेही हळहळली
त्यांच्या जाळीदार अंगात व्यथा तीच.
हातांची आता झाली माती माती
जिच्यावर पानांचे ढीग जमती
( एकदा–राजा राजवाडे
" सत्यकथा " ऑगस्ट १९६६ )

हातावरच्या रेषा, पानावरच्या रेषा, माणसाची कबर आणि त्यावर पुंजावणारी पानगळ यांतील एक साधर्म्य व्यक्त करण्यात ही कविता समाधान मानते. थोडीबहुत चिंतनगर्भता, थोडीबहुत भावनिकता पेरायची व साधर्म्य-वैधर्म्याची एक तालबद्ध आकृती रचायची अशी ही योजनाबद्ध कविता आज प्रामुख्याने लिहिली जाते.

पाडगावकरांची अलीकडील कविता काय, किंवा पाडगावकरांच्या जाणीवविश्वाशी ज्यांचा काहीही संबंध नाही अशी आजच्या बहुतेक कवींची कविता काय ह्या सर्वच कवितेचा मूलभूत आकार एकच आहे. ही सर्व कविता सामान्य दर्जाची आहे. ही काही वेळा भाव-

विवश असते तर काही वेळा निर्जीव योजनाबद्ध असते. ही कविता कधी पारंपरिक मूल्यांच्या संदर्भात उपहासगर्भ बनते तर काही वेळा पूर्वगृहीत ( presupposed ) पण नव्या अशा जाणिवांच्या संदर्भात उपहासगर्भ बनते. या सर्वांचा परिणाम असा होतो की ही कविता भावविवश, वक्तृत्वपूर्ण, अभिनिवेशी, प्रदर्शनदृष्टींची बनते.

या सर्वांचे कारण असे की, प्रथितयश कवींच्या जाणिवांना, भाषेला, त्यांच्या कवितेच्या घाटाला स्थिरपद अभिनिवेशी रूप आले आहे तर आजच्या कवींनी खऱ्या अर्थाने कवितेच्या रूपाविरुद्ध बंड केलेलेच नाही. हे बंड त्यांना करावेसे वाटले नाही कारण त्यांच्या पूर्वगृहित जाणिवांना व्यक्त करायला पुरून उरणारे हे प्रचलित कवितारूप आहे.

आजच्या ह्या आकारविहीन कवितेत दिलीप चित्रे यांनी आपल्या कवितेचे सत्त्व सतत टिकवून ठेवले आहे. ह्या कवितेच्या मागे जशा नव्या जाणिवा आहेत तसेच कवितेला तिची अशी भाषा आणि रूप आहे. चित्र्यांची कविता ही खऱ्या अर्थाने anti-romantic आहे. चित्रे एका मूल्यनिरपेक्ष, मूल्यातीत भूमिकेवरून अंतर्बाह्य वास्तवाचे संघटन करू पाहतात. वस्तूवस्तूंमधील संबंधविहीनतेची एक जाणीव ह्या कवितेतून व्यक्त होताना दिसते. बाह्य वास्तव आणि व्यक्तीचे अस्तित्व यात कसलाच संबंध गवसू नये आणि एका परक्या अनाकलनीय आणि अज्ञात प्रदेशात येऊन पडलो आहोत असे वाटावे याची जाणीव ही कविता सतत करून देत राहते. ही जाणीव व्यक्त करू पाहणारी कविता एका वेगळ्याच प्रतिमांच्या भाषेत बोलते आहे. स्वप्न-प्रतिमासारख्या प्रतिमा चित्र्यांच्या कवितेत येतात. स्वप्न--प्रतिमा ह्या वास्तवातील वस्तूंची ओळख पटविणाऱ्या परंतु एका अनोळख्या, विरूप रूपातील प्रतिमा असतात. त्यांचे रूप, त्यांचे रंग, त्यांची प्रयोजने ही सारीच बदलून गेलेली असतात. चित्र्यांची कविता वाचताना आपण अशा प्रतिमांच्या सहवासात असतो. ह्याबरोबरच शब्दांच्या न्यासातून, शब्दांत केल्या जाणाऱ्या बारीकसारीक बदलातून चित्रे भाषेची अपरिचित मोडतोड करतात. तसेच वेगवेगळ्या पातळ्यांवरील अनेक विशेषणांचे संयोगीकरण चित्रे आपल्या भाषेत साधू पाहतात. अनेकदा तर संदिग्ध आणि अरूप ( abstract ) विशेषणाचा समूह आपल्या समोर येत राहतो. भाषेची ही मोडतोड अरूप व गुंतागुंतीच्या जाणिवांना साकार करण्यासाठी होत राहते. आपल्या जाणिवांमधील मूलभूत गुंतागुंत ( complexity ) एकदम व्यक्त करण्याच्या धडपडीतून चित्र्यांची ही भाषा सिध्द होते आहे. त्याचा परिणाम असा होतो की अनेकदा चित्र्यांची भाषा, त्यांची प्रतिमासृष्टी ह्यांच्यातील संवेदनसंस्कारक्षमता नष्ट होऊन जाते. आपण जेव्हा ही समजावून घेऊ लागतो तेव्हा ही कविता दर्शनाच्या ( perception ) पातळीवर न येता एकदम बोधनेच्या ( cognition ) पातळीवर जाते. वाचक शब्दाशब्दांची उकल करीत बसतो आणि त्याच्या आस्वादात सलग अनुभव उभा राहात नाही. पुढील ओळी पाहा :

> शून्यातिरेकात विस्तारलेले स्मृतिरूप आयुष्य
> म्हणजे माझ्या लोभी डोळ्यांचे अवास्तव डोहाळे
> भिकेचे.....

अशा ओळी जेव्हा चित्रे लिहितात तेव्हा अर्थातच ती कविता उरलेली नसते; प्रतिमांच्या आधारे एका अरूप विचार कोरलेला असतो.

१९६६ साली चित्र्यांची " शक्तीची प्रार्थना " ही एक महत्त्वाची कविता सत्यकथेच्या सप्टेंबर १९६६ च्या अंकात प्रकाशित झाली आहे. येथे चित्र्यांनी या थंड, मृत आणि परक्या वास्तवाला क्षणभर जिवंतपणा देणारी " शक्ती " साकार केली आहे. ज्या शक्तीची येथे प्रार्थना आहे. ती शक्ती सर्जनाचे प्रतीक आहे. ते एकाच वेळी सर्जनाचे आणि मृत्यूचे प्रतीक आहे. जीवनातील मृत्यूतर शांती ह्या शक्तीच्या आगमनाने नष्ट होते आहे. हा मृत्यू क्षणभर नष्ट होतो. ( आणि ह्या शक्तीच्या मृत्यूबरोबरच हा मृत्यू पुन: जिवंत होतो आहे. ) या कवितेत म्हणूनच " उलथून ", " उघड ", " पालथा ", ह्या कृतिप्रतिमा आल्या आहेत. शक्तीच्या आगमनाने " स्त्री " ही संपूर्णलेली असते. एरव्ही मात्र " थंडस्तनी " " मूकगुप्त पाण्यागत " असते व पुरुषाचा बाहुपाश " अस्तंगत " असतो.

( संभोगक्रियेद्वारा जाणवलेल्या ) शक्तीच्या जागृतीत स्वत:च्या अस्तित्वाच्या जिवंतपणाची जाणीव होते आहे ( एरव्ही माणूस " स्वर्गीय थडगी " ) आणि ह्या जिवंतपणाची जाणीव ही मुक्तीचीही जाणीव आहे. एका अर्थाने ती मृत्यूचीच जाणीव आहे. येथे " शक्ती " ही व्यक्तीच्या अस्तित्वाचे नियामक तत्त्व आहे. " थडगी

उघडली जाणे " " गर्भाशय उघडणे " " वंदिस्त ज्योतिश्चक्र उघडणे " या प्रतिमामधून ही जाणीव व्यक्त होते आहे. जिवंतपणा आणि मृत्यू, सातत्य आणि विनाश यावद्दलची एक अतिशय गुंतागुंतीची जाणीव ह्या कवितेत साकार होते आहे. पुढील ओळी पाहा:

सर्वांगीण विराट आंधळा संचार आता संपव
आता संपव हे अंधार आणि प्रकाश
आता तोंड वोटावोटाच्या पेरांतले पार्थिव सांधे
आता फाडून काढ उभी सवंध अंगाची कातडी
-दिशाभूल.

अशी ही मुक्तीची जाणीव आहे; सर्जनात प्रकट होणारी.

चित्र्यांची ही anti-romantic जाणीव ही जशी अस्सल आहे तशीच वि. ज. वोरकरांच्या " प्रेषित " ( " पुन्हा कविता " पृ. ६ ) ह्या कवितेतील romantic जाणीवही अस्सल आहे. वोरकरांनी जी उंची " प्रेषित " मध्ये गाठली ती नंतर त्यांच्या कवितेत पुनः दिसली नाही. " प्रेषित " ह्या त्यांच्या प्रदीर्घ कवितेतही सर्जन-प्रेरणेचे दर्शन घडविले आहे. ह्या सर्जनातून व्यक्तीव्यक्तींमध्ये एकात्मतेचा प्रत्यय येतो आहे. " सूर्य " ही सर्जनाची प्रतिमा या कवितेत भिन्न भिन्न परिमाणांसह अभिव्यक्त झाली आहे. ही जशी सर्जनाची तशीच चिरंतनत्वाचीही प्रतिमा आहे. सूर्य हा सर्जनाचे आदिकरण आहे, तो सर्जनाचे मूलद्रव्य आहे. आणि सूर्य म्हणजेच आपण सर्व आहोत अशी ही जाणीव या कवितेतून साकार होते आहे. वोरकरांची ही कविता अनेक ठिकाणी स्पष्टीकरणात्म होते हे जाणवत जरी असले तरी romantic जाणिवांची ती एक समर्थ प्रतीती आहे हेही मान्य केले पाहिजे.

१९६६ साली प्रकाशित झालेल्या कवितांच्या आधारे आजच्या मराठी कवितेच्या स्वरूपाचा अजमास घेण्याचा प्रयत्न येथे केला आहे. दुय्यम दर्जाची कविता ही सतत निर्माण होत असते व तिच्या आधारे कुठल्याही भाषेतील कवितेच्या पातळीची कुंडली मांडणे दिशाभूल करणारी ठरते. परंतु जेव्हा विशिष्ट काळातील कवितेच्या स्वरूपावर वोलावयाचे असते तेव्हा हे वोलणे संख्येच्या भाषेतच करावे लागते. चांगली कविता किती प्रमाणात लिहिली जाते आहे ? ह्याच प्रश्नाचे उत्तर शेवटी शोधावे लागते. आणि या दृष्टीने चांगल्या कवितांचे प्रमाण सध्या तरी व्यस्त आहे असेच म्हणावे लागेल.

• • •

## साभार-स्वीकार

**नरेंद्र कोळी** ( कथाकाव्य )—वि. आ. मोडक, श्रीविद्या प्रकाशन, पुणे २; २ रु.

**गंधर्वराजाची गोष्ट**—शं. रा. देवळे व सौ. नलिनी देवळे, श्रीविद्या प्रकाशन, पुणे २; २ रु.

**आई स्वप्नात रंगली** ( कविता )—सौ. सुलोचना घोटीकर, युवा प्रकाशन संस्था, कल्याण; ३ रु.

**राम कोदंडधारी**—दे. शं. लुकतुके, अ. वि. गृह प्रकाशन, पुणे २; ३ रु.

**ंव**—ल. क्ष्मी. कां. त. रा. वो. एकशे सात, पहिली पठाण स्ट्रीट, मुंबई नं. चार, ५० पैसे ( पटले तर ), अंक तिसरा.

**हिंदु-हृदय** ( त्रैमासिक )—संपा. वाळशास्त्री हरदास, महाल, नागपूर २; वा. वर्गणी ५ रु.

**स्नेहदीप** ( वार्षिक )—संपा. पां. र. घायाळ, लक्ष्मीविष्णु स्टाफ, सोलापूर, वर्ष ७, अंक ७.

**आभार** ( वार्षिक )—संपा. पुरुषोत्तम पाटील, श्री शिवाजी विद्याप्रसारक संस्थेच्या साहित्य-वाणिज्य-विज्ञान यांचे संयुक्त वार्षिक, वर्ष १२, धुळे.

**अहमदनगर कॉलेज** ( वार्षिक )—अंक २१, १९६७-६८.

अनुक्रमणिका

# १९६६ मधील मराठी कादंबरी

● उषा हस्तक ●

गेल्या वर्षी–१९६६ साली प्रसिद्ध झालेल्या कादंबऱ्यांचे ऐकूण स्वरूप न्याहाळल्यानंतर एक गोष्ट आरंभीच कबूल करायला हवी ती ही की, अवतीभवतीचे जग ज्या वेगाने बदलते आहे त्या वेगाची दखल मराठी कादंबरीला अजूनही घ्यावीशी वाटत नसल्यामुळे की काय, ती काही दशके मागेच रेंगाळल्यासारखी भासते आहे. व्यक्तींच्या राजकीय, सामाजिक आणि सांस्कृतिक जीवनामध्ये आज ज्या प्रचंड उलथापालथी घडत आहेत, मूल्य–विवेकाचा अढळ लगाम हातातून निसटल्यामुळे म्हणा किंवा गवसत नसल्यामुळे म्हणा, छोट्यामोठ्या व्यक्तींचे जे एकसारखे तोल जात आहेत, त्यातून कितीतरी करुण आणि गंभीर, हास्यास्पद आणि हास्योत्पादक जीवन-नाटये प्रत्यही जन्माला येत आहेत. परंतु मराठी कादंबरी ह्या अशा जीवननाट्यांकडे पाठ का करू इच्छित आहे, हेच उमगत नाही. एवढे खरे की अशा स्वरूपाची जीवन-नाटये कादंबरीच्या फलकावर चित्रित करायची असतील तर त्यासाठी वेगळी पूर्वतयारी करावी लागेल. गंजलेल्या बुद्धीच्या आणि बोथटलेल्या मनाच्या साह्याने ही पूर्वतयारी करता येणार नाही; त्याचप्रमाणे निर्धोक पावले टाकण्यासाठी मळलेली वाटही समोर असणार नाही.

नव्या, मोठ्या पल्ल्याच्या आणि अथांग अशा अनुभव-कक्षांना स्पर्श करण्याचे, वजनदार अशा जीवन-नाट्यांना पेलण्याचे मराठी कादंबरीच्या अंगचे सामर्थ्य म्हणावे तसे वाढीला का लागत नाही, याचा पुन्हा पुन्हा बारकाईने विचार करायला हवा. याची जी कारणे लक्षात येतात ती अशी : ( १ ) व्यक्तिगत (अनुभवांना स्वतःच्या जीवनांतील प्रत्यक्षानुभवांना ) कल्पनाशक्तीच्या साह्याने थोडेसे ताणले की कादंबरी सहज लिहिता येते अशी बऱ्याचशा कादंबरीकारांची समजूत दिसते. ज्या लेखकाचे व्यक्तिगत अनुभव–विश्व अतिशय समृद्ध असते, त्या लेखकाने अशा पद्धतीने लिहिलेली कादंबरी, 'कादंबरी' या संज्ञेला खऱ्या अर्थाने पात्र ठरेलही. ( केवळ अनुभव-विश्व समृद्ध आहे म्हणून त्या लेखकाला कादंबरी लिहिता येईल, असे इथे सुचवायचे नाही; कादंबरी-रूप घेण्यास समर्थ असलेल्या अनुभवांची निवड करण्याचे, त्यांची मांडणी करण्याचे ज्ञान त्याला हवेच. ) परंतु प्रत्येक कादंबरीकाराचे व्यक्तिगत अनुभव-विश्व संपन्न असतेच असे नाही. ते तसे नसतानादेखील जे कादंबरीकार या पद्धतीने कादंबऱ्या लिहीत राहतात, त्यांच्या लेखनाला, स्वाभाविकपणेच झपाटयाने साचेबंदपणा येऊ लागतो आणि अनुभवक्षेत्रही मर्यादितच राहाते. ज्या कादंबरीकारांना आपले लेखन साचेबंद होत असल्याची जाणीव होते, ते कादंबरीकार कादंबरीलेखनच खंडित करतात.

( २ ) ज्या वेळी कादंबरीकाराला व्यक्तीमनाहून अधिक विशाल अशा समाजमनाचा वेध घेण्याची इच्छा असते, त्या वेळी गाठीशी असलेल्या व्यक्तीगत अनुभवाच्या शिदोरीवर भरवसून त्याचे भागत नाही. समाजाच्या विविध अंगांचा अभ्यास अशा वेळी आवश्यकच ठरतो. परंतु म्हणूनच की काय, मराठीत समाज-मनाचे दर्शन घडविणाऱ्या कादंबऱ्या फारशा निपजतच नाहीत. या दिशेने काही तुरळक प्रयत्न झालेच तर त्यांचे स्वरूप कसे असते ते पुढे पाहू.

( ३ ) कलावंताच्या संवेदनाशील मनाने टिपलेल्या अनुभवाचे रूप स्थूल आणि ढोबळ कधी नसतेच. त्यांची बुद्धी जर तल्लख आणि जागरूक असेल तर ती या अनुभवाचा अर्थ उलगडण्याचाही एकसारखा प्रयत्न करीत असते. बहुसंख्य मराठी कादंबऱ्यांच्या अंतरंगाचा शोध घेतल्यानंतर, संवेदनाशील मनाच्या आणि तल्लख बुद्धीच्या कादंबरीकारांची वाण सहज निदर्शनास येण्यासारखी आहे.

( ४ ) कलादृष्टीपेक्षा नैतिक मूल्यांची मराठी कादंबरीकाराच्या मनावरील पकड अधिक दृढ आहे. नैतिक मूल्यांची मनावरील दडपणे बाजूला झुगारून देऊन विमुक्त मनाने अनुभवाचा आकार शोधण्याचे त्यांना जमतच नाही. ( अर्थात काही चारदोन अपवाद आढळतील, नाही असे नाही. ) मग तो व्यक्त करण्यासंबधी

बोलायलाच नको. उदात्तीकरणाच्या प्रक्रियेचा मोह त्यांना होत असतो, तोही या दडपणामुळेच.

( ५ ) जीवनानुभवातील नाट्य अचूक पकडण्यासाठी व व्यक्त करण्यासाठी कादंबरीकाराला जी साधना करावी लागते, तिचाही अनेक कादंबरीकारांच्या ठायी अभावच दिसून येतो.

वर जी चार-पाच कारणे नमूद केलेली आहेत त्यांचे स्वरूप अधिक स्पष्ट व्हावे म्हणून, १९६६ साली प्रसिद्ध झालेल्या काही कादंबऱ्यांचा उदाहरणादाखल विचार करावयाचे ठरले आहे.

एका भारतीय मनाने पाश्चात्त्य जीवनाचा वेध कोणत्या प्रकारे घेतला असेल, यासंबंधीच्या कुतूहलापोटी, रमेश मंत्री यांची " महानगर " ही कादंबरी वाचली. परंतु, त्यांनी ' महानगर'चा जो वेध घेतलेला आहे तो अशा प्रकारे :

" त्यानं ( श्रीकांतनं ) यंत्राचं झाकण उघडलं. गाठोड्यातला एक एक कपडा आत टाकला. मग पाण्याचं बटन दाबलं, मग साबणाचं, मग कपडे घुसळण्याचं. कपडे धुतले जाऊ लागलेले यंत्राच्या कांचेतून दिसू लागले, तेव्हा तो खुर्चीवर थोडा वेळ बसला. मग पुनः तीन बटनं दाबली. कपडे धुवून बाहेर आले. ते त्यानं कपडे वाळवण्याच्या यंत्रात टाकले. आणि थोडेसे सुके झाल्यावर पुनः त्यांचं बंडल बांधून तो घरी जायला निघाला. "

रमेश मंत्री यांची ही संपूर्ण कादंबरीच अशा प्रकारच्या––म्हणजे लंडनमध्ये त्यांना आलेल्या नव्हाळीच्या ––अनुभवांनी खच्चून भरलेली आहे. हे अनुभव कादंबरीरूप घेण्यास समर्थ आहेत की काय, याचा विचार करण्याची गरज त्यांना भासलेली दिसत नाही. " महानगर " असे नुसते व्यापक नाव दिल्याने काय होणार ? वृत्तपत्रव्यवसायाच्या शिक्षणासाठी लंडनला गेलेला श्रीकांत तिथे राहिला कसा, पैसे मिळविण्यासाठी सुट्यांमध्ये त्याने कोणकोणते व्यवसाय केले, किती क्लबांना आणि हॉटेलांना भेटी दिल्या, त्याला कोण-कोण माणसे भेटली, तो मित्राच्या घरी पार्टीला कसा गेला, पार्टी कशी पार पडली, ॲनाबरोबर त्याने प्रेम कसे केले, ( उदा. हिचहायकिंग, टब-बाथ वगैरे ) व शेवटी प्रेमाचे ' उदात्त ' टोक गाठल्यानंतर ( खरे तर शारीरिक प्रणयाराधनेचे सर्व प्रकार संपल्यानंतर ) त्यांची ताटातूट कशी झाली, हा सर्व तपशील शेवटी ' खाजगी ' पातळीवरच राहतो, त्याचे कारण "महानगर" चा ( त्याच्या व्यापक नावाप्रमाणे ) व्यापक संदर्भात विचार करणे मंत्र्यांना जमलेले नाही. ते " महानगर "ला कादंबरीचा विषय बनवीत नाहीत. तर एखाद्या परदेशी प्रवाशाप्रमाणे चटकदार वर्णनाचा विषय बनवितात. " महानगर " हाच खऱ्या अर्थाने त्यांच्या कादंबरीचा विषय असता, तर त्याचे दर्शन घडविण्यासाठी, केवळ खाजगी अनुभवांची पोतडी उघडून भागणार नाही, त्यासाठी ' महानगर'च्या ऐतिहासिक, सांस्कृतिक, राजकीय व सामाजिक जीवनाचा, परंपरेचा अद्ययावत अभ्यास करावा लागेल याची जाणीव त्यांना झाली असती. तसा अभ्यास जर त्यांनी केला असता तर लंडनमधल्या एका समस्येबद्दल त्यांनी कदाचित —

" त्याला इंग्रज समाजाचं मोठं कौतुक वाटलं. आता हेच पाहा ना. या बाईला मुलगी आहे. हिचं लग्न झालेलं नाही. पण त्यात काही लपवालपवी नाही. काही चोरीचा मामला नाही. त्या मुलीचे वडील नाहीत म्हणून समाजात काही त्यांना कोणी कमी लेखीत नाही. कोठे काही दुरावा नाही, दुष्टावा नाही. ज्याला जसं वाटेल तसं त्यानं आपलं जीवन जगावं. "

असे कौतुकाचे उद्‌गार काढले नसते. त्या समस्येतील भीषणता मग त्यांच्या नजरेस आली असती.

जगाचे वरवरचे व्यवहार छेदून त्यापलीकडचं काही स्थिर तत्त्व शोधण्याची श्रीकांतला तळमळ असे, असे मंत्र्यांनी आवर्जून सांगितलेले असले तरी, ' महानगरा'संबंधी श्रीकांत ज्या प्रतिक्रिया व्यक्त करतो, त्या अतिशय ढोबळ आणि स्थूल आहेत. वर उद्‌धृत केलेल्या परिच्छेदावरून याची कल्पना येईलच.

संपूर्णपणे परकीय अशा जीवनाचा वेध घेतानासुद्धा, जिथे त्या जीवनाचा काळजीपूर्वक अभ्यास करण्याची जबाबदारी कादंबरीकाराला वाटत नाही, तिथे स्वतःच्या देशातील एका समस्येचे चित्रण करीत असताना या जबाबदारीचे ओझे कोण कशाला खांद्यावर ठेवील ? " कार्तिकी " लिहिणाऱ्या र. वा. दिघ्यांचे मन अस्पृश्य जमातीला भोगाव्या लागणाऱ्या दुःखांनी व्यथित झाले असेल, महार-मांगांच्या छळाचे काही प्रसंग प्रत्यक्ष त्यांच्या डोळ्यांसमोर घडले असतील, महारवाड्याच्या

शेजारून जाताना विचारांचे काहूरही त्यांच्या डोक्यात उठले असेल, परंतु हे सर्व मान्य करूनही असे म्हणावेसे वाटते की अस्पृश्य जमातीच्या हजारो वर्षांपासून ठिवकत असलेल्या वेदनेचा वेध घेण्यासाठी काही ' कार्तिकी ' ही कादंबरी जन्माला आलेली नाही. " सात कोटी धर्मबांधवांची, देशबांधवांची अस्पृश्यता ही हिंदूंच्या ऱ्हासाचे मुख्य कारण आहे आणि ही अपृश्यता प्रथम राजकारणांतून निर्माण झाली व नंतर वेड्या समजुतीमध्ये पोसली गेली असं मी माझ्या कादंबरीत दाखवले आहे. " असे खुद्द दिघ्यांनीच या कादंबरीच्या प्रस्तावनेत नमूद केलेले आहे. प्रत्यक्ष कादंवरी वाचल्यानंतर वाचकाचे जें मत होते ते मात्र, लेखकापेक्षा वेगळे आहे.

" कार्तिकी " च्या संदर्भात विभावरी शिरूरकरांच्या " बळी " ची आठवण होणे अपरिहार्य आहे. उच्चभ्रू समाजाने वाळीत टाकलेल्या चोरजमातीचा व्यावहारिक आणि मानसिक पातळ्यांवरील जीवन-संघर्ष चित्रित करण्याची खरीखुरीच तळमळ विभावरीबाईंना असल्यामुळे " बळी "ची रचना करताना त्यांनी कादंवरी-रचनेच्या रूढ आणि लोकप्रिय संकेतांची यत्किंचितही वूज राखली नाही; त्या जमातीच्या जीवन-संघर्षाला उठाव मिळेल अशाच दृष्टीने त्यांनी " बळी " ची रचना केलेली आहे. दिघ्यांच्या जवळ हा सच्चेपणा नाही. म्हणूनच, एका सवंग प्रेमकथेचे उदात्तीकरण करण्यासाठी त्यांनी अस्पृश्यतेचा उपयोग करून घेतलेला आहे की काय, असे एकसारखे वाटत राहते. जातीयतेच्या प्रश्नाचा सखोल अभ्यास करून जर दिघ्यांनी ही कादंवरी लिहिली असती, तर तिचे स्वरूप निश्चितपणे वेगळे झाले असते. कुसगावच्या आबासाहेव इनामदारांचा एकुलता एक व सुंदर मुलगा हेरंब व गाव-महार कान्हूमामांची सोळा-सतरा वर्षांची गोंडाळ भुजदंडाची, उभार छातीची व टवटवलेल्या गोबऱ्या गालांची कार्तिकी, यांच्या विजातीय प्रेमप्रकरणातून निर्माण झालेल्या समस्या या काही खऱ्या ( -म्हणजे हजारो वर्षांपासून मूळे धरून असलेल्या- ) अस्पृश्य जमातीच्या समस्या नव्हेत, याची जाणीव दिघ्यांना झाली असती. गंभीर समस्यांना प्रेम-कथांवरची वांडगुळे वनविण्याचा मराठी कादंवरीचा हा शिरस्ता अर्थातच नवा नाही.

जन्मभूमी आणि वाट्याला आलेले जीवन यांच्या बळावर कादंबरीकार झाल्याने कादंबरीकाराच्या ठिकाणी जो एक पांगळेपणा येतो, त्याचे स्वरूप कसे असते हे समजावून घेण्यासाठी श्री. ना. पेंडसे यांची " लव्हाळी " आपल्याला मदत करते. जीवनाच्या त्रिविध–वैयक्तिक, राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय–रूपांतून निर्माण होणारा एक आकृतिबंध " लव्हाळी "च्या द्वारा पेंडशांना उभा करायचा असावा, असे वाटते. परंतु या प्रयत्नात त्यांना यश आलेले नाही. या कादंवरीतील वैयक्तिक पातळीवरील जीवनाचे रूप पकडताना, पेंडशांची तितकीशी पंचाईत झालेली नाही. राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय जीवनाचे धागे, त्याच्याशी कसे निगडित करायचे हा पेच, मात्र पेंडशांना सोडविता आलेला नाही. सटकरसारख्या एका सामान्य ( बौद्धिक कुवतीच्या ) व्यक्तीच्या रोजनिशीत राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय घटना, वर्तमानपत्री थाटात नोंदविण्याची एक सोपी युक्ती पेंडशांनी शोधून काढलेली आहे. परंतु राजकीय घटनांचे असले निर्जीव, प्रतिक्रियाशून्य ठोकळे, कादंवरीच्या रचनेसाठी कसली मदत करणार ? या घटनांच्या व्यक्तींच्या मनावर, त्यांच्या जीवनावर झालेल्या प्रतिक्रिया जर, पेंडसे समर्थपणे चित्रित करू शकले असते तरच, त्यांच्या कादंवरीतील निवेदनाला अर्थ आला असता. कादंवरीकाराच्या प्रतिभेचा खरा कस लागतो तो अशा वेळीच. एका विशिष्ट अनुभव-क्षेत्राच्या पलीकडे असलेल्या जीवनाचे दर्शन घडविण्याची ताकद, अजून तरी पेंडशांमध्ये आलेली नाही, हे ' लव्हाळी 'ने सिद्ध केलेले आहे.

लीलाधर हेगडे यांची " तरीही हात शिवशिवतच राहिले " ही कादंवरी भारत-चीन संघर्षावर आधारलेली आहे. चीनला तोंड देताना भारतीय सैनिकांना कोणत्या अडचणी आल्या, घरादाराचा त्याग करून आलेल्या ह्या सैनिकांचे बळी कसे गेले, का गेले आणि अपयश पदरी पडल्यानंतरही बचावलेल्या सैनिकांचे हात कसे शिवशिवत राहिले, याची कथा, हेगड्यांनी निवेदन केलेली आहे. परंतु त्यांची ही कादंवरी वाचीत असताना एखादे वार्ता-चित्र पाहात असल्याचा भास होतो. हेगड्यांच्या प्रतिभेचा आवाका जर अधिक मोठा असता तर भारत-चीन संघर्ष त्यांना वेगळ्या स्वरूपात जाणवला असता. युद्धासारखे एखादे राष्ट्रव्यापी संकट ज्या वेळी समोर उभे राहाते, त्या वेळी राष्ट्राच्या सर्वांगामधूनच अस्वस्थतेची एक प्रचंड लाट सरपटत असते. समाजाच्या विविध थरांना ग्रासणाऱ्या ह्या अस्वस्थतेच्या प्रतिक्रिया

समजावून घेणे, युद्धाशी संलग्न असणाऱ्या राजकारणाचा प्रचंड गुंता उलगडून पाहण्याचा प्रयत्न करणे, ह्या गोष्टी हेगड्यांनी टाळलेल्या आहेत. कादंबरीच्या द्वारा युद्धासारखा विषय जर हाताळायचा असेल तर युद्धाशी निगडित असलेल्या विषयांच्या अभ्यासासंबंधी अनास्था दाखवून चालणारच नाही.

प्रतिवर्षी जन्माला येणाऱ्या कादंबऱ्यांमध्ये स्वप्नरंजनात्मक प्रेमकथांची संख्या अधिक असते हे सांगायला हवे असे नाही. गेले वर्षही त्याला अपवाद नाही. ( उदा. "मन शुद्ध तुझं," "शतरंज" इ.) वर्षानुवर्षे स्वप्नरंजनात्मक प्रेमाचे त्रिकोण-चौकोन तयार करण्याची परंपरा जशी अखंडित राहिलेली आहे, त्याचप्रमाणे दुसऱ्याही. एका विषयाकडे कादंबरीकारांचे पुन्हा पुन्हा लक्ष वेधले जात असल्याचे दिसून येते. खेड्यातल्या इनामदारांच्या आणि देशमुखांच्या कुळ-कथांवर, आजपर्यंत किती कादंबऱ्या लिहिल्या गेल्या आहेत, याची मोजदादच करावी लागेल. या कुळ-कथांकडे, कादंबरीकारांचे लक्ष का वेधले जाते, हे सहज समजण्यासारखे आहे. अशी एखादी कुळ-कथा घेतली की कादंबरीची पाने भरून काढण्यासाठी कादंबरीकाराला विशेष प्रयास पडत नाहीत. इनामदारांचे एखादे 'थोर' घराणे घेतले की पुढील गोष्टींच्या वर्णनांची आपोआपच सोय होते. उदा. त्या थोर घराण्याची पूर्वपीठिका,—म्हणजेच त्या घराण्यातल्या दोन-चार पिढ्यांतील व्यक्तींचा काहीसा 'अलौकिक' वाटणारा इतिहास, त्या व्यक्तींच्या वास्तव्याने पुनीत झालेल्या वास्तूचा इतिहास व तपशील, त्यांच्या घरी परंपरेने चालत आलेल्या रीतिरिवाजांची माहिती, घरातील कर्त्या पुरुषाच्या शिस्तीची, जरबेची उदाहरणांसहित ओळख, घरातल्या इतर पुरुषांची आणि स्त्रियांची माहिती व रूपवर्णने, ( हा गोतावळा बहुधा दोन-तीन पिढ्यांतील व्यक्तींचा असतो आणि स्त्रियांपैकी सून किंवा मुलगी, तरणीताठी, कर्तबगार आणि चार-चौघांच्या नजरा खेचून घेईल इतकी देखणी असते. त्याुळे गांवगुंडांना तिच्या मागे लागण्याचा एक उद्योग आपोआपच मिळतो. ) घरातले पिढीजाद प्रामाणिक नोकर, शेतीवाडी, पैसाअडका, अधिकार-हक्क, मानमरातब यांवरून घरात माजणारी भाऊबंदकी, इनामदारांचा मोठेपणा सहन न होणाऱ्या इतर मंडळीच्या कारवाया ( किंवा अशाच दुसऱ्या एखाद्या कारणावरून काही गावकरी व इनामदार यांच्यात लागलेले भांडण ), खून, मारामाऱ्या, घरादाराची राखरांगोळी, स्त्रियांची बेअब्रू इत्यादिकांत होणारे त्यांचे पर्यवसान, इनामदारांची रंगेल आणि शौकीन वृत्ती, त्यासाठी येणारे तमाशाचे फड, इनामदारांचे आणि नाचणाऱ्या बायकांचे संबंध, शेवटी बहुधा इनामदारांच्या घराण्यांतील कर्ते आणि कर्तबगार पुरुष गेल्याने घराला येणारी मरगळ. रंगनाथ देशपांडे यांच्या "वेडी बाभळ" मध्ये अशाच स्वरूपाचा मसाला अगदी ठासून भरलेला आहे. थरारक घटना-प्रसंगाचे प्रमाण त्यांनी अधिक वाढविलेले आहे, एवढेच ( वोकीलांच्या "पीळ" चाही या संदर्भात अंशतः उल्लेख करता येईल ). खरे म्हणजे, अशा कथा सातत्याने लिहिल्या गेल्यामुळे ( आणि पडद्यावरही दाखविल्या गेल्यामुळे ) त्यांची चवच गेलेली आहे. परंतु कादंबरीकारांना जोवर या कथांचा मोह सोडवत नाही तोंवर तक्रार करून तरी उपयोग काय? येथे दुसरीही एक गोष्ट मान्य करायला हवी. भाविक श्रोत्यांना हरिकथा पुनः पुन्हा ऐकली तरी तिचा कंटाळा येत नाही, त्याचप्रमाणे वाङ्मयबाह्य कारणांसाठी ह्या कथा आवडीने वाचणाऱ्या वाचकांचा एक वर्ग अस्तित्वात असतो. पूर्वज, त्यांचे वैभव, आणि थोरपणा : इत्यादिकांबद्दल आदर बाळगणाऱ्या वाचकांवर त्या कथांची सहज मोहिनी पडते.

नानाविध व्यक्तींच्या जीवनांचे रंगीबेरंगी किस्से कादंबरीकाराच्या संग्रही असले तरी सौंदर्यदृष्टीच्या अभावी कादंबरीच्या रचनेसाठी या संग्रहाचा, त्याला योग्य तो उपयोग कसा करून घेता येत नाही, याचे प्रत्यंतर "वेडी बाभळ" वरून येते. व्यक्तींच्या आणि घटना-प्रसंगांच्या चित्रणातील तोल ज्या दृष्टीच्या आधारे सांभाळायचा, ती दृष्टीच देशपांड्यांच्या ठायी नसल्यामुळे त्यांनी विविध व्यक्तींच्या 'चित्तरकथा' एका संगतिहीन अवस्थेत आपल्यापुढे नाचविल्यासारख्या वाटतात. कादंबरी वाचल्यानंतर, वाचकांची नजर नेमकी कशावरही स्थिरावू नये, याच उद्देशाने जर देशपांड्यांनी ही कादंबरी लिहिली असेल, तर त्यांचे उद्दिष्ट सफळ झाले असे म्हटले पाहिजे.

उदात्तीकरणाचे मराठी कादंबरीकारांचे वेड चालू दशकातही टिकून राहिलेले पाहून आश्चर्य वाटते. मधू मंगेश कर्णिकांची "सूर्यफूल" सारखी कादंबरी केवळ त्या उदात्तीकरणाच्या प्रक्रियेमुळे आपला कलात्मक तोल गमावून बसलेली आहे. स्वतःच्याच मानसव्यक्तीचा

नि:पक्षपाती दृष्टीने विचार करणे, कर्णिकांना जमले नाही ते या उदात्तीकरणाच्या मोहाला बळी पडल्यामुळे. पोलिओमुळे पांगळ्या झालेल्या विशूच्या दुःखाने, कर्णिक, स्वतःच अतिशय भारावून गेलेले आहेत. त्यामुळे, स्वाभाविकपणेच, त्यांची सहानूभूती कादंबरीतील इतर व्यक्तींपेक्षा विशूकडे अधिक झुकलेली आहे. उदात्तीकरणाच्या प्रक्रियेला सुरुवात होते ती अशी. कादंबरीतील नाट्य-निर्मितीच्या दृष्टीने विचार केला तर विशू आणि विशूची विधवा आई इंदू ह्या दोन्ही व्यक्तिरेखा सारख्याच महत्त्वाच्या आहेत. एवढेच नव्हे तर पांगळ्या विशूचे दुःख जितके सकारण आहे तितकेच विधवा इंदूचेही. नवरा गेल्यानंतर पतिसुखाला आंचावल्यामुळे व पांगळा मुलगा आणि वृद्ध सासरा यांचा सांभाळ करण्याची जबाबदारी अंगावर पडल्यामुळे " मूलतः ख्यालीखुशालीचे आणि सुखासीन जीवन " जगण्याची आवड असलेल्या इंदूच्या मनाचा विलक्षण कोंडमारा झालेला आहे. विशूविषयी तिच्या मनात निर्माण होणारा आकस ही तिच्या गुदमरलेल्या मनाचीच एक स्वाभाविक प्रतिक्रिया आहे. इंदूचे हे मन कर्णिकांना जाणवलेले नाही असे नाही; परंतु ते व्यक्त करण्यासाठी जी सहानुभूती लेखकाजवळ हवी, तिचा त्यांच्याठायी पूर्णपणे अभाव आहे. " कसा असलास तरी पोटचा गोळा आहेस तू माझ्या! नऊ महिने माझं रक्त प्यायला आहेस तू " असे उद्‌गार एके ठिकाणी इंदू काढीत असली तरी कर्णिकांनी तिचे वात्सल्य, प्रेम संपूर्णपणे गोठवून टाकण्याचेच ठरविलेले असावे असे दिसते. मुलाच्या मायेने ओलावणारे इंदूचे मन, त्यांनी अव्यक्त ठेवलेले आहे ते सकारण. विशूला सदैव ' हिडिसफिडिस ' करणाऱ्या, त्याच्या सुखःदुखांशी समरस न होणाऱ्या, स्वतःच्या सुखातच गुंग असणाऱ्या इंदूची प्रतिमा अधिक ठळकपणे चित्रित करण्यात कर्णिकांचा जो हेतू आहे तो हा की नैतिकदृष्ट्या इंदूची उंची विशूपेक्षा कमी आहे हे त्यांना सिद्ध करायचे आहे. ( विशूने त्याच्या चित्राला मिळालेले सुवर्णपदक सुमीच्या लग्नासाठी देऊन टाकणे, हादेखील विशूच्या मनाचा चांगुलपणा दाखविण्याचा एक प्रकार आहे. ) वाचकांची सहानुभूती विशूकडे खेचण्याचा हा एक हुकमी मार्ग आहे. विशूची मनोव्यथा कुरवाळणाऱ्या आवा व सुमी ह्या व्यक्तींनी या कादंबरीचा अधिकांश भाग का व्यापलेला आहे, हेही आता लक्षात यावे. व्यक्तींच्या चित्रणात इतके पक्षपाती धोरण स्वीकारल्यानंतर कादंबरीचे कलारूप विघटित झाले नाही तरच आश्चर्य! कलादृष्टीपेक्षा नैतिक आवाहनाला प्रतिसाद देणाऱ्या वाचकांची संख्या अधिक असल्यामुळे अशा कादंबऱ्या सहज ' लोकप्रिय ' ठरतात, हेही मान्य करायला हवे.

मराठी कादंबरीच्या विकासाला अवरोधून धरणाऱ्या काही प्रवृत्तींचा आणि संकेतांचा विचार, येथवर केला. यानंतर एका कादंबरीचा थोडया विस्ताराने परामर्श घ्यायचा आहे. ती कादंबरी म्हणजे ए. वि. जोशी ह्यांची " काळोखाचे अंग ".

नीतितत्त्वांचा उच्चरवाने घोष करणाऱ्या किंवा नैतिक बंडखोरी असलेल्या कादंबऱ्यांना मराठी वाचक उचलून धरतात. जोशींची कादंबरी ह्या दोन्ही पक्षांत मोडत नसल्यामुळे वाचकांचे लक्ष वेधून घेण्यास ती काहीशी असमर्थ ठरलेली असली तरी प्रतिभेचे देणे लाभलेल्या एका कलावंताची ती निर्मिती आहे. संवेदनशील मनावर उमटणाऱ्या अनुभवाच्या विविधरंगी प्रतिक्रियांचे स्वरूप किती सूक्ष्म असते आणि खरा कलावंत त्या तितक्याच सूक्ष्मपणे व्यक्त करण्यासाठी कसा धडपडत असतो, हे या कादंबरीवरून लक्षात येण्यासारखे आहे. सौंदर्यदृष्टी असलेला कादंबरीकार कादंबरीच्या विविध घटकांतील तोल किती दक्षतेने सांभाळीत असतो, याचेही दर्शन घडविण्याचे सामर्थ्य या कादंबरीत आहे. बुद्धिमान कलावंत अनुभवाचा भेद घेतो तो त्याच्या खोलीसह. जोशींच्या ठायी ही शक्ती निश्चितपणे आहे.

वरवर पाहता " काळोखाचे अंग " ही एक प्रेमकथा भासते. परंतु या प्रेमकथेच्या तळाशी जोशींनी जो आशय दडविलेला आहे तो फार वेगळा आहे. म्हणूनच एका वाचनात ह्या कादंबरीची पोटउकल होत नाही. एखाद्या गूढ कवितेसारखी ती पुन्हा पुन्हा वाचावी लागते--वाचावीशी वाटतेही.

ज्या वेळी, एखादा कादंबरीकार, कादंबरीतील व्यक्तींना आणि घटना-प्रसंगांना प्रतीकात्म अर्थ देण्याची धडपड करीत असतो, त्या वेळी, त्याच्या कादंबरीची कथात्मकता स्वाभाविकपणेच विरळ होण्याची शक्यता असते. अशा कादंबरीचे उदाहरण म्हणून, ' काळोखाचे अंग 'चा उल्लेख करता येईल. व्यक्ति-व्यक्तींमधील भावसंबंध व त्यातून निर्माण होणारी जीवनाकृती, यांनाच जर जोशींनी महत्त्व दिले असते तर, कदाचित त्यांची कादंबरी ही एक

अनुक्रमणिका

वऱ्यापैकी प्रेमकथा म्हणून आपल्यासमोर अवतरली असती. पण जोशींना मूलतः घडवायची आहे ती एक प्रेमकथा नव्हे. व्यक्तिमनाच्या मूलभूत गुणधर्मामुळे निर्माण होणाऱ्या एका जीवनाकृतीवर त्यांची नजर खिळलेली आहे आणि तिचेच स्वरूप त्यांना व्यक्त करायचे आहे. ही जीवनाकृती पेलून धरील एवढ्यापुरताच व्यक्तींचा आणि त्यांच्या जीवनातील घटना--प्रसंगांचा आधार जोशींनी घेतलेला आहे. सुरेंद्राचे तिच्या आई-वडिलांशी असलेले भाव-संबंध, मार्लिनचे सुरेंद्राच्या आई-वडिलांशी निर्माण झालेले भाव-संबंध, हा किंवा अशा स्वरूपाचा तपशील जोशींनी कथन केलेला नाही, त्याचे कारण तरी दुसरे कोणते असणार ?

कादंबरीतील व्यक्तींच्या द्वारा अपेक्षित जीवनाकृतीचा परिणाम तर जाणवावा परंतु ह्या धडपडीत त्यांची व्यक्तिमत्त्वे गुदमरून जाऊ नयेत म्हणून जोशींनी अतिशय सावधपणे या कादंबरीची रचना केलेली आहे. त्यांनी हे कसे साधले याचाही थोडासा खुलासा करायला हवा. भाषा, हेच त्यांच्या हाती असलेले महत्त्वाचे साधन आहे. ते त्यांनी कसे उपयोगात आणलेले आहे ते पाहा :

" वेग ! घनश्याम-दमयंतीला आलेला वेग ! जमिनीला पाय लागू न देणारा अनिवार वेग ! दिवसभर काम करून रात्री पुन्हा लिहीत बसणारा घनश्याम. त्याच्यासाठी दमयंतीने मुद्दाम आणलेली पोपटी फाईल. युवतिमंडळ अन शाळा काढणारी दमयंती, पहिल्या मुलाच्या वेळी, सकाळी कष्टानं उठणारी, बागेत नवी नवी रोपे लावणारी, प्रत्येक गोष्ट आपल्याला जशी हवी, अगदी तश्शीच करून घेणारी दमयंती......शरीरानं भरगच्च अन सुखानं मत्त होऊन डरकाळणारा घनश्याम ......" ए दमयंती, आता मंडळ बंद, बाग बंद ! ...मर्लिन, ही डॉक्टरीण अनुभवी आहे, पण तूं जवळ असलंच पाहिजे अं...गॉडफादर !..." " वेगानं गेलेल्या काही वर्षांच्या काळात एकमेकांच्या जिवावर अन् विश्वासावर केवढं तरी सुंदर बांधलेलं जीवन... अदृष्ट, गूढ हिरण्यगर्भाभोवती पंखा जोमानं फिरत होता. निमिषानिमिषाला सुंदर नक्षी उमटत होती, स्वप्नासारखी पुसून जात होती....नक्की कुठं अन काय बिघडलं म्हणून दमयंती–घनश्याम पुसून गेली ? "

जोशांच्या भाषाशैलीची सहजता, तिचे कातीव अंग, जे सांगायचे ते मोजक्या व नेमक्या शब्दांत सांगून झटकन पुढे जाण्याची तिची ढब, एकाच वेळी दोन्ही पातळ्यांवरील अर्थांना सहजपणे कवेत घेण्याची तिची क्षमता वरील परिच्छेदावरून प्रत्ययास येईल. वर्तमानात मिसळलेला भूतकाळ, या कादंबरीत कशा प्रकारे व्यक्त होतो आहे, याचीही कल्पना वरील परिच्छेदावरून येण्यासारखी आहे.

७

जीवनानुभवातील नाट्य अचूक टिपण्याचे सामर्थ्य जर कादंबरीकारात असेल तर त्याच्या कादंबरीला आपोआपच एक घाट येतो. उदा. ना सं. इनामदारांची "झुंज". या कादंबरीच्या प्रस्तावनेत ऐतिहासिक कादंबरीच्या संदर्भात इनामदारांनी व्यक्त केलेली मते कोणाला पटतील वा न पटतील; परंतु एका विशिष्ट निष्ठेशी स्वतःला जखडून घेतल्यामुळे यशवंतराव होळकरांना जे संघर्षमय जीवन पत्करावे लागले व त्यामुळे स्वाभाविकपणेच त्यांच्या जीवनात जे नाट्य निर्माण झाले, त्याचा वेध घेण्याचा त्यांचा प्रयत्न बराचसा यशस्वी झालेला आहे, याबद्दल कोणाचे दुमत होणार नाही. कादंबरीच्या रचनेसाठी त्यांनी केलेला प्रसंग-तंत्राचा वापर, प्रामुख्याने लक्ष वेधून घेतो. कारण, घटनांची तपशीलवार निवेदने टाळून ऐतिहासिक कादंबरी फुलवायची ही गोष्ट सोपी नाही.

गेल्या वर्षी एक नवलकथा व काही विज्ञान-कथाही प्रसिद्ध झालेल्या आहेत. मराठीत विज्ञान-कथा अवतरू लागलेल्या आहेत ही कौतुकाची बाब असली तरी त्यांचे सामर्थ्य वाढविण्यासाठी प्रयत्न करणे अगत्याचे आहे. " पानघंटी ", "पारंब्यांचे जग " ह्यांच्यासारख्या विज्ञान-कथा वाचून समाधान कसे होणार ? लहान मुलांचे लक्ष वेधून घेण्यासाठी खेळणे बदलावे, तसा हा प्रकार वाटतो.

शशी भागवतांची ' मर्मभेद ' ही ५०० पानांची नवलकथा, मात्र, प्रौढ वाचकांची मने जिंकण्याच्या इर्ष्येनेच लिहिली गेली आहे. सकृद्दर्शनी ही नवलकथा पारंपारिक वळणाची भासत असली तरी, पारंपारिक नवलकथांहून तिचा घाट अगदी वेगळा आहे. वाचकांना विस्मित करणाऱ्या घटना-प्रसंगांचा आणि व्यक्तींचा एक आकृतिबंध नवलकथेच्या द्वारा व्यक्त होत असला तरी हा आकृतिबंध निर्माण करताना नवलकथाकाराला काही बंधने पाळावी लागतात. काही पथ्ये सांभाळावी लागतात. ही बंधने कोणती व ही पथ्ये कोणती याचा, भागवतांनी कसून अभ्यास केलेला आहे. आणि म्हणूनच त्यांच्या " मर्मभेद "ची रचना पोकळ न राहता अतिशय चिरेबंद झालेली आहे.

१९६६ साली प्रसिद्ध झालेल्या कादंबऱ्यांचा आढावा घेण्याचे प्रस्तुत लेखाचे उद्दिष्ट नाही. प्रतिवर्षी शेकड्याने मराठी कादंबऱ्या प्रकाशित होत असतात. यांतील बहुसंख्य कादंबऱ्या वाङ्मयीन निकषावर टिकू शकत नाहीत, ही वस्तुस्थिती आहे. या वस्तुस्थितीकडे डोळेझाक केल्याने काहीही फायदा होणार नाही, या जाणिवेपोटी सदर वस्तुस्थितीची जमेल तेवढी कारणमीमांसा करण्याचा प्रयत्न वर केलेला आहे. अनेक कादंबऱ्यांप्रमाणे हा प्रयत्नही फसला असण्याची दाट शक्यता आहे. रोगाचे एक निदान चुकले तर दुसरे करता येईल, परंतु रोग अस्तित्वात असल्याचे प्रामाणिकपणे मान्य असेल तरच !

• • •

अनुक्रमणिका



# आदर्श भारतसेवक*

• वि. बा. आंबेकर •

' आदर्श भारत सेवक ' या नामदार गोखले यांच्या चरित्राचे लेखक प्रा. नरहर रघुनाथ फाटक हे महाराष्ट्राला सुपरिचित आहेत.

'आदर्श भारत सेवक' हा ग्रंथ प्रा. फाटक यांच्या पन्नास वर्षांच्या गोखलेचरित्रविषयक व्यासंगाचे फळ आहे. त्यांनी गोखले चरित्राला उपयोगी पडणारी साधने गेली पन्नास वर्षे सतत जमवीत आणली आहेत. १९२३-१९२४ सालापासूनचे त्यांचे हे कार्य माझ्यासारख्या परिचितांना माहीत आहे. ' आदर्श भारत सेवक ' या पुस्तकाच्या प्रास्ताविक भागात प्रा. फाटक यांनी आपल्या चरित्र लेखनाच्या उद्दिष्टांपैकी एक जिव्हाळ्याचा हेतू स्पष्ट केला आहे. 'लेखकाचे निवेदन' मध्ये पान १० वर ते म्हणतात, " गोपाळरावांच्या जीवनकाळात महाराष्ट्रातील त्यांच्या प्रतिपक्षाने उत्पन्न केलेले पुष्कळसे निराधार दुष्टग्रह गोपाळराव जाऊन अर्धशतक लोटले तरी आजसुद्धा परंपरेने शिल्लक असल्याचा अनुभव येतो. ते ग्रह बुद्धिपुरस्सर जिवंत ठेवणारे वाङ्मय गोपाळरावांच्या निधनानंतर-कित्येक वर्षांनी निर्माण झालेले होते, हे चाणाक्षांना वरील विधान दृष्टीसमोर येताच स्मरेल. टिळक-गोखले यांच्या परस्परसंबंधाचा वृत्तान्त बहुधा पूर्वीच्या चरित्रलेखनात टाळलेला दिसतो. केळकरकृत टिळकचरित्रात व इतरांनी लिहिलेल्या चरित्रांतूनही टिळक-गोखले संबंधाचा विचार गाळण्याचा किंवा एकतर्फी संक्षेपाने देण्याचा हमखास प्रकार दिसतो. गोपाळरावांच्या हयातीत व नंतर त्यांचे चरित्र व कर्तृत्व योग्य प्रकारे आकलन करून लोकांना सांगण्याचा यत्न जसा व्हावा तसा याबाबतीत पूर्वी झालेला नाही. "

या बाबतीतली एक अडचण अशी की, गोखले यांच्या अनुयायी वर्गातली अगदी निकटवर्ती माणसे गोखल्यांच्या एतद्विषयक इच्छेने बांधली गेली होती. आपल्या पश्चात चरित्रलेखन आणि स्मारक-निर्मिती असल्या फंदात आपल्या अनुयायांनी पडू नये असे गोखले यांनी त्यांना वारंवार कटाक्षाने बजावले होते. म्हणून गोखल्यांच्या इच्छेला मान दिला गेल्यामुळे गोखल्यांच्या चरित्रातील महत्त्वाच्या घटनांचा कधी महाराष्ट्राला योग्य कागदपत्रांच्या आधाराने बोध करून देण्यात आला नाही. अशी कागदपत्रे सर्व्हंटस ऑफ इंडिया सोसायटीच्या दप्तरात शेकडयांनी उपलब्ध आहेत.

लोकांना आपली बाजू सांगत बसण्याकरिता विशेष अट्टाहास करावा ही गोष्ट स्वता गोखले यांना नापसंत होती. लोकांनी गैरसमजाने केलेला अन्याय तसाच सहन करावा अशी त्यांची वृत्ती होती. याचे एक उदाहरण या चरित्रात प्रा. फाटक यांनी दिले आहे ते फार उद्बोधक आहे. टिळकांना १९०८ च्या जुलैत शिक्षा झाल्यावर ऑगस्ट-सप्टेंबर महिन्यांत गोखल्यांवर महाराष्ट्राने टीकेची आग पाखडण्यास सुरुवात केली. अखेरीस गोपाळरावांनी विलायतेत असतानाच इकडे आपल्या सहकाऱ्यांना या बदनामी करणाऱ्या वृत्तपत्रांवर आणि प्रचारकांवर फिर्यादी कराव्या असे कळविले. त्यानंतर लागलीच लिहिलेल्या एका पत्रात गोखले लिहितात, " आजवर मी माझ्यावर होणारी दुष्ट टीका सोशीत होतो. आता फिर्याद करण्याबद्दल तार केली व तेव्हापासून मी आपल्या स्वर्गवासी गुरूंनी शिकविलेल्या तत्त्वांची श्रद्धा सोडली, या भावनेची व्यथा हृदयाला जडली आहे. पण मी स्वीकारलेली योजना ( फिर्यादीची) आजच्या स्थितीत योग्य असल्याचे बुद्धीला पटलेले आहे. आपला समाज अशा वातम्यांवर सहज विश्वास ठेवण्याइतका आंधळा आहे. आजची स्थिती इतकी स्फोटक आहे की, ती माझे व माझ्या सहकाऱ्यांचे नुकसान केल्याखेरीज थांबणार नाही, म्हणून या तिरस्करणीय आरोपांचा प्रसार होऊ देणे इष्ट नाही. " गोखले यांचे स्वर्गवासी गुरू म्हणजे रानडे. त्यांची शिकवण गोखल्यांनी जन्मभर तत्परतेने जपली. रानडे हे आपल्या अनुयायांना नेहमी निक्षून सांगत, " You have to bear ridicule insult, even personal injuries at

*लेखक न. र. फाटक, मौज प्रकाशन, मुम्बई ४; रु. २१

times, and forbear from returning abuse for abuse ". या शिकवणीला फिर्यादीच्या मार्गाने आपण हरताळ फाशीत आहोत असे किंचित्काल गोखले यांच्या मनाला वाटले, त्याचा उल्लेख वरील पत्रात आला आहे. समाजाने केलेल्या विपर्यस्त टीकेचा मुका मार गोखले जन्मभर सहन करीत गेले. कारण स्वजनांवर कसलाही सूड उगवावयाचा नाही असे त्यांचे व्रत होते. पण गोखल्यांच्या याच मनोधर्मामुळे त्यांच्याविषयीचे कित्येक गैरसमज आजतागायत टिकून राहिले. ते दूर करण्याचे काम प्रा.फाटक यांच्या या चरित्राने साधार पुराव्यानिशी पार पाडले आहे. आणि त्या ऐतिहासिक कामगिरीबद्दल प्रा. फाटक यांचे मनःपूर्वक अभिनंदन करणे अवश्य आहे.

ज्या मार्गदर्शक विचारांपासून गोखल्यांनी स्फूर्ती घेतली ते विचार त्यांचे गुरू रानडे यांनी अनुभवाने आणि अवलोकनाने पक्के बनविले होते. " आपल्याला जर राजकीय हक्क अगदी कमी प्रतीचेच असतील तर आपली समाजव्यवस्था काही विशेष चांगली बनेल असे वाटत नाही. समाजव्यवस्था ही न्याय व विवेक यांवर जर रचलेली नसेल तर राजकीय हक्क उपभोगण्यासही आपण अपात्र ठरू. तसेच समाजव्यवस्था जर अपक्व असेल तर आपल्या आर्थिक व्यवहाराचे नियमही नीट बसावयाचे नाहीत. जर आपली धार्मिक ध्येये हीन व दीन असतील तर सामाजिक, राजकीय आणि आर्थिक या कोणत्याही व्यवहारात आपणास यश मिळावयाचे नाही. हे परस्परावलंबन म्हणजे प्राप्त झालेला आकस्मिक न्याय नव्हे तर तो सृष्टीचा शाश्वत न्याय होय. " अशा आशयाची एक पक्की तत्त्वप्रणाली रानडे यांनी तयार केली होती. रानडे यांच्याविषयी गोखले म्हणतात, " ही आपली आर्यभूमी सर्वांगसुंदर कशाने होईल, सामाजिक, राजकीय, नैतिक, धार्मिक, औद्योगिक,शिक्षणविषयक या सर्व बाबतींत हिचे पाऊल पुढे कसे पडेल, इष्ट प्रकारची प्रगती घडून येण्यास अवश्य असणारे गुण आपल्या समाजातील स्त्रीपुरुषांच्या अंगी कसे येतील या गोष्टींशिवाय दुसरा विचार त्यांचे मनास रात्रंदिवस माहीत नव्हता. " अशा प्रकाराच्या तत्त्वाची कास धरणाऱ्या कार्यकर्त्याने जनसेवेचे व्रत घेतले पाहिजे. आपण, एकाद्या प्रेषिताप्रमाणे सदैव नम्र वृत्तीने आपल्या देशातील अवनत व दलित जनतेला शिक्षित आणि सुसंस्कृत करण्यासाठी झटले पाहिजे ही शिकवण त्याच्या हाडीमाशी खिळली असली पाहिजे. या शेतकीप्रधान देशातील शेतकरी कर्जमुक्त झाला पाहिजे, त्याला सरकारच्या योजनेने उत्पादनासाठी आर्थिक साहाय्य मिळाले पाहिजे, शेतकऱ्यांसाठी पतपेढ्या काढल्या पाहिजेत, या दलितवर्गाला सक्तीचे प्राथमिक शिक्षण मोफत मिळाले पाहिजे, अस्पृश्यांची दीन अवस्था प्रयत्नपूर्वक कमी केली पाहिजे, गुन्हेगार मानल्या गेलेल्या जमातींची उन्नती केली पाहिजे, स्त्रियांना प्रतिष्ठित वागणूक मिळाली पाहिजे, जातिभेदाची तीव्रता ओसरली पाहिजे, धर्माचे अनाठायी प्राबल्य नाहीसे व्हावयास हवे, थोडक्यात म्हणजे स्वातंत्र्याबरोबर समतेच्या तत्त्वाचे बीजारोपण आणि विकास या गोष्टीही तितक्याच प्रमाणात झटून केल्या पाहिजेत असे या विचारप्रणालीचे सूत्र होते. त्यात स्वतःइतकीच दुसऱ्यावर मनुष्य म्हणून विश्वास ठेवण्याची प्रवृत्ती होती. वचनभंग केल्याचे पातक राजकर्त्यांना योग्य कानउघाडणीने जाणवून दिले तर त्यांनाही पश्चातापाची भावना स्पर्श करील आणि त्यांच्या सुसंस्कृतपणाला आवाहन पोचेल अशी या विचारप्रणालीत एक अभिप्रेत भावना होती.

ना. गोखले यांनी अशा समर्पित जीवनाचा एक श्रेष्ठ वस्तुपाठ आपल्या उदाहरणाने निर्माण केला. स्वार्थत्यागाचे व्रत त्यांनी आमरण पाळले. त्यांनी स्वताकरिता कधी पैसे घेतले नाहीत. कौन्सिलच्या भत्त्यातून काटकसरीने पैसे शिल्लक ठेवून ते गोखले सोसायटीच्या कामाला लावीत असत. रॉयल पब्लिक कमिशनवर नेमणूक झाली त्या वेळी देखील मिळणाऱ्या पैशाबद्दल गोखल्यांनी अशीच वृत्ती ठेवली. पण नुसत्या स्वार्थत्यागाला फार महत्त्व राहात नाही. त्याबरोबरच आपण राजकारणातील प्रत्येक विषयाचा सर्व बाजूंनी काटेकोर अभ्यास केला पाहिजे, आणि कौन्सिलात राज्यकर्त्यांच्या प्रतिनिधींशी दोन हात करताना केव्हाही अपुऱ्या माहितीमुळे माघार घेण्याचा प्रसंग येता कामा नये अशी दक्षता बाळगली पाहिजे, याकडेही गोखल्यांनी आजन्म लक्ष पुरविले. त्यांना कौन्सिलातील तेरा वर्षांच्या कामगिरीत कधी एकदाही चुकीचे विधान केल्याबद्दल ओशाळगत स्वीकारावी लागली नाही. कडकलक्ष्मीचा अवतार घेऊन आदळ आपट करणारी भाषणे त्यांनी कधी केली नाहीत. आणि तरीही त्यांना राज्यकर्त्यांवर विलक्षण वचक बसविता आला त्याचे कारण उत्कृष्ट प्रतीचा अभ्यास हे होय.

ब्रिटिशांचा अमल आल्यावर नव्या शिक्षित लोकांना विद्वत्तेनेच राज्यकर्त्यांशी बरोबरी करणे शक्य होते. शस्त्रे

गेली, जहागीरी गेल्या, धार्मिक अधिकार गेले, शास्त्री-पंडित होऊन सभा जिंकण्याची परंपरा निष्प्रभ झाली. अशा स्थितीत राजकर्त्यांच्या बरोबरीने राज्यकारभारात भाग घेण्यासाठी अर्थशास्त्र, राज्यशास्त्र व घटनाशास्त्र यांच्या अभ्यासात प्रावीण्य मिळविण्याशिवाय गत्यंतर नव्हते. गोखले यांनी काळाची ही अट ओळखली आणि त्याप्रमाणे पावले टाकली. प्रा. फाटक म्हणतात " काळ-परिवर्तनातील उपयुक्त अपरिहार्य ग्राह्यांश ज्यांच्या वर्तन-क्रमात फार मोठ्या प्रमाणामध्ये मुरलेला पाहता येतो, असे एक गोखलेच असून राममोहन रायांपासून महात्मा गांधींपर्यंत जे तीनचार अव्वल दर्जाचे देशसेवाकर्ते निवडता येतील त्यांमध्ये कालप्रवाहाला म्हणजे युग-धर्माला किंवा आधुनिकतेला न शोभणारे बारीक मोठे प्रकार दृष्टीस पडतील......लोकशाही हे राज्यव्यवस्थेचे भावी पर्यवसान हेरून धर्माला व जातीला लोकशाहीमध्ये कनिष्ठ स्थान असल्याचे देशोदेशींच्या प्रजासत्ताक राज्य-व्यवहारात गोखले पाहात होते. भिन्न धर्मांचे किंवा धर्मपंथांचे लोक जेथे कायमचे रहिवासी नाहीत असा देश जगात क्वचितच असेल. तेथे असे एकवटलेले भिन्न समाज आपला धर्म विसरून जर राज्यव्यवस्थेमार्फत घडणाऱ्या आपल्या हिताकडे एकजुटीने लक्ष पुरवितात, तर हिंदुस्थानात त्या स्थितीचे अनुकरण का होऊ नये, हा प्रश्न राजकारणाचे क्षेत्र अवलंबून गोखले सोडवीत होते. " ( उपोद्घात ).

हा प्रश्न सोडविण्यासाठी गोखल्यांनी स्वतःच्या अंगी अनेक व्यक्तिगत गुणांचा विकास परिश्रमपूर्वक करून घेतला. वित्तविषयक स्वार्थत्याग, निःस्पृहता, मानमान्य-तेची नावड, सतत कष्ट करण्याची तयारी, अव्यभिचारी कर्तव्यनिष्ठा, जगाच्या सूत्रचालकाबद्दलची विनम्र आस्तिक्यबुद्धी, स्वभावाचा प्रांजलपणा, अतिरेकी विचार-सरणीचा तिटकारा, स्वीकृत कार्यावरील प्रखर निष्ठा, वक्तशीरपणा, जबाबदारीची जाणीव, टापटीप, इत्यादी अनेक गुण त्यांनी आपल्या अंगी बाणवून घेतले. आपल्या हेतूचा, वाक्याचा किंवा एखाद्या शब्दाचासुद्धा विपर्यास होणार नाही इतके व्यवस्थितपणे बोलण्याची गोपाळरावांची पद्धत होती. सत्यनिष्ठेला त्यांनी सदैव जपले. त्यांचा विषयांचा गाढ अभ्यास आणि विचारसरणीत निर्दोषपणा आणण्याची काटेकोर दक्षता या दोन गोष्टी मूलभूत सत्यप्रियेतूनच विकसित झाल्या होत्या. साध्या खाजगी बोलण्यातही भाषेचा सुसंस्कृतपणा एखाद्या शब्दाच्या नुसत्या छायेनेदेखील ढळू नये म्हणून ते फार जपत मग रासवटपणा किंवा अपशब्दांचा आडमुठे-पणा यांना त्यां या आसपास थाराही मिळत नसे, हे सांगावयास नको. त्यांचा स्वाभिमान फार प्रखर होता. एखादा गोरा अधिकारी न सांगतासवरता आपल्या अधिकाराच्या तोऱ्यात त्यांना भेटण्यासाठी आला तर ते त्याची कडक शब्दांनी कानउघाडणी करीत. साध्य आणि साधने ही दोन्ही शुद्ध–निर्मळ पाहिजेत अशी त्यांची पक्की भावना झालेली होती. आपण समाजाचे सामान्य सेवेकरी आहोत ही व्रतस्थपणाची भावना त्यांना कधी सोडून गेली नाही. विचार केल्याशिवाय त्यांनी कधी भाषण केले नाही आणि पक्के चिंतन झाल्याशिवाय कोणत्याही विचाराला त्यांनी भाषणातून कधी वाट करून दिली नाही. प्रतिपक्षाविषयी त्यांनी नेहमी उदारमनस्कता बाळगली. मृत्यूच्या छायेत असताना जहाल व प्रागतिक या पक्षांच्या समेटाचा वाद झाला. त्या वेळी " आपली प्रकृती फार क्षीण झाली असल्याने वादाच्या आवेशात भाषेचा तोल सुटेल की काय असे भय वाटते, " असे सुसंस्कृतपणाचे उद्गार त्यांनी आगाखानांजवळ काढले. आपल्याकडून कधी असंस्कृतपणा होऊ नये म्हणून ते जपत पण समाजातल्या असंस्कृत पद्धतीच्या विरोधाला त्यांना सतत तोंड द्यावे लागले. त्या वेळी त्यांनी फार मोठा सहनशीलपणा राखला. इतकेच नव्हे तर त्यांची कुचाळी करण्यात ज्याने आपल्या वृत्तपत्राचे रकाने भरले अशा एका संपादकाला, तो कोर्टातील शिक्षेमुळे सर्वस्वाला मुकल्यावर, गोपाळरावांनी आर्थिक साहाय्य केले ! कुणा-चाही द्वेष करावयाचा नाही ही वृत्ती त्यांनी सतत अभ्यासाने आपल्या अंगी जडवून घेतली होती. धर्मकार्य करताना जी निर्मळपणाची वृत्ती आपण राखतो तीच राज-कारणाच्या चळवळी करताना ही सदैव राखली पाहिजे अशी त्यांची उत्कट श्रद्धा होती. या सर्व गुणांमुळे गोखले अखेरीस समाजाचे श्रेष्ठ नेते ठरले.

प्रा. फाटक यांनी आपल्या चरित्रग्रंथात गोखल्यांचे व्यक्तित्व घडविणाऱ्या या गुणांचा वाचकाला बोध व्हावा अशारीतीने गोखल्यांच्या जीवनातील घटनांचे वर्णन सामर्थ्याने आणि कलात्मकतेने केले आहे. या घटना महाराष्ट्राच्या इतिहासाशी निगडित आहेत म्हणून त्यांच्याबद्दलचा सर्व तपशील काटेकोर रीतीने देण्याची

कसोशी त्यांनी केली आहे. कोणतीही घटना फाटकांनी भोंगळपणाने किंवा गबाळपणाने वर्णन केली नाही. दक्षिण आफ्रिकेतील गोखल्यांचा मुक्काम ता. २२ ऑक्टोबर १९१२ ते ता. २९ नोव्हेंबर १९१२ पर्यंत होता. त्या वेळी गोखल्यांनी गावोगाव हिंडून झंझावाती दौरा केला. त्या दौऱ्याची प्रत्येय दिवसाची स्थलकालविषयक तपशीलवार माहिती फाटकांनी दिली आहे. प्रत्येक गावी गोखले काय बोलले तेही थोडक्यात दिले आहे. आजपर्यंत कोणीही तपशीलवार माहिती एकत्र केली नव्हती. त्यामुळे गोखल्यांची कार्यतत्परता प्रत्यक्ष शब्दांनी वर्णन न करताही या तपशीलवार वर्णनाच्या मध्यस्थीने सुंदररीतीने फाटकांना सूचित करता आली आहे. या वेळी गोखल्यांची प्रकृती फार खालावली होती. तरीही त्यांनी एवढी दगदग केली.

त्याचप्रमाणे १९०७ सालच्या फेब्रुवारीत गोखल्यांनी उत्तर प्रदेशपासून पंजावपर्यंत दौरा काढला आणि अलाहाबाद, फैजाबाद, लखनौ, कानपूर, अलिगढ, लाहोर, अमृतसर, जालंधर, मिरत, आग्रा, व परत कलकत्ता असा वेगवान दौरा केला, त्याचाही तपशील फाटकांनी फार काटेकोरपणे दिला आहे. यातल्या कित्येक गावी त्यांच्या प्रचंड मिरवणुकी निघाल्या. लोक गाडीचे घोडे सोडून स्वता गाडी ओढीत. रस्त्यात ठिकठिकाणी हार घालण्यात येत. तीनतीन चारचार तास मिरवणुकी चालत आणि मग गोखल्यांची भाषणे होत. लखनौच्या मिरवणुकीत शंभर गाड्या होत्या. हजारोजण पायी चालत होते. सर्व धर्मांचे लोक स्वागताला आले होते. शाळेतल्या मुलींनी पाहुण्यांना आरतीने ओवाळले. लखनौत तीन दिवस भाषणे झाली. लाहोरला अशीच जंगी मिरवणूक निघाली. लालाजी स्टेशनवर आले होते. गोपाळरावांबरोबर ते मिरवणुकीच्या गाडीत बसले. हारांनी गोपाळराव संपूर्ण झाकले गेले होते. लोकांना नीट दिसण्यासाठी ते गाडीत उभे राहात. विष्णू दिगंवर पलुसकर यांच्या गांधर्व महाविद्यालयात गोखल्यांना महाराष्ट्रीय पद्धतीचा फराळ देण्यात आला. पाटताटावर जेवण झाले. जेवणाचे वर्णन फाटकांनी विस्ताराने केले आहे. त्यात गोखल्यांना जे पदार्थ आवडत त्यांची नोंद आपोआप झाली आहे. स्वता तेथे प्रत्यक्ष हजर असल्यामुळे फाटकांना लाहोरचे वर्णन चांगल्या रीतीने करता आले आहे.

जालंधरला गोपाळरावांची हत्तीवरून मिरवणूक निघाली. मिरतच्या मुक्कामात छावणीतील दोन तीन कनिष्ठ हिंदी अधिकाऱ्यांनी गोखल्यांची गाठ घेतली. त्या वेळी सशस्त्र राजकीय उठावासंबंधी चर्चा झाली. गोखल्यांनी या कल्पनेचे वैफल्य सुंदर युक्तिवादाने पटवून दिले. या घटनेचा गुप्त पोलिसांनी सरकारात रिपोर्ट केला. आग्र्यातील बंगाली रहिवाशयांनी गोखल्यांना मानपत्र दिले. या सर्व दौऱ्यात गोखले स्वदेशी, सार्वजनिक जीवनाच्या गरजा, वर्धिष्णू राष्ट्र, सद्यःस्थिती, हिंदुमुसलमान प्रश्न इत्यादी अनेक विषयांवर बोलले. "येथील (भारतातील) लोकमत फार दुबळे आहे. सत्ताधाऱ्यांच्या हाती नको तेवढे अधिकार आहेत. यासाठीच ब्रिटिश लोकशाहीची कास धरून राहिले पाहिजे. इंग्लंडातल्या कामाचे हेच महत्त्व आहे. म्हणून ते चालू राहणे भाग आहे. ते बंद पडले तर त्याचे परिणाम आपणासच भोगावे लागतील. इंग्लंडातील कामावरच सर्वस्वी विसंबून राहावे असा त्याचा अर्थ नव्हे. एकीकडे येथील लोकमताची उभारणी व शक्ती जोपासीत असता, सध्या अमलात असलेली राज्यव्यवस्था चालू राहील तोवर ब्रिटिश लोकशाहीची म्हणजे येथून सेवानिवृत्त झालेल्या अँग्लोइंडियन अधिकाऱ्यांची नव्हे-मदत घेतली तर येथील अंमलदारांवर वचक पण राहील व प्रगतीला ती मदत प्रेरक होईल," अशा मुद्द्यांवर त्यांचा भर असे. आपले नऊदशांश काम देशात व एकदशांश काम इंग्लंडात झाले पाहिजे व त्यासाठी एकजूट, उच्च प्रतीचे चारित्र्य व राष्ट्रभक्ती या तीन गुणांची आवश्यकता आहे ही गोष्ट मोठ्या कळकळीने त्यांनी या दौऱ्यात लोकांच्या मनावर ठिववली.

आचार्य प्रफुल्लचंद्र राय हे प्रसिद्ध बंगाली शास्त्रज्ञ, गोखले यांच्यावर फार लुब्ध असत. त्यांनी, "Politics is Gokhale's whole existence" असे म्हणून गोखल्यांचे इतर तत्कालीन पुढाऱ्यांपासून वेगळेपण कशात होते ते स्पष्ट केले आहे. त्याचप्रमाणे नगेंद्रनाथ गुप्त हे बंगाली वृत्तपत्रविशारद त्या काळात चांगले गाजलेले होते. त्यांनी "Recollections and Reflections" हा आत्मवृत्तपर ग्रंथ लिहिला आहे. त्यात गोखले यांनी १८८६ सालच्या काँग्रेसमध्ये जे भाषण केले त्याचा फार गौरव केला आहे. बंगालचे प्रसिद्ध पुढारी रोमेशचंद्र दत्त यांनी, वरिष्ठ कायदेमंडळातील गोखल्यांचे बजेटवरील पहिले भाषण (२६ मार्च १९०२) झाले ते एकून "हा वक्ता हिंदुस्थानचा भावी नेता झाल्याशिवाय राहणार नाही" असे उद्गार काढले. महाराष्ट्राबाहेर भारताच्या निरनिराळ्या

प्रांतांत गोखल्यांना सदैव मान मिळत गेला. लजपतरायांनी तर गोखल्यांच्या मृत्यूनंतर सात वर्षांनी 'सर्व्हंट्स ऑफ दि पीपल सोसायटी' स्थापन करून गोखल्यांचे अनुकरण केले.

देशभर हिंडून गोखल्यांनी सनदशीर चळवळीसाठी लोकांची मने तयार केली. त्याचप्रमाणे कायदेमंडळात जाऊन त्यांनी सरकारच्या राज्यकारभारावर सतत बारा-तेरा वर्षे टीका करून सरकारची कानउघाडणी करण्याचे धोरण कायम ठेवले. ही कामगिरीही प्रा. फाटक यांनी क्रमशः आणि सविस्तर दिली आहे. गोखल्यांची ही कामगिरी फार मोठी आहे. समकालीन काळात गोखल्यांची निंदानालस्ती होऊन त्यांच्या कामाचे महत्त्व कितीही तुच्छ करण्यात आले असले तरी भारताच्या इतिहासात संसदीय वाक्पटुता आणि शिष्टाचार यांची खरी मुहूर्तमेढ गोखल्यांनीच रोवली असा निर्वाळा इतिहास नेहमी देईल. प्रा. फाटक यांनी या गोष्टीचे हे मर्म बरोबर जाणले आहे आणि इतर साऱ्या तपशीलाच्या पसाऱ्यातून नेमके या कामगिरीवर वाचकांचे लक्ष केंद्रित होईल अशी योजना केली आहे. २४ ऑगस्ट १९०० रोजी गोखले यांनी प्रांतिक कायदेमंडळात बजेटवरील पहिले भाषण केले. त्या वेळच्या कायदे कौन्सिलच्या रचनेचे फाटकांनी नेमके चित्र उभे केले आहे. अध्यक्ष-स्थानी प्रांताचा गव्हर्नर, त्याच्या एका बाजूस हाताच्या बोटावर मोजण्याइतके सरकारी अंमलदार व दुसऱ्या बाजूस सरकारनियुक्त आणि निवडून आलेले सभासद त्यांची सर्वांची मिळून संख्याही सरकारी अंमलदाराहून कमी. सडेतोड भाषणे करण्याशिवाय सभासदांना दुसरे कसले अधिकार नव्हते पण तेवढाच अधिकार जास्तीत-जास्त प्रमाणात वापरून गोखल्यांनी प्रजापक्षाची बाजू तेजस्वीपणे लढविली. गोखल्यांच्या पहिल्याच भाषणात दुष्काळनिवारणाचा विषय होता. पुढल्याच वर्षी शेत-सारा दुरुस्ती बिलावर चर्चा झाली. "सर्वाधिकार तुमच्या हाती असल्यामुळे तुम्ही आम्हांला हीन लेखता" असे सरकारला बजावून गोखले बाहेर पडले.

१९०२ पासून पुढे दहा वर्षे गोखले कलकत्ता-दिल्लीच्या वरिष्ठ कायदे कौन्सिलात होते. १८९७ सालच्या माफी-प्रकरणाने गोखले यांना फार अप्रियता आली होती. पार्लमेंटचे हिंदी सभासद श्री. भावनगरी यांनी भर पार्लमेंटात गोखल्यांविषयी 'हा नीच, खोटे बोलणारा' असल्या नालस्तीच्या शब्दांनी आग पाखडली "ज्या रात्री ती आग मी पाहिली त्याक्षणी माझे काळीज होर-पळून निघाले व त्याचक्षणी मी प्रतिज्ञा केली की हा कलंक आपल्या देशभक्तीच्या प्रतापाने धुवून टाकला पाहिजे," असे गोखले यांनी म्हटले आहे. सदर प्रतिज्ञा सफल करावयाची तर कायदेमंडळाचा उपयोग होईल असे गोखले यांनी ठरविले. पुढे दहा वर्षांनी गोखले दक्षिण आफ्रिकेला जाण्यासाठी प्रथम इंग्लंडला गेले. त्या वेळी २९ जुलै १९१२ रोजी लंडनच्या हिंदी रहिवाशांनी गोखल्यांचा टोलेजंग सत्कार केला. हिंदू, मुसलमान, पारशी, इंग्लंडचे अमीरउमराव व अनेक प्रतिष्ठित गृहस्थ सपत्नीक हजर होते. या प्रसंगी भावनगरीच अध्यक्ष होते. भावनगरींनी गोखल्यांची मुक्त मनाने स्तुती केली. त्या वेळी गोखल्यानी केलेले भाषण भावनगरींच्याही लक्षात राहाण्यासारखे झाले! गोखले म्हणाले, "पूर्वेकडील देशांचे भवितव्य आता युरोपियन मुत्सद्यांच्या हातात राहिलेले नाही. हिंदुस्थानचे भवितव्य लॉर्ड क्रू (भारतमंत्री) यांना थोपवता येणार नाही. उच्च प्रतीचे चारित्र्य, देशभक्ती, एकजूट, शिक्षण-प्रसार, शील, कार्यक्षमता या गुणांचे महत्त्व आपण जाणले पाहिजे. पब्लिक सर्व्हिस हे हिंदुस्थानातील सरकारी नोकरीला नाव आहे. पण सरकारी नोकर देशातील चळ-वळीकडे वळत नाहीत. आय. सी. एस्. अधिकारी हिंदुस्थानच्या स्वराज्यविषयक चळवळीकडे वळतील तर मोठे काम होईल. त्यांना देशाबद्दल प्रेम व देशोद्धाराबद्दल श्रद्धा पाहिजे."

१९१२ साली केलेल्या या भाषणातील म्हणण्याप्रमाणे स्वता गोखल्यांनी आधी दहा वर्षे सतत देशोद्धाराचे कार्य केले होते. वरिष्ठ कायदेमंडळात त्यांचे पहिले भाषण २६ मार्च १९०२रोजी झाले. त्या वेळी त्यांनी शिलकी अंदाज-पत्रकारावर टीका केली. "दुष्काळ, प्लेगांनी देश गांजला असता शिल्लक राहणे हा चमत्कार आहे. आणि ती शिल्लक लष्करी खर्चावर उधळणे हा अन्यायावर अन्याय आहे," असे त्यांचे सूत्र होते. ही शिल्लक आरोग्य, पाट-बंधारे, शिक्षण वगैरे कामाकडे खर्च व्हावी असा त्यांचा आग्रह होता. गोखल्यांनी कायदेमंडळात दरवर्षी भाषणे केली त्या वेळी त्यांच्यासमोर सतत हिंदुस्थानातील दरिद्री, दलित समाज होता. त्यांनी नेहमी गरीब जनतेची बाजू घेतली. फाटकांनी गोखल्यांच्या मिठाच्या करावरील

भाषणांचे उल्लेख केले नाहीत. पण गरिबाचे भाकरीबरोबरचे तोंडी लावणे केवळ मिठावर अवलंबून असते, त्यावर जबर कर ठेवून सरकारने गरिबाचे अन्न महाग केले असे कळवळ्याचे उद्गार काढून हवेप्रमाणे मीठ मोफत मिळाले पाहिजे असे मत गोखल्यांनी व्यक्त केले होते.

दुष्काळनिवारण आणि पतपेढ्या या बाबतीत तर गरिबांचा कैवार घेऊन प्रत्यक्ष साहाय्यक चळवळी गोखले यांच्याप्रमाणे महाराष्ट्रात दुसऱ्या कुणी केल्या नाहीत. "आमचे विचार फुकट जातात. ते कितीही समंजसपणाचे असले तरी सरकार आपलाच हेका शेवटास नेते. ही स्थिती निराशाजनक आहे. पण कर्तव्य म्हणून बोलले हे पाहिजेच," असे निराशेचे उद्गार गोखल्यांना वरचेवर काढावे लागले आहेत. गौप्यस्फोटाविरुद्ध कायदा, विद्या-पीठांचा कायदा, राजद्रोही सभाबंदीचा कायदा, मुद्रण नियंत्रणाचा कायदा इत्यादी विषयांवरील गोखले यांचे विचार अतिशय विवेकीपणाचे आहेत पण त्यात प्रजेची बाजू नेहमी उचलून धरण्याची पोटतिडिक स्पष्ट दिसते. कायदे कौन्सिलात कर्झन, गेट्स, उमर हयातखान इत्यादी मोठमोठ्या धेंडांची गोखले यांनी सडेतोड हजेरी घेतली आहे. गोरे-काळे यांच्या नोकरीतील प्रमाणाबद्दल कर्झन यांच्या विधानाचे गोखल्यांनी एकदा वाभाडे काढले. त्या प्रसंगाला उद्देशून वाच्छा म्हणतात, "गोखल्यांनी या बेफाम अजगराला ( लॉर्ड कर्झन ) उलथापालथा केले व त्याची घमेंड जिरविली." १९११-१२ साली गोखल्यांनी प्राथमिक शिक्षण सक्तीचे व मोफत केले जावे म्हणून कौन्सिलात बिल आणले. त्यापूर्वी त्यांनी देशभर दौरा काढला होता. मद्रास टाईम्स, मद्रास मेल, पेट्रियट, स्टँडर्ड इत्यादी मोठमोठ्या वृत्तपत्रांनी गोखल्यांच्या म्हणण्याचा पाठपुरावा केला होता. अखेर ते बिल कौन्सिलात नापास झाले, त्या वेळचे गोखल्यांचे भाषण अपूर्व आहे.

"हिंदुस्थानातल्या भावी पिढ्यांतील आमच्या पुत्र-पौत्रांच्या हितासाठी मी हा जीव पाखडतो आहे. माझ्या पदरी निराशा येईल हे मला माहीत आहे. पण पुढे केव्हा-तरी याच कार्यात भावी पिढ्यांना यश येईल अशी माझी श्रद्धा आहे," अशा आशयाचे त्यांनी त्या वेळी उद्गार काढले आहेत. फाटक यांनी हा उतारा दिला असता तर बरे झाले असते. १९१२ साली बोटीवर एका इंग्रजी प्रवाशाशी गोखल्यांचा संवाद झाला तो प्रफुल्लचंद्र राय यांच्या आत्मचरित्रावरून फाटक यांनी उद्धृत केला आहे, तो फार उद्बोधक आहे. तो इंग्रज प्रवासी म्हणाला, "आम्ही शिक्षणावर हिंदुस्थानात खूप खर्च करतो." यावर गोखले ताडकन म्हणाले, "या वाक्यातील 'आम्ही' कोण? व त्याचा अर्थ काय? इंग्लंड काही वर्गणीने पैसा जमा करून आम्हाला धर्मादाय करीत नाही. हिंदुस्थानचेच उत्पन्न अनाठायी उधळले जाते. त्या उत्पन्नाचा अगदी क्षुद्र अंश शिक्षणाकडे खर्ची पडतो." (पान १७४). महाराष्ट्राने 'मवाळ' या संबोधनाने हेटाळणी केलेले गोखले असे होते!

रॉयल पब्लिक सर्व्हिस कमिशनवर (१९१२-१३-१४) गोखल्यांनी सभासद या नात्याने फार मोठी कामगिरी केली. न्यूझीलंडचे पूर्वी गव्हर्नर असलेले आयर्लिंग्टन हे कमिशनचे अध्यक्ष होते. गोखल्यांनी अनेक साक्षीदारांना फार मार्मिक प्रश्न विचारले आहेत. याच वेळी म. गांधी यांच्या दक्षिण आफ्रिकेतील सत्याग्रहासाठी हिंदुस्थानातून पाच लक्ष रुपये जमवून मदत पाठविण्याचे कामही चालू होते. तेवढे पैसे जमविण्याकरिता गोखल्यांना लाहोरपर्यंत दौरा काढावा लागला. त्या वेळी दगदग करताना गोख-ल्यांना फार थकवा येई. पण त्यांनी कधी एक दिवसही विश्रांती घेतली नाही. "गांधी आपल्या हट्टाने माझ्या आयुर्मानाची दोरी तोडणारसे वाटते," असे या प्रसंगी गोखल्यांनी एकदा उद्गार काढले होते. रॉयल कमिशनचा अहवाल गोखल्यांच्या पश्चात सहा महिन्यांनी पुरा झाला व १४ ऑगस्ट रोजी त्यावर सभासदांच्या सह्या झाल्या. कमिशनचे काम गोखल्यांनी अक्षरशः अहोरात्र केले.

फाटक यांनी 'ना. गोखल्यांचे इच्छापत्र' म्हणून गाजलेल्या गोखल्यांनी केलेल्या सुधारणाविषयक कच्च्या खर्ड्याचा या चरित्रात कुठे सविस्तर उल्लेख केला नाही, ही या चरित्रातील एक उणीव आहे. हेही काम गोखल्यांनी मृत्यूच्या आधी एक वर्षभर सतत परिश्रमानी चालविले होते. मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड विलिंग्डन् यांनी गोखल्यांना असा आराखडा करण्याविषयी अगत्यपूर्वक सुचविले होते. गोखल्यांनी राजकीय आराखडा सुचवावा आणि त्या सुधारणा सरकारने मान्य करून आपण होऊन हिंदुस्थानला द्याव्या असा विलिंग्डन् यांचा प्रयत्न होता. ना. आगाखान व फिरोजशहा मेथा यांच्याशी विचार-विनिमय करण्यास गोखले यांना आजारपणामुळे फुरसत झाली नाही. मृत्यूपूर्वी दोनच दिवस आधी गोखल्यांनी

आपला हा आराखडा पेन्सिलीने पुरा केला प्रांतातील कारभार व मध्यवर्ती सरकारातील कारभार याची व्यवस्था गोखले यांनी विस्ताराने मांडली आहे. मंत्रिमंडळे कशी विस्तृत करावी व त्यांचे हक्क कोणते असावेत ते गोखल्यांनी नमूद केले आहे. १९१५ आणि १९६५ या सालातील पन्नास वर्षांचे अंतर ध्यानात घेऊन या आराखड्याकडे पाहिले तर आजच्याही संसदीय कारभाराची सर्व बीजे गोखल्यांनी जाणली होती हे कबूल करावे लागेल.

अंमलबजावणी करणारे सरकार आणि विधिमंडळ यांचे संबंध जर्मनीतील साम्राज्यसरकार व रैकस्टॅग यांच्या सर्वसाधारण धर्तीवर असावेत, व प्रांताचे सर्व कायदे विधिमंडळात संमत व्हावे लागतील आणि कर-आकारणीत फेरफार करावयाचे असतील तर ते विधिमंडळाच्या संमतीनेच केले गेले पाहिजेत, ही गोखल्यांची सूचना त्यांच्या राजकारणातील लोकशाही मनोवृत्तीची आणि घटनापटुत्वाची निःसंशय निदर्शक आहे. त्याचप्रमाणे मध्यवर्ती सरकारकडे अंतर्गत व्यवस्था, अर्थ, कायदा, संरक्षण, रेल्वे, पोस्ट व टेलिग्राफ आणि परराष्ट्र-खाते इतकी खाती प्रामुख्याने राहावीत हे त्या आराखड्यातील गोखल्यांचे म्हणणे आज पुष्कळ अंशी घटनेनेच भारतात मान्य झाले आहे. व्हाईसरॉयकडील कौन्सिलास हिंदुस्थानची लोकसभा हे नाव द्यावे हे गोखल्यांनी १९१५ सालीच सांगितले ! हिंदुस्थानचा घटनात्मक राज्यकारभार डोळ्यापुढे इतक्या स्पष्ट रीतीने वागविणारा दुसरा कुणी पुढारी त्या वेळी भारतात नसावा हेच गोखल्यांचे वैशिष्ट्य आणि माहात्म्य आहे. प्रा. फाटक यांनी परिश्रमपूर्वक लिहिलेल्या या चरित्रात गोखल्यांनी ता. १७ फेब्रुवारी १९१५ रोजी स्वताची सही घालून पुरा केलेला तो आराखडा समग्र यावयास हवा होता. चरित्रातील इतर इतक्या सुंदर संकलित माहितीबरोबर तो देण्याचे राहून गेल्यामुळे या चरित्र-ग्रंथाला निष्कारण उणेपणा आला आहे.

सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटी या संस्थेची स्थापना ही गोष्ट तर गोखल्यांच्या जीवनातील सर्वांत उदात्त आणि मनोज्ञ घटना आहे. आदर्श चारित्र्याचे निष्ठावंत अभ्यासू समाजसेवक तयार करण्याकरिता गोखल्यांनी या संस्थेच्या स्थापनेचा संकल्प केला. १९०५ साली दसऱ्याला सोसायटीच्या इमारतीचा कोनशिला समारंभ शिवराम हरी साठे या चारित्र्यवान् आणि स्वार्थत्यागी समाजसेवकाच्या हातून झाला ! हे सर्व प्रा. फाटक यांनी व्यवस्थित वर्णन केले आहे. पण त्याबरोबरच येथे पुढे सांगितलेली हकीकत दिली असती तर गोखल्यांच्या निष्ठावंत कर्तव्यपरायणतेवर चांगला प्रकाश पडला असता. इमारत बांधण्यास आरंभ केला तेव्हा गोखल्यांजवळ पैसे फार कमी होते. पण त्यांनी बरोबरीच्या माणसांना इमारतीचे काम चालू ठेवण्यास सांगितले आणि मुंबईस प्रयाण केले. थोड्याच दिवसांत ते देणग्यांची व्यवस्था करून आले, आणि इमारतीचे काम खंड न पडता पुरे झाले ! देणगीदारांनाच गोखल्यांचा नेहमी वचक वाटत असे, हीही गोष्ट या वेळी सांगण्यासारखी आहे. एकंदर हयातीत निरनिराळी कार्ये पार पाडताना सामान्यतः पंधरा लाख रुपयांची उलाढाल गोखल्यांच्या हातून झाली असेल ! पण त्या बाबतीत काटेकोर हिशेब राखून एक पैचीही अफरातफर होणार नाही म्हणून गोखले फार जागरूक असत. त्यांच्या बाबतीत कधी संशय घेण्यास यत्किंचितदेखील जागा नव्हती. गोखल्यांच्या प्रामाणिकपणाविषयी या चरित्रात इतर अनेक उल्लेख आले आहेत. पण हाही माहितीचा भाग आला असता तर बरे झाले असते. १९०५ साली मे महिन्याच्या ११–१२ तारखेला जपानने रशियावर जय मिळविला. त्या बातमीने विलक्षण आनंद वाटून गोपाळरावांनी तोच शुभमुहूर्त मानला आणि सोसायटी स्थापण्याचा संकल्प निश्चित केला. एक महिन्याने १२ जूनला आपल्या तीन सहकाऱ्यांचा गोखल्यांनी शपथविधी केला.

फाटक यांनी लिहिलेल्या या चरित्राचे एक वैशिष्ट्य असे की, १८९५ पासून १९१५ पर्यंतच्या वीस वर्षांत टिळकांशी मतभेद होण्याचे जे अनेक प्रसंग गोखले यांना अनुभवावे लागले, त्यांची इत्थंभूत हकीकत देताना गोखल्यांच्या बाजूने, कागदपत्रांच्या आधारावर भरपूर पुरावे फाटक यांनी उपलब्ध करून दिले आहेत. अगदी तारीखवार सर्व पुरावे देताना फाटक यांना फार परिश्रम करावे लागले आहेत. महाराष्ट्राच्या इतिहासाची प्रा. फाटक यांनी ही फार मोठी कामगिरी केली आहे. इतिहासाच्या अभ्यासकासाठी भावी काळात, त्यांच्यापुढे दोन्ही बाजूंचे कागदपत्र भरपूर प्रमाणात यावयास हवे आहेत. निर्णय करण्याचे काम भावी पिढ्या करतील. त्या बाबतीत आजच्या कुणाही पक्षपाती माणसांनी समर्थनाची केवढीही खटपट केली तरी ती काळाच्या ओघात धुऊन जाईल आणि निर्भेळ कागदपत्र लोकांपुढे राहतील. डी.

ई. सोसायटीत टिळकांचा मतभेद झाला,त्या वेळी गोखले हे टिळकांच्या विरुद्ध पक्षाला होते. वादासाठी गोखल्यांच्या अंकगणिताच्या उत्पन्नाचा प्रश्नही पुढे आला होता. गोखले सार्वजनिक सभेचे निर्वेतन काम करीत होते, त्याचीही चर्चा झाली. त्या कडवट प्रसंगात स्वतः गोखलेच राजीनामा देण्यास तयार झाले होते व त्यांनी तो दिलाही होता. पण गोखल्यांचा राजीनामा स्वीकारण्यात आला नाही. त्यानंतर १८९३ पासून टिळक–गोखले या उभयतांत सतत मतभेदाचे प्रसंग येत गेले. १८९३ साली हिंदुमुसलमान दंग्याच्या संदर्भात टिळकांनी हिंदूंची सभा भरवली. रानडे, मेथा, गोखले हे ही सभा भरविण्याच्या विरुद्ध होते. टिळकांनी गोखल्यांवर कडक टीका केली. १८९५ साली काँग्रेसच्या मंडपात सामाजिक परिषद भरवू नये म्हणून पुण्यातल्या सनातनी लोकांनी मंडप जाळण्याची दहशत घातली. त्या वेळी इतरही आनुषंगिक वाद चालविताना सार्वजनिक जीवनातील सुसंस्कृतपणाच्या मर्यादा ओलांडल्या गेल्या. तो अनुभव आल्यावर गोखले एके ठिकाणी लिहितात, "लोकसेवा करण्यापेक्षा जगाच्या टोकाला जाऊन राहाणे श्रेयस्कर!"

१८९७ साली वेल्वी कमिशनसमोर साक्ष देताना गोखल्यांनी सार्वजनिक सभा व डेक्कन सभा अशा दोन्ही संस्थांचा उल्लेख केला, त्यावद्दल केसरीत टीका आली. त्या वेळी गोखल्यांनी प्रत्यक्ष शब्द कोणते वापरले होते तेच फाटकांनी दिले आहेत. मुंबई गॅझेटच्या लंडन येथील वातमीदाराने आपल्या वातमीत काय लिहिले होते ते मूळच फाटकांनी दिले आहे. त्याला फार महत्त्व आहे. कारण त्यामुळे ज्या मूळ पुराव्यावर आधारून टीका झाली तोच पुरावा आणि टीका ही जवळजवळ ठेवून वाचण्याची आणि निर्णय करण्याची चांगली सोय झाली. जपानच्या अभिनंदनाची सभा १९०५ साली पुण्यात टिळकांच्या अध्यक्षतेखाली भरली त्या वेळी सभेतील वक्त्यांनी गैरहजर गोखल्यांवर टीका केली. शेवटी रामभाऊ साने यांनी गोखल्यांना आनंद झालेला प्रसंग आपण डोळ्यांनी पाहिला आहे, असे सांगितले. तेव्हा आधीची टीका व्यर्थ ठरली. १९०७ साली इव्हॅक्युलेशनचा प्रचार केल्यावद्दल आणि सरकारकडून झोपड्या बांधण्यासाठी तीस हजार रुपये घेतल्यावद्दल केसरीत गोखल्यांवर फार कडक टीका आली. त्या वावतीत गोखल्यांनी ज्ञानप्रकाशात एक मुलाखत प्रसिद्ध करून आपली भूमिका स्पष्ट केली. ती दुर्मिळ मुलाखत आजवर कुठेही पुन्हा लोकांपुढे छापून आली नव्हती. फाटकांनी ती या चरित्रात दिली आहे. त्यामुळे या विषयासंबंधी आश्चर्यकारक उलगडा होतो!

१९०७ साली सुरतेची काँग्रेस मोडली. त्यावेळचे गोखल्यांचे म्हणणे वाचकांना नीटपणे कळेल अशी फाटकांनी पुराव्यांची सविस्तर मांडणी केली आहे. १९१४ डिसेंबर ते १९१५ फेब्रुवारी या काळात काँग्रेसमध्ये जहाल पक्षाने यावे म्हणून समेटाची बोलणी झाली. भूपेंद्रनाथ वसू यांना गोखले यांनी एक खासगी व एक साधे अशी दोन पत्रे पाठविली. त्यावरून टिळक व गोखले यांच्यात वैयक्तिक वाद वाढला आणि उभयतांच्या गोवऱ्या ओंकारेश्वरावर पोचल्याची भाषाही वापरली गेली. 'चोराच्या उलट्या बोंबा' हा केसरीतील टिळकांचा लेख प्रसिद्ध आहे व लोकप्रिय आहे. त्याला 'खरंच! चोराच्या उलट्या बोंबा!' हे गोखल्यांचे ज्ञानप्रकाशात प्रसिद्ध झालेले उत्तर फाटकांनी समग्र उद्धृत केले आहे. ज्ञानप्रकाशचे वास्तव्य पूर्वी ज्या वाड्यात होते त्या किबे वाड्याला १९२६ साली आग लागली व सर्व फायली जळून गेल्या. त्यावेळी आग लागण्यापूर्वी फाटकांनी काही पुरावे स्वतासाठी उपलब्ध करून ठेवले होते. म्हणून आज हा लेख लोकांपुढे आला. त्या लेखाने गोखले यांची सर्व भूमिका स्पष्ट झाली आहे. याच वादात प्रो. विजापूरकर यांचाही ज्ञानप्रकाशात लेख आला होता. त्यांतील महत्त्वाचा भागही फाटकांनी दिला आहे. विजापूरकर त्यावेळी पुण्यास टिळकांच्याच बोलावण्याने आले होते. टिळक–सुवाराव यांची प्रत्येकवेळी बोलणी होताना विजापूरकर हजर होते. म्हणून त्यांनी खरा प्रकार या वादात सांगितला आहे. 'खरा प्रकार आहे तरी काय?' हाच विजापूरकरांच्या लेखाचा मथळा आहे. "समाजात सत्याची व सरळपणाची चाड अजून उत्पन्न व्हावयाची आहे." हे विजापूरकरांचे लेखातील समारोपाचे वाक्य आहे!

याच पुस्तकावर परीक्षण लिहिताना एकदोन महिन्यांपूर्वी एका लेखकाने, १८९८ साली टिळक सुटले तेव्हा माफीच्या करारावर सही करून सुटले इत्यादी मजकूर फाटकांनी पान ५० वर दिला आहे. त्यावर आक्षेप घेऊन फाटकांच्या या विधानाला पुरावा नाही असे म्हटले आहे. असल्या अज्ञानी लोकांसाठी फाट-

कांनी तो करार उद्धृत करावयास हवा होता. १८९७ साली एक वर्ष शिक्षा भोगल्यावर "मी पुनः असे करणार नाही. केल्यास राहिलेले सहा महिने मी विन तक्रार भोगीन" असे टिळकांनी सरकारास लिहून दिले होते. टिळकांनी लिहून दिलेला हा करार चिरोल-केसमध्ये पुराव्यात दाखल झाला असून टिळकांनी स्वतः आपल्या जबानीत, मी तो लिहून दिला होता असे कबूल केले आहे. १९१४ साली जूनमध्ये मंडालेहून टिळक सुटून आले. त्यानंतर त्यांच्या राहत्या घरावर सरकारी पहारा ठेवला गेला. २५ जूनला सरकारी हुकूम निघाला व टिळकांशी संबंध ठेवणाऱ्या लोकांना ताकीद देण्यात आली. गणेशोत्सवाच्या शेवटच्या दिवशी मिरवणुकीत टिळकांना व त्यांच्या मुलांना भाग घेण्यास बंदी करण्यात आली. पुढे टिळकांनी १ सप्टेंबर १९१४ ला एक जाहीरनामा काढला. कलेक्टरशी गाठीभेटी होऊन हा जाहीरनामा तयार झाला व तो फार मवाळ आहे एवढीच माहिती फाटकांनी सांगितली आहे. (पान २५४, २५५). त्या जाहीरनाम्यातील दोन परिच्छेदही उद्धृत केले आहेत. एकाद्या अत्यंत राजनिष्ठ माणसाने सरकारची व इंग्रजी राज्याची स्तुती करावी तशी ती या जाहीरनाम्यात केली आहे.

टिळकांच्या सहीवर हा जाहीरनामा प्रसिद्ध झाला. पण या सर्वामागचा इतिहास फाटकांना बहुधा माहीत असूनही त्यांनी तो दिला नाही याचे आश्चर्य वाटते. या बाबतीत टिळकांसाठी कलेक्टरकडे प्रथम शब्द टाकण्याचे काम मवाळपक्षीयांनी सुरू केले. बऱ्याच वेळा कलेक्टरकडे जाऊन थोडी अनुकूल भूमिका हरिभाऊ आपटे यांनी निर्माण केली. सर प्रभाशंकर पट्टणी ( मुंबई इलाख्याच्या गव्हर्नरच्या एक्झीक्युटिव्ह कौन्सिलचे सभासद १९१२ ते १५ ) हे त्यावेळी एक वजनदार गृहस्थ प्रागतिक पक्षात होते. त्यांच्या वजनाने हरिभाउंचे काम सुकर झाले पण कलेक्टरने हरिभाऊंना सांगितले, "सरकार जाहीरनामा लिहील व त्यावर टिळकांनी फक्त सही करावी. या जाहीरनाम्याचे मराठी भाषांतर केसरीत येईल ते आमचा ओरिएंटल ट्रान्सलेटर करील व ते कानामात्रेचा फरक न करता केसरीत छापले पाहिजे." या अटी ऐकून हरिभाऊंना थोडी निराशाच वाटली. पण बापूकाका जोशी यांनी टिळकांचा होकार मिळविण्याची हमी घेतली व होकार मिळविला. सर्व गोष्टी कलेक्टरच्या म्हणण्याप्रमाणे अक्षरशः टिळकांनी मान्य केल्या. केसरीत छापलेल्या जाहीरनाम्याची मराठी भाषा ओरिएंटल ट्रान्सलेटरची आहे ! हा सर्व इतिहास पूर्वी विविध ज्ञानविस्तारात आलेला आहे, व तो प्रा. फाटक यांना माहीत आहे. लो. टिळक यांचे त्यांच्या मृत्यूनंतर बरोबर एक वर्षाने एक चरित्र गं. कृ. लेले व वा. कृ. आपटे यांनी लिहिले. त्याचे परीक्षण विविध-ज्ञानविस्तार नोव्हेंबर १९२१ च्या अंकात आले आहे. त्यात पान ३४३ वर ही हकीकत आली आहे. १९१४ सालीच नंतर दोन-तीन महिन्यांनी समेटाची बोलणी झाली. त्यावेळची भूपेंद्र बसूंना गोखल्यांनी पाठविलेली पत्रेही समग्र द्यावयास हवी होती. म्हणजे पुराव्याच्या दृष्टीने कमतरता राहिली नसती.

२०८ पानानंतर व २०९ पान सुरू होण्यापूर्वी या पुस्तकात गोखल्यांचे फोटो, बालबोध, मोडी व इंग्रजी हस्ताक्षर इत्यादींचा भाग दिला आहे. त्यांतील मराठी, बालबोध अक्षराचा मजकूर ज्या मूळ मराठी लेखातील आहे तो गोखल्यांचा लेख 'राष्ट्रोन्नती' या मथळ्याखाली १९०९ साली मासिक मनोरंजनाच्या दिवाळी अंकात पान २३ वर प्रकाशित झाला होता. चरित्रलेखकांनी शेवटी परिशिष्टे दिली आहेत. त्यांत गोखल्यांच्या लेखन-भाषणातले कित्येक दुर्मिळ उतारे दिले आहेत. त्या परिशिष्टात हाही लेख आला असता तर गोखल्यांचा एक मराठी लेख लोकांपुढे आला असता.

ज्या मेळ्यांतील पद्यांवर गोखल्यांनी १९०९ साली बदनामीची फिर्याद केली, ती सन्मित्र समाजमेळ्याची पदे परिशिष्टांत दिली आहेत, हे एक फाटकांनी विशेष स्पृहणीय काम केले आहे. 'सन्मित्र समाजमेळा' व 'हिंदुपंच' यांच्यावरील फिर्यादीचीही सर्व हकीकत व्यवस्थित दिली आहे. सन्मित्र समाजमेळ्याचे चालक श्री. महाजन, पदे करणारे श्री. भिडे वकील आणि 'हिंदुपंच'चे संपादक श्री. फडके ही सर्व माणसे जन्माने ब्राह्मण होती आणि व्यवहारात सुसंस्कृत मानली जात होती. त्यांनी केलेल्या बदनामीकारक टीकेची पातळी कोणत्या दर्जाची आहे हे आजच्या वाचकांना अजमावता यावे, असे हे साधन प्रा. फाटकांनी उपलब्ध करून दिले आहे, ही गोष्ट इतिहासदृष्ट्या फार महत्त्वाची मानली पाहिजे. कारण गणेशोत्सवावरील इतिहास-ग्रंथात ही माहिती येण्याचा संभव नाही.

सुमारे सवाचारशे पृष्ठांचे हे चरित्र बिनतोड पुराव्याने आणि दुर्मिळ माहितीने भरलेले आहे. ते लिहिताना व्यक्तीपेक्षा इतिहासाशी थोडीशीदेखील प्रतारणा होता कामा नये असा कटाक्ष प्रा. फाटक यांनी पाळला आहे, आणि त्या बाबतीत त्यांना यश लाभले आहे हे निःपक्षपातीपणाने मान्य केले पाहिजे.

● ● ●

# मराठीसाठी रोमन लिपी*

● मधुकर ना. गोगटे ●

स्थूलमानाने विचार केल्यास असे दिसून येते की, देवनागरी लिपी ही ध्वनिनिष्ठ आहे व रोमन लिपी ध्वनींच्या बाबतीत बेभरंवशाची आहे. but व put या शब्दांतील u चे ध्वनी वेगवेगळे आहेत. honest या शब्दातील h हा ध्वनिशून्य आहे, सेल हा ध्वनी लिहिण्यासाठी sell, sail, cell अशी वेगवेगळी अक्षरयोजना होऊ शकते. त्यामानाने देवनागरी लिपी फारच चांगली आहे. पण रोमन लिपीचा मुख्य गुण म्हणजे त्यातील अक्षरे खरोखरच अ–क्षरे आहेत, त्यांच्यात विकार निर्माण होत नाहीत. याउलट देवनागरी लिपीचा शृंगार अक्षरांच्या विकृतीवरच उभारलेला आहे.

मात्रा, वेलांटी अशी स्वरचिन्हे अक्षरांना चिकटवून आपण अक्षरे विकृत करतो. आणि जेव्हा जोडाक्षरांचा प्रश्न येतो तेव्हा या विकृत्या अतिशयच असंबद्ध ठरतात. "नाट्य" शब्दात " य " हे अक्षर अतिशय विकृत केलेले दिसते. " ट्र " हे विकृतियुक्त चिन्ह ट्रक, ट्रॅमला चालते पण Truman ला चालू शकत नाही कारण त्या विकृत चिन्हावर उकार चढवता येत नाही. Organic हा शब्द देवनागरीत लिहिताना रेफ व चंद्र यांची लढाई जुंपते! या विकृतरचनांमुळे मुद्रणाच्या व शब्दसूचींच्या बाबतीत देवनागरी लिपी रोमन लिपीच्या मागे पडतेच, पण प्रत्यक्ष लेखनातही विकृतिजन्य अनेक चुका होतात व त्या नाइलाजाने मान्य कराव्या लागतात. " नाट्य " हा शब्द " नाटय " असा अखेर लिहिला जातो! " शुद्धलेखन " या शब्दाचे लेखन व मुद्रण अनेकदा "शुद्धलेखन" असे केले जाते! "संत" हा शब्द "सन्त" असा लिहिला तर शब्दसूचीत त्याचे स्थान बदलते. "मूर्ति" या शब्दातील उच्चार मू–र्- त्–इ असा आहे पण लेखनक्रम मू-इ–त्–र् असा विसंगत आहे. " सरकार, " " राज्य " या शब्दांचे वास्तविक उच्चार व लेखन " सर्कार्, " " राज्ज " असे हवे. देवनागरी लिपींत एकच अनुस्वारचिन्ह अनेक अनुनासिकांसाठी वापरले जाते. अंत्यकान्याची, मध्यकान्याची व बिनकान्यांची अशी वेगवेगळ्या प्रकारची अक्षरे देवनागरीत आहेत व त्यांचे जोडाक्षरांचे नियम वेगवेगळे आहेत. " अन्य " या शब्दातील " न " आपण " विद्वान् " मध्ये वापरू शकत नाही ( विद्वान ), तेथे तो न् अकार घालून पूर्ण करावयाचा व नंतर हलन्त लावून तो अकार काढायचा.

देवनागरी लिपीची सुधारणा करण्यासाठी प्रयत्न झाले आहेत पण हे प्रयत्न म्हणजे वरवरच्या मलमपट्ट्या आहेत. लिपीचा पिंडच मुळी सुधारणेला वाव न देणारा आहे, त्याला काय करावे? लिपिसुधारणा ही मुद्रणाच्या सोयीसाठी करायची असे नव्हे, तर मुळातच सुसंगतीसाठी ही सुधारणा आवश्यक आहे. लिपिसुधारणा न करता, मुद्रणयंत्रात सुधारणा व युक्त्या शोधा असे म्हणणेही अयोग्य आहे. मुळात लिपीच निकृष्ट असली तर यंत्र तरी काय करणार? आता 'बोले तैसा छापे' असे यंत्र निर्माण होऊ लागले आहे, तेथे आम्ही आग्रह धरून राहिलो की आम्ही " मूर्ति " असेच लिहिणार, यंत्र बदला! तर ते यंत्रच सिद्ध होणार नाही पण murti या प्रकारे ध्वनींना अनुसरून क्रमाने लेखन करणारे रोमन लिपीचे यंत्र मात्र सिद्ध होईल! एखाद्या प्रचंड यंत्रावर असंख्य टंक वापरून देवनागरी लिपी चालू स्वरूपात बसवताही येईल, पण लिपीचा उपयोग अगदी सामान्य गोष्टीतही होत असतो तिथे या युक्त्याप्रयुक्त्या काय कामाच्या? m, u, r, t, i असे ठोकळे घेऊन murti हा शब्द आपण सहज रचू शकतो. परंतु असे ठोकळे देवनागरीच्या बाबतीत अशक्य आहेत; कारण देवनागरीची रचना अक्षरांच्या विकृतींवर आधारली आहे. ठोकळे म्हणजे एक प्रकारचे टंकच आहेत. साक्षरताप्रसाराला या ठोकळ्यांचा अतिशय उपयोग होतो. पण देवनागरीच्या बाबतीत अनेक बाराखड्या आम्हांला नाहक अभ्यासाव्या लागतात. शब्दसूची, मुद्रण, साक्षरताप्रसार यांसाठी रोमन

---

*महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या पुणे येथील पहिल्या विभागीय साहित्य संमेलनातील परिसंवादात ता. २९ ऑक्टोबर १९६७ रोजी वाचण्यात आलेला निबंध. लेखकांच्या दुरुस्त्या-पुरुस्त्यांसहित.

अनुक्रमणिका

लिपी अतिशय सोईस्कर आहे व टाइपरायटरवरही ती आज सिद्ध असल्याने व प्रत्येकाला दोन दोन टाइपरायटर घेणे परवडेल असे नसल्याने या दृष्टीनेही मराठीच्या लिपीचा विचार व्हावा.

देवनागरीलिपीचा एक महत्त्वाचा गुण म्हणजे तिच्यातील लेखन बव्हंशी ध्वनि-अवयवांनुसार syllable होते व त्यामुळे लेखन संक्षिप्त होऊन वाचनास सुलभता येते, हे मान्य करायलाच हवे. उदाहरणार्थ " ध्वनी " या या शब्दात दोन अवयव आहेत. ( ध्व ), ( नी ) रोमन लिपीत dhvani असे विस्ताराने लेखन करावे लागते. व त्यामुळे वाचनाला जरा काठिण्य येते. पण सवयीने हे काठिण्य नाहीसे होईल. अन्य लाभांसाठी हे पत्करायला हवे. उपमा द्यायची झाल्यास, अपूर्णांकांचे उदाहरण घेऊ. पाव हा अपूर्णांक ¼ असा आपण लिहू शकतो ही देवनागरी शैली झाली, यात १, ४ हे अंक विकृत, लहान स्वरूपात आले व " चारातील एक भाग " अशा अर्थाचे संक्षिप्त दर्शनही होते. हाच अपूर्णांक ·२५ असाही आपण लिहू शकतो. ही रोमन लिपीचा शैली म्हणता येईल, यात अंकाची विकृती नाही, टंक पुढेपुढे रचून आशय सिद्ध होतो व लेखनही जरा विस्तृत झाले. पण ·२५ यात सोय आहे ती ¼ मध्ये नाही. त्याचप्रमाणे रोमन लिपी देवनागरीपेक्षा सोईस्कर आहे.

रोमन लिपीचा अवलंब करताना ध्वनिभेद दर्शविण्यासाठी कित्येकदा डायाक्रिटिकल मार्क वापरण्यात येतात. म्हणजे उदाहरणार्थ a अक्षरावर एक आडवी रेघ दर्शविल्यास होणाऱ्या अक्षराचा उच्चार " आ " व नुसत्या " a " चा उच्चार " अ " मानायचा. पण अशा खुणा लेखनात, मुद्रणात, कार्बन प्रती काढताना स्पष्ट राहतीलच असे नसल्यामुळे त्यांची योजना बरोबर ठरत नाही, व त्या योजनेसाठी असे मार्क वापरलेले नवे टंकही निर्माण करावे लागतील. त्या ऐवजी, ध्वनिभेद दर्शविण्यासाठी लहान व कॅपिटल अक्षरे वापरणे सोईचे होईल. a = अ व A = आ, अशा प्रकारे योजना करावयाची. यासाठी नवे टंक करायला नकोत, वाचनात गफलतही होणार नाही. ही लिपी तावडतोब अमलातही आणता येईल. a, A यांचा परस्पर संबंध न मानता ती अक्षरे पूर्णपणे स्वतंत्रच समजायची. लहान अक्षरे व कॅपिटल अक्षरे अशा दोन प्रणाली वस्तुतः ठेवण्याचे कारणच नाही आणि म्हणून या दोन्हींचा समन्वय करून आपणास मराठीसाठी रोमन लिपी सिद्ध करता येईल. मध्येच कॅपिटल अक्षरे आल्याने सौंदर्यहानी होते, व शीघ्र लेखनाला हे सोईचे नाही, हे आक्षेप अस्थानी नाहीत. पण याही बाबतीत असे म्हणता येईल की सवयीने हे दोष वाटेनासे होतील.

मराठीतील उच्चार लक्षात घेता पुढील प्रकारे आपण रोमन लिपीची मराठीपुरतीतरी योजना करावी. रोमन लिपी मुळगत स्वरूपातच घ्यायला हवी, एक चिन्ह एक ध्वनी या तत्त्वानुसार ती असावी. " च् " या ध्वनीत " ह " नसल्यामुळे ch=च् अशी योजना मूढपणाची ठरेल. रोमन लिपीचा स्वीकार अंधश्रद्धेने करायचा नाही. मराठी भाषेस अनावश्यक असलेले विसर्ग, अर्धानुनासिक ष, ऱ्हस्वदीर्घत्वाचे उपचार आपण गाळावेत व लिपीवद्लाची संधी साधून लेखन उच्चारानुवर्ती करावे.

a = अ; A = आ; b = ब् c = च् ( चार ) C = च् ( चमचा ); d=द्; D=ड्; e=ए; E=ॲ; f= फ् (फ्रूट ); g=ग्; h=ह्; i=इ; J=ज़्(जीवन); k=क्; l = ल्; L=ळ् m=म्; n=न्; N=ण्; o=ओ; O=ऑ; p = प्; r = र्; s = स्; t = त्; T = ट्; u = उ; v = व्; x = श्; y = य्; z = ज् ( जहाज )- ( एकूण ३२ अक्षरे )

या लिपीनुसार लेखनाचे नमुने पाहा: —

1. jana gaNa mana adhinAyaka
   jaya he bhArata bhAgya vidhAta
2. Anandi Ananda gaDe
   ikaDe tikaDe cohikaDe
3. hiCe putra Amhi hiCe pAnga pheDu
   vase AmucA mAtra rhunmandiri
   jaganmAnyatA hisa arpu pratApe
   hilA baisavu vaibhavAcA xiri !

काही विशिष्ट शब्दांचे ध्वनीनुसार लेखन पुढीलप्रमाणे होईल:-यज्ञ-yadnya सरकार-sarkAr राज्य=rAjja दुःख-dukkha संसार-savsAr चमचा-CamCA.

चालू युग हे विज्ञानाचे युग आहे. बुद्धिवाद व द्रुतगती ही या युगाची वैशिष्ट्ये आहेत व याबाबतीत निकृष्ट ठरणारी साधने कालबाह्य ठरणे स्वाभाविक आहे. लिपी म्हणजे एक साधनच आहे. देवनागरी लिपी आजच्या बुद्धिवादाला व द्रुतगतीच्या मागणीला पुरी

अनुक्रमणिका

पडते का ? हा प्रश्न खरोखर विचारात घेतला पाहिजे. "सर्‌कार्," "दुक्ख" असे वास्तविक उच्चार असताना "सरकार", "दुःख" अशी चुकीची अक्षर-योजना करणे म्हणजे शुद्ध आत्मवंचना आहे. ऱ्हस्वदीर्घाचे भेद, अर्धानुनासिके अशा पारंपरिक पण विनमहत्त्वाच्या गोष्टींना आपण बाजूला सारणेच उचित ठरणार आहे. प्रत्येक गोष्टीत, प्रत्येक क्रियेत आपण तर्कशुद्धता इच्छितो, हा महाराष्ट्रीयांचा स्वभावधर्मच आहे. तत्त्व वापरून सीमाप्रश्न सोडवावा असा आग्रह मराठी भाषिक धरतात व तो योग्यच आहे. पण आश्चर्याची गोष्ट ही की लिपीच्या बाबतीत मात्र आम्ही तत्त्वप्रियता दाखवीत नाही. उकाराची शेपटी अक्षराखाली लावायची हे आमचे तत्त्व आम्ही "र" या अक्षराबाबत मात्र अमलात आणीत नाही. तेथे "रु" ऐवजी "रु" असे आम्ही लिहितो. नीट विचार केला तर देवनागरी लिपीपेक्षा रोमन लिपी अधिक गुणवान आहे असे आपणास दिसून येईल. दोन्ही लिप्यांचे गुण स्वीकारून एक चिन्ह–एक ध्वनी या तत्त्वानुसार सुधारलेली रोमन लिपी (वाटल्यास तिला रोमनागरी लिपी म्हणावे) स्वीकारणे आपल्या हिताचे आहे. परकीयांकडून आपण विरामचिन्हे घेतली, दशमान वजनेमापने घेतली, त्याचप्रमाणे त्यांची लिपीही स्वीकारण्यात वैषम्य वाटण्याचे कारण नाही. हे सांस्कृतिक आदानप्रदान आहे.

शेवटी अंकपद्धतीबाबत विचार मांडतो. भारतात अनेक भाषा आहेत व प्रत्येक भाषेतील अंकचिन्हे वेगवेगळी आहेत. ही चिन्हे समान असणे सर्वांच्या हिताचे आहे. फूटपट्टी, टेलिफोन तबकड्या, घड्याळे, आसनांक अशा विविध साधनांत भाषेची गरज नसते, गरज असते फक्त समान चिन्हांची. 1, 2, 3, 4, 5, 6, 7, 8, 9, 0 ही आंतरराष्ट्रीय चिन्हे आपण मराठीसाठीही स्वीकारणे आपल्याच हिताचे आहे. अंकपद्धतीत द्वैत ठेवण्यात कुणालाच लाभ नाही. ही आंतरराष्ट्रीय चिन्हे आज साक्षरांपासून निरक्षरांपर्यंत सर्वांना माहीत आहेतच, त्यांना "मम" असे म्हणणे एवढेच काय ते बाकी आहे.

• • •

# भाषा : एक खेळ

• हे. श्री. बिळिगिरि •

कोणताही खेळ असो, तो खेळताना दोन प्रकारचे नियम पाळावे लागतात.* खेळाडू कोणीही असला, तरी त्याला पहिल्या प्रकारचे नियम पाळावेच लागतात, मोडता येत नाहीत. दुसऱ्या प्रकारचे नियम मोडू नयेत असेही नाही, पाळलेच पाहिजेत असेही नाही. मात्र जिंकावयाचे असल्यास त्या खेळाडूने हे नियम पाळावयाचे असतात.

बुद्धिबळाचा खेळ उदाहरणादाखल घेऊ. या खेळात वेगवेगळ्या प्रकारच्या सोंगट्या असतात. प्रत्येक प्रकारच्या सोंगटीची विशिष्ट चाल ठरलेली असते. वजीर, उंट, घोडा, प्यादे इ. विशिष्ट प्रकारेच चालविता येतात. बुद्धिबळाच्या खेळातील हे काही नियम झाले. हे नियम पहिल्या प्रकारचे नियम होत. खेळाडू कोणीही असला तरी त्याला हे नियम मोडता येणार नाहीत.

प्रतिस्पर्ध्याच्या प्याद्याच्या तोंडी आपला राजा नेऊ नये असा काही बुद्धिबळाचा नियम नाही. पण असे केल्यास आपण हरण्याची शक्यता जास्त. हे दुसऱ्या प्रकारच्या नियमाचे उदाहरण होय.

काही वेळा हे दुसऱ्या प्रकारचे आडाखे मोडूनही काही विशिष्ट परिणाम साधता येतो. आपले प्यादे मारण्याचे आमिष दाखवून, प्रतिपक्षाच्या मनात मोह निर्माण करून त्याचा उंट आपल्याला मारता येतो.

तात्पर्य असे : बुद्धिबळाच्या खेळात दोन प्रकारचे नियम असतात. पहिल्या प्रकारचे नियम खेळाशी निगडित असतात. ते कोणीही मोडून चालत नाही. दुसऱ्या प्रकारचे नियम मात्र जिंकण्याच्या दृष्टीने काही वेळा पाळता येतात, काही वेळा मोडताही येतात.

*मूळ कन्नड लेख ' साक्षि ' ऑक्टो. – डिसें. १९६७ मध्ये प्रकाशित. मराठी भाषांतर : प्रा. गं. ना. जोगळेकर. डॉ. बिळिगिरि आणि मूळ प्रकाशक ह्यांच्या सौजन्याने आणि सहकार्याने तो येथे प्रकाशित होत आहे.

भाषा बोलतानाही याप्रमाणे दोन प्रकारचे नियम पाळावे लागतात.[1] पहिल्या प्रकारचे नियम पाळलेच पाहिजेत, मोडून चालणार नाही. उदाहरणार्थ कानडी वाक्यरचनेत कर्ता व क्रियापद यांच्यातील पुरुष–लिंग–वचन या बाबतीत जुळणी कशी असते ते पाहू.

नानु निन्ने बंदे ( मी काल आलो )

अवळु नाळे बरुत्ताळे ( ती उद्या येते )

आ हसु मुंदे बंदवरन्नु तिवियुत्तदे, हिंदे बंदवरन्नु ओदेयुत्तदे ( ती गाय पुढे येणाऱ्याला ढूशी देते, मागे येणाऱ्याला लाथाडते )

ह्या सर्व वाक्यांतून क्रियापद कर्त्याप्रमाणे फिरते. हा जुळणीचा नियम कुणासही मोडता येणार नाही. मोडल्यास कानडीच्या रचनेस धक्का दिल्यासारखे होईल. ' अवळु नाळे बरुत्तेने ' ( ती उद्या येतो ) असे होत नाही. हा पहिल्या प्रकारचा नियम होय.

आता ही वाक्ये पाहा :

इरुवे बेट्टवन्नु नगिन्रु ( मुंगी डोंगराला गिळती झाली )

आने तन्न सोंडिलिंद सासिवेय काळोदन्नू एत्ति ओग्गरणे हाकितु ( हत्ती आपल्या सोंडेने मोहरीच्या दाण्याला उचलून फोडणीस टाकता झाला. )

येथे पहिल्या प्रकारचे नियम पाळलेले असूनही ही वाक्ये विचित्र वाटतात याचे कारण काय ? कारण हेच की येथे दुसऱ्या प्रकारचे नियम मोडले गेले आहेत. अशा प्रकारची वाक्ये रचू नयेत असा कोठे नियम नाही. तरीही सामान्यतः कोणीही असली वाक्ये उपयोगात आणीत नाही. या वाक्यात वर्णिलेली क्रिया साधारणपणे

१ इथपर्यंतच्या विचाराचा धागा प्रा. चार्लस बहेल ह्यांच्या एका इंग्लिश लेखातून मी घेतला आहे.—हे. श्री. बी.

अनुक्रमणिका

कोठेही घडताना दिसत नाही म्हणून असली वाक्ये केली जात नाहीत हा विचार येथे प्रस्तुत नाही. तर अशी वाक्ये रचण्याचे स्वातंत्र्य असूनही कोणी त्यांचा वापर करीत नाही हेच इथे महत्त्वाचे आहे.

पुढील जागा सोडलेले वाक्य पहा :

——अन्नु तिंदुहाकितु ( ——ला खाते – झालें = —— ने —— खाल्ला – ली – लें )

रिकाम्या जागा भरण्यास सांगितल्यास पहिल्या प्रकारचा नियम काय सांगतो ? दोन्ही रिकाम्या जागी ' नाम ' जातीचेच शब्द आले पाहिजेत. दुसऱ्या जातीचे शब्द तेथे चालणार नाहीत, असे पहिल्या प्रकारचा नियम सांगतो. आणखी एक पाऊल पुढे जाऊन, हा नियम असे सांगतो की पहिल्या रिकाम्या जागी येणारे नाम नपुसकलिंगी असले पाहिजे. हा नियम मोडणे शक्यच नाही. दुसऱ्या प्रकारचा आडाखेवजा नियम याच्याही पुढे एक पाऊल जाऊन असे सांगतो की पहिल्या रिकाम्या जागी वाटेल ते नपुसकलिंगी नाम येऊन चालणार नाही. उदाहरणार्थ कल्लु ( दगड ), हुल्लु ( गवत ) यासारखे शब्द कानडीतील नपुसकलिंगी नामे असूनही तेथे येणार नाहीत. हुलि ( वाघ ), हसु ( गाय ) यांसारखेच शब्द येऊ शकतील. इतकेच नव्हे तर पहिल्या जागेचा शब्द भरल्यावर दुसऱ्या जागी येणारे नामजातीचे शब्द मर्यादित होतात. उदाहरणार्थ पहिल्या जागी हुलि (वाघ) हा शब्द निवडल्यास दुसऱ्या जागी हसु ( गाय ), करु ( वासरू ) हे शब्द येण्याऐवजी ओब्बट्टु ( पोळी ), हुल्लु ( गवत ) असले शब्द येणार नाहीत. याचप्रमाणे दुसरी जागा प्रथम भरल्यास पहिल्या जागी कोणती नामे यावयाची हेही त्यानुसार मर्यादित होते.

हा दुसऱ्या प्रकारचा नियम मोडल्यास ती चूक म्हणून गणली जाणार नाही, चमत्कारिक मात्र दिसेल. मात्र पहिल्या प्रकारचा नियम मोडला तर ते कानडी वाक्यच होणार नाही.

## ३

बुद्धिबळाच्या खेळात काही वेळा दुसऱ्या प्रकारचा नियम मोडूनही विशेष परिणाम साधता येतो. भाषेतही हेच साध्य असते. ह्याच शक्यतेचा उपयोग कवी लोक करून घेत असतात असे दिसून येते. भाषेचा सर्वसाधारण उपयोग आणि कवीकडून होणारा उपयोग ह्यामधील फरक नेमका इथेच जाणवतो. दुसऱ्या प्रकारचे नियम मोडीत जाणे हा कवीचा नित्याचा धंदा आहे. असले आडाखेवजा नियम मोडूनच कवी विशेष परिणाम साधत असतो.

या बाबतीतली उदाहरणे माझ्यापेक्षा अधिक काव्यपरिचय असणाऱ्या वाचकांनाच देता येतील.

• • •

## साभार–स्वीकार

**माधवजूलियन** ( दु. आ ) : गं. दे. खानोलकर, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३४; १६ रु.

**आधुनिक भारतीय साहित्य** :— ( कॉंटेंपोररी इंडियन लिटरेचर ) : साहित्य एकादेमीसाठी भारतीय ग्रंथभवन, मुंबई १४; १२ रु.

**घरंगेच्या काठी** ( कादं- ) : ज्योत्स्ना देवधर, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३४; ४ रू.

अनुक्रमणिका

# परीक्षणे

## काही अप्रसिद्ध ऐतिहासिक चरित्रे

ले.–**य. न. केळकर**, प्र.–नीलकंठ प्रकाशन, पुणे, पृ. १६१, १९६७, किं. रु. ३–५०

स्वतःला 'बुद्धिवादी' म्हणविणाऱ्या महाराष्ट्रांत कोणत्याही क्षेत्रात टोके गाठणारी बुद्धीची चमक जितकी प्रत्ययास येते, तितकी विधायक समावेशक सर्वांगीण उभारणी करण्याची परिपूरणात्मक सावधगिरी आढळत नाही, ही एक खेदजनक उणीव आहे. पाश्चात्य वळणाऱ्या पक्षपाती इतिहासांचे परखड परीक्षण करून शेवटी 'आपला इतिहास आपणच लिहिला पाहिजे' या रोकड्या सिद्धान्ताला पोचलेल्या राजवाड्यांनी त्याच्या सिद्ध्यर्थ अस्सल साधनांच्या संशोधन–प्रकाशनाचा सपाटा लावला आणि इतिहासक्षेत्रात महत्त्वाचे गौरीशंकर गाठले. पण त्याच वेळी अर्ध्या हळकुंडाने पिवळ्या होऊ पाहणाऱ्यांना त्यांनी स्पष्टच बजावले की, "इतिहासाच्या वाचनाने स्वदेशप्रीती उत्पन्न होते, ह्या आशेने कित्येक उतावीळ वाचक ह्या (ऐतिहासिक अस्सल छापलेल्या) पत्रांचे सेवन करतील; परंतु ह्या खोट्या आशेवर माझी बिलकूल भिस्त नाही...ज्यांच्या वाचनाने स्वदेशप्रीती उत्पन्न होते, ज्यांच्या निदिध्यासाने राष्ट्रांचा उद्धार होतो, **तीं हीं पत्रें नसून, ह्या पत्रांपासून उत्पन्न झालेला जो इतिहास तो होय.** इतिहासापासून मिळणारे फळ ऐतिहासिक पत्रांपासून कदापि मिळणार नाही." (मराठ्यांच्या इति. साधनें, खंड ५, उपोद्घात, पृ. २). इतिहासाचे हे राष्ट्रोद्धारक महत्त्व ओळखूनदेखील लो. टिळकांसारख्या समर्थ देशभक्तांना इतिहासलेखनाला सवड झाली नाही आणि न्या. मू. रानडे, तेलंग आणि तदनंतर न. चिं. केळकर यांनी इतिहासलेखनात लक्ष घालून त्याचे महत्त्व मान्य केले असले तरी आपल्या व्यापक बुद्धिमत्तेचा उपयोग त्या कामात त्यांना पुरेशा प्रमाणात करता आला नाहीच. गत घटितांचे सलग कथन म्हणून सरदेसायांच्या रियासतींचे विशिष्ट स्थान सर्वमान्य असले, तथापि राजवाड्यांच्या वरील अवतरणातील 'राष्ट्रोद्धारक इतिहास' तो हा नव्हे हे जाणत्यांच्या ध्यानात आलेले आहे.

एका टोकाला लक्षावधी पत्रादिसाधनांचा असंघटित अमर्याद संग्रह आणि दुसऱ्या टोकाला विस्कळित, गोलमाल, क्वचित परस्पर विसंगतीमुळे कोणतीच प्रेरणा अगर निश्चित ज्ञान करून देण्यास असमर्थ अशी कथा-कंथा या दोन टोकांमध्ये पुष्कळच विधायक चिंतन, मनन, लेखन साक्षेपाने करण्यासारखे आहे. याची पर्वा अलीकडे शिक्षणखाते आणि विद्यापीठे यांना पूर्वीइतकी राहिलेली दिसत नाही. केवळ इतिहासाला वाहिलेल्या म्हणून ज्या संस्था आहेत त्या सर्वसाधारणांना सहज करता येणार नाही त्या साधनसंग्रहाच्या कामातच व्यग्र होऊन राहिल्या असल्यास त्यांना तसा दोष देता येणार नाही. अशा परिस्थितीत प्राचीनादी इतिहासाच्या वाट्याला भरपूर प्रमाणात लाभलेल्या सरकारी व विद्यापीठीय द्रव्यादायाला पारख्या झालेल्या मराठा इतिहासातील श्री. य. न. केळकर यांनी बरेच वर्षांपासून चालविलेली एकांडी शिलेदारी फार महत्त्वाची असून अनेक दृष्टींनी गौरवास्पद आणि अनुकरणीयही आहे, याची सुज्ञांनी दखल घेतली पाहिजे.

श्री. य. न. केळकर यांस सरस्वतीचा प्रसाद आनुवंशिक असून ते रसिक, कवी तसेच मार्मिक विनोदी लेखकही आहेत. परंतु त्यांचा इतिहास हा विषय आवडीचा आणि हातखंडा आहे, हे त्यांच्या ऐतिहासिक पोवाड्यांचे दोन खंड आणि वसईच्या मोहिमेवरील विद्वन्मान्य प्रबंध यांनी तीस वर्षांपूर्वीच सिद्ध झाले आहे. त्यांच्या द्विखंडात्मक ऐतिहासिक कोशाने तर त्यांच्या मूल्याही इतिहासप्रेमाची पुरेपूर ग्वाही दिलेली आहे. असे असताही त्यांच्यासारख्या पट्टीच्या लेखकाला आणि स्वतः संग्राहक व संशोधक असलेल्या इतिहासभक्ताला प्रकाशनसाहाय्याच्या अभावी फारसे ग्रंथ जनतेला सादर करता आले नाहीत हे आजच्या मौलिक इतिहासाला प्राप्त झालेल्या मंदीचेच द्योतक म्हणावे लागेल.

इतिहासाच्या सर्व प्रक्रियांचा अनुभव घेतलेल्या केळकरांना आजच्या इतिहासाचे स्वरूप आणि त्यातील प्रमुख उणीव तीव्रतेने जी जाणवली ती त्यांनी प्रस्तुत पुस्तकाच्या प्रस्तावनेत प्रथमारंभीच नमूद केली आहे.

अनुक्रमणिका

'गेल्या शे-सव्वाशे वर्षांत मराठ्यांच्या राजकीय इतिहासाचा सांगाडाच तेवढा उभा राहिलेला आहे. काही घटनांची फक्त नोंद किंवा उल्लेख सापडतो. हीच दुरवस्था हजारों ऐतिहासिक व्यक्तींबाबतही जाणवते-— अशा ऐतिहासिक व्यक्तींचे प्रत्येकी स्वतंत्रपणे संशोधन होऊन त्यांची चरित्रे साधार निर्माण होतील तेव्हाच उपलब्ध मराठ्यांच्या इतिहासप्रासादाच्या दरजा भरतील आणि त्याला खरी मजबुती आणि सौंदर्य प्राप्त होईल." उपलब्ध इतिहासाचा मर्मग्राही अभ्यास करणाऱ्या प्रत्येकाच्या प्रत्यंतरास येणारे हे सत्य आहे. अशा तऱ्हेच्या संपूर्ण आणि समावेशक दुय्यम सामग्रीच्या अभावीच आजचे एतद्विषयक चरित्रकोशादी संदर्भग्रंथ आणि रियासती व प्रबंधादी सिद्धग्रंथ केवळ त्रोटक, जुजबी आणि असमग्र आणि म्हणून असमाधानकारक वाटतात.

श्री. केळकर यांनी १९६४ मध्येच प्रसिद्ध केलेल्या आपल्या 'इतिहासातील सहली खंड २' मध्ये अशा-प्रकारचे संकलित साहित्य आणि विशेष म्हणजे नावजी बलकवडे या प्राणावरचा खेळ खेळून किल्ले जिंकणाऱ्या एका अज्ञात मराठावीराचे संस्मरणीय चरित्र सांगितले. त्याहून अधिक महत्त्वाच्या आणखी आठ दुय्यम दर्जाच्या व्यक्तींची संकलित चरित्रे प्रस्तुत पुस्तकात वर्णिली आहेत. इतिहासकार चांगले लेखक क्वचित असतात आणि रसिक साहित्यिक इतिहासाची पथ्ये पाळतात असेच नाही. परंतु श्री. केळकर यांच्यामध्ये हे दोन्ही गुण असून ते हाडाचे इतिहाससंशोधकही आहेत, याचे प्रत्यंतर या छोटेखानी पुस्तकाच्या पानोपानी मिळते. हल्ली प्रकाशित ऐतिहासिक साधनग्रंथांचा फापट-पसारा इतका झाला आहे की, त्या सर्वांचा अभ्यास करून त्यांतून अशा प्रकारचे एकेका विषयावरचे वा घटनेवरचे माहितीचे कण एकत्र केल्यानेही ते बोलके आणि बोधक होतील. श्री. केळकरांनी असा प्रयत्न तर केलाच आहे, पण त्याशिवाय या प्रत्येक संकलनामध्ये आपल्या सदैव चालू असलेल्या संशोधनातून अगदी नवी मोलाची भर घातलेली आहे. किंबहुना अशा नव्या संशोधनाचा धागा हाती सांपडल्यानेच त्याच्या आस-पासच्या पूर्वज्ञात घटनांचा व्यूह रचण्यास ते प्रवृत्त झाल्याचाच प्रकार सर्वत्र आढळतो आणि त्यांच्या या प्रयत्नांनी एक प्रकारची ताजेपणाची टवटवी व सुगंध लाभतो.

(१) रामशास्त्री प्रभुणे (निस्पृह न्यायाधीश), (२) जनार्दन बाजीराव (बल्लाळ) पेशवे आणि त्यांची पत्नी सगुणाबाई (पेशवे घराण्यातील व्यक्ती), (३) चिमणाजी रघुनाथ पेशवे (औटघटकेचे पेशवेपद मिळा-लेला दुर्दैवी जीव), (४) परशराम खंडेराव ऊर्फ अन्याबा राहतेकर (दुसऱ्या बाजीरावाच्या कुटिल आणि रंगबाजीच्या कारस्थानातील कर्तबगार हस्तक), (५) आबा शालूकर (समकालीन जीवन जगणारा सरदार मुत्सद्दी) (६) ज्योतिपंत दादा महाभागवत (शेकडो विठ्ठल मंदिरे बांधण्याचा यशस्वी संकल्प करणारा विठ्ठलभक्त), ७. विठ्ठलपंतपाध्ये (पट्टीचा विद्वान् आणि पाध्येजोशी वादात ज्याच्या विरुद्ध पेशव्यांनी पक्षपात केल्याचा आरोप पेशव्यांवर आला असे पक्षकार), आणि (८) रामचंद्र गोसावी पैठणकर (एक दुसऱ्या बाजीरावकालीन गवय्या आणि रावबाजींचा विलासमित्र) अशी आठ चरित्रे प्रस्तुत संग्रहात आहेत. यात विविध प्रकारच्या व्यक्तींची निवड झाल्यामुळे इतिहासकालांतील राजकीयच काय पण व्यावहारिक जीवनाच्या विविध पैलूंची आणि तत्कालीन जीवनराहणीची चांगली जानपछान वाचकांना होते. काटेकोर कसोटी लावून पाहिली तर यातील चरित्रे जशीच्या तशी उचलून एखाद्या विस्तृत कोशात समाविष्ट करता येणार नाहीत हे उघड आहे. कारण तशी नेमकी बांधणी करण्यास आजची साधने पुष्कळच अपुरी आहेत. पण म्हणूनच मिळेल तो माहितीचा अंश संकलित केल्याने जरी चरित्रात आवांतर माहिती गोष्टी वेल्हाळपणे सांगितल्याचा आक्षेप घेता येतो, तरीदेखील ती माहिती साधार, विश्वसनीय आणि रोचक असल्यामुळे तांत्रिक इतिहासाच्या सांगा-ड्याला रंजक माहितीचे रक्तमांस पुरविणारी हकीकत म्हणूनही तिचे सर्वसाधारण वाचक मोठ्या आनंदाने स्वागत करतो. चरित्रनायकाचा अल्पसा संबंध असतानाही अनुषंगाने केळकरांनी वर्णन केलेली अशी किती तरी उपाख्याने सावध वाचकाला बहुश्रुत केल्या-शिवाय राहात नाहीत. शूर राघोबाचा व समकालीनांचा मंत्रताईतांवरचा विश्वास, पुण्यावरील निजामाची स्वारी, रामशास्त्र्यांवरही आलेला पक्षपातीपणाचा आरोप, सगुणाबाईंचा ग्रंथसंग्रह, पेशवे घराण्यातील राजकारणा-संबंधी शिक्षणपद्धती, रमण्यातील दक्षणा वाटण्याबद्दलचा तपशील, अव्वल इंग्रजीतील सावध राजनीती, शिंदे व नाना यांच्या कारस्थानाची जुगलबंदी, बाजीरावाचे

कारभारी म्हणून इंग्रजांनी केलेली कारवाई, अहमदाबादेतील भद्रवासी महाराष्ट्रियांचे मूळ, अशा कितीतरी गोष्टी ओघात केळकरांनी चपखलपणे वर्णन करून सांगितल्या आहेत. त्यामुळे एखादी बाजीरावाच्या सहाव्या लग्नाची गोष्टही उगाच सांगितल्याची बोच राहात नाही आणि एकंदरीत बरेच नवे कळल्याने समाधान वाटते.

अफाट साधनविस्तारातून नेमके माहितीचे कण वेचायचे काम इतके किचकट आहे की एवढा प्रपंच करताना बारीकसारीक गोष्टीत विसंगती राहिली तर ती क्षम्य समजली पाहिजे.

श्री. केळकर हे ज्या पद्धतीने हे छोटी चरित्रे रचण्याचे काम करीत आहेत ते इतके अवश्य नव्हे अपरिहार्य आहे की, संपूर्ण इतिहासलेखनाला हात घालण्यापूर्वी कोणाही लेखकाला तशा प्रकारचे विश्वसनीय लिखाण हाताशी बाळगावेच लागेल. असे काम एकहाती पुरे करण्याची आकांक्षा कोणीच धरू शकणार नाही. अनेक व्यक्तींचे म्हणजेच संस्थाश्रयी सदस्यांचे, मंडळांचे हे रास्त काम आहे. त्याचा पायंडा मोठ्या धीराने, आणि तसे म्हटले तर समर्थतेने व सातत्याने श्री. केळकर यांनी ( जाणतेपणाने आणि आपले परिश्रमाने मिळविलेले ज्ञान आणि अनुभव पणास लावून ) घातला आहे, हे या पुस्तकाचे वैशिष्ट्य म्हटले पाहिजे. सुज्ञांनी इकडे आस्थेने लक्ष देऊन या प्रकारचे काम कसे वाढेल याची चिंता वाहिली पाहिजे, आणि अंतिम इतिहासाचे हे प्राथमिक आवश्यक पायाभूत काम वाढविले पाहिजे.

**दि. वि. काळे**

●

## अनुभवामृत

संपादक– **डॉ. वा. दा. गोखले,** नीळकंठ प्रकाशन, पुणे ९; मूल्य रु. १०।–

महाराष्ट्र साहित्य परिषदेने १९६७ साली संशोधन-शाखा चालू केली व अनुभवामृताची संशोधित पाठसहित आवृत्ती सिद्ध करण्याचे काम, डॉ. वा. दा. गोखले यांजकडे सोपविले. ज्ञानेश्वरीचीही तशीच आवृत्ती प्रसिद्ध करण्याची योजना परिषदेच्या विचाराधीन आहे.

कै. डॉ. वा. दा. गोखले यांनी अनेक हस्तलिखितांच्या आधारे सिद्ध केलेली ज्ञानदेवांच्या अनुभवामृताची पाठभेदांसहित संशोधित अशी प्रस्तुत आवृत्ती त्यांच्या तिसऱ्या पुण्यतिथीला, त्यांचे स्नेही डॉ. एकनाथराव कुलकर्णी यांच्या साहाय्याने, नीलकण्ठ प्रकाशनाने प्रकाशित केली आहे. डॉ. गोखले यांचे संपूर्ण जीवन अध्ययन–अध्यापनाला वाहिले होते. ना.दा. ठाकरसी महिला विद्यापीठात त्यांनी वीस वर्षे संस्कृताचे अध्यापन केले व त्याबरोबर म. सा. परिषदेच्या चिटणीसाचे कार्यही सोळा वर्षे केले. शेवटची बारा वर्षे त्यांनी प्राधान्याने संशोधनात व्यतीत केली. पहिल्या सहा वर्षांत त्यांनी डॉक्टोरेटकरिता प्रबंध लिहिला व नंतरच्या सहा वर्षांत अनुभवामृताची पाठसंशोधित प्रत सिद्ध केली.

डॉ. गोखले हे साहित्यसंस्था व साहित्य यांची निरपेक्ष सेवा करणारे सात्त्विक वृत्तीचे विद्वान होते. वासुदेवानंद सरस्वतींवर त्यांची दृढ श्रद्धा होती आणि एकाकी अशा निवृत्त जीवनात रोज कित्येक तास ते नियमाने साधनेत घालवीत. मृत्यूपूर्वी चार दिवस त्यांना त्याची सूचना मिळाल्याचे आणि मृत्युशय्येवरही "मी आंतून सावध आहे व झालेल्या दिव्य दर्शनाचा क्षण पुनः अनुभविण्याच्या प्रयत्नात आहे" असे प्रस्तुत लेखकाजवळ ते म्हणाले होते. असा हा सात्विक वृत्तीचा विद्वान प्राध्यापक, आपल्या आयुष्याच्या अखेरच्या काळात, परिश्रमपूर्वक सिद्ध केलेली, अनुभवामृताची ही पाठ-संशोधित आवृत्ती प्रसिद्ध झालेली पाहण्यास जगला नाही ही खेदाची गोष्ट होय.

ही प्रत सिद्ध करण्याकरिता त्यांनी फार कष्टाने हस्तलिखिते गोळा केली. त्यासाठी इंदूर ते तंजावर आणि नंदुरबार ते मद्रास असा प्रवास केला. 'सोशिकपणाची कसोटी, कष्टांची पराकाष्ठा आणि अपमान गिळण्याचा सराव म्हणजे संशोधनकार्य' हा अनुभव त्यांनाही आला. अनुभवामृताच्या दोनशे–अडीचशे प्रती त्यांनी पाहिल्या. त्यांतील काही हाती आल्या. त्यातील बऱ्याच नकला होत्या. काही अगदी जीर्ण व काही त्रुटित होत्या. या सर्व पोथ्यांतून स्थलकालाच्या दृष्टीने महत्त्वाच्या अशा ९४ हस्तलिखित आणि बावीस मुद्रित मिळून ११६ प्रतींचे वर्गीकरण करून त्यांतील पाठभेद प्रस्तुत संशोधित प्रतीत त्यांनी नोंदले आहेत. यावरून त्यांच्या परिश्रमांची कल्पना येईल.

येथे प्रथम हे सांगून टाकलेले बरे की, उपलब्ध सर्व पाठभेदांसह जुन्या पोथ्या छापण्याचे महत्त्व चार

चिकित्सक विद्वानांपुरतेच सीमित आहे. सर्वसामान्य भाविक वाचक, असे सर्व पाठभेद लक्षात घेऊन, हे ग्रंथ वाचीत नाहीत. त्यांना कोणत्या तरी बहुजनमान्य संप्रदायातील पोथी, भाषांतर किंवा अर्थबोधक टीपा यांसह पुरी होते. त्यांना जे मानसिक समाधान पाहिजे असते, ते अशा पोथ्यांपासून आजपर्यंत मिळत आले आहे. पोथ्यांच्या बहिरंग चिकित्सेपेक्षा अंतरंगात शिरण्याचीच त्यांची इच्छा असते. त्यांच्या दृष्टीने ही पाठभेदांसह पोथ्या छापण्याची कामे निरुपयोगी असतात. हे लक्षात ठेवूनच केवळ वैयक्तिक समाधानाकरिता म्हणून हे परिश्रम करावयाचे असतात. चार विद्वानांच्या वाद-विवादाचे साधन म्हणूनच अशा संशोधित पाठसहित ग्रंथांचा प्राधान्याने उपयोग होतो असा अनुभव आहे.

या वादविवादांना त्यातल्यात्यात कमी अवकाश मिळावा म्हणून अनुभवामृताची ही पाठसंशोधित आवृत्ती सिद्ध करताना, डॉ. गोखले यांनी, त्यांना मिळालेल्या प्रकरणरहित हस्तलिखितांतील सर्वांत जुनी शके १६०० ची कानुले प्रत प्रमाण मानून स्वीकारली. ती त्रुटित असल्यामुळे तिच्याशी सामान्यतः जुळणाऱ्या धुळे व गोडबोले प्रतींतून तेवढी संहिता घेतली आणि नेहमीच्या पद्धतीप्रमाणे ही प्रत वर देऊन, खाली टीपांत इतर प्रतींतील पाठभेद नोंदवले. अलीकडच्या नव्या पद्धती-प्रमाणे, अनेक प्रतींतील पाठ निवडून संभवनीय मूळ प्रतीची पुनर्निर्मिती करण्याचा प्रयत्न त्यांनी केला नाही. कारण अशी " पुनर्निर्मिति करणे हे सिद्ध प्रज्ञेचे कार्य अति दुर्घट आहे " असे त्यांना वाटले. ( प्र. पा. ३० ) डॉ. गोखले यांच्या निरहंकार वृत्तीला हे साजेसेच आहे. आपल्या " आशीर्वादां "त प्रा. सोनोपंत दांडेकरांनी या पुनर्निर्मितीच्या नवीन प्रकारातील धोका स्पष्ट केला आहे. " मुळात बदल करून हस्त-लिखित छापले म्हणजे कालांतराने मूळ पाठच नाहीसा होण्याचा संभव असतो. यामुळे ज्यांनी ही ' नवीन संहिता ' तयार केली त्यांना कालान्तराने आत घातलेल्या पाठापेक्षा दुसरा पाठ बरा वाटला तर पुनः नवीन आवृत्ती काढावी लागण्याची आपत्ती येईल. याच्या उलट जुन्या प्रकारात पाठ ठरविताना सर्व बाजू सुज्ञ वाचकास मोकळ्या राहिलेल्या आहेत. विचार करून निवड करण्यास जागा आहे. "

मूळ संहितेतील पाठ बदलून, आपणास योग्य वाटलेले इतर प्रतींतील पाठ त्या जागी घालून एखाद्या प्राचीन ग्रंथाची पुनर्निर्मिती करणे म्हणजे वस्तुतः एक नवीन ग्रंथच तयार करण्यासारखे आहे. मूळ पाठ बदलून त्या जागी इतर पाठ का घेतले ? ते ज्या प्रतींवरून घेतले त्यांची प्राचीनता विश्वसनीय आहे काय ते कारणांसह सांगणे अशा ठिकाणी आवश्यक असते व ती कारणे सर्वांना पटणे शक्य नसते. भाषाशास्त्रदृष्ट्या सारखेच जुने असे दोन पाठ असले तर त्यातील एक निवडण्यात व्यक्तिनिष्ठता येते व त्यात त्या व्यक्तीचे पूर्वग्रह प्रतिबिंबित होतात. अनवधाप्रमाणेच काही हेतूने मूळ पाठात बदल झाला असेल तर अनुभवा-मृतासारख्या तत्त्वज्ञानाविषयी मतभेद असणाऱ्या ग्रंथातील मूळ पाठ निवडतानाही अशा हेतूचा संभव दुर्लक्षिता येत नाही. ज्ञानेश्वरकालीन भाषेचे व्याकरण लक्षात आले म्हणजे भाषाशास्त्रदृष्ट्या जुने पाठही बनावट असण्याचा संभव लक्षात घ्यावा लागतो. वस्तुतः निरपवाद रीतीने मूळ पाठ निश्चित झाल्यावर, त्यावरून नंतर तत्त्वज्ञान निश्चित केले पाहिजे, पण तत्त्वज्ञान स्वमताप्रमाणे आधी निश्चित केले असेल तर मूळ पाठ ठरविताना व्यक्तिनिष्ठतेचा धोका वाढतो. वारकरी संप्रदायातील भाविक लोक सोडले तर पाठशुद्धीच्या विषयी एकनाथासारख्या सच्चरित सिद्धप्रज्ञ सत्पुरुषाविषयीही जेथे शंका घेतली जाते तेथे अशी व्यक्तिनिष्ठ नवीन संशोधित आवृत्ती काढण्याबद्दल चिकित्सक वाचकांनी शंका घेतली तर त्यात आश्चर्य नाही. म्हणून पाठभेदांनी भरलेल्या आधीच्या पोथ्यांत आणखी एका प्रतीची भर घालण्यापेक्षा उपलब्ध प्रतींतील सर्वांत जुनी पोथी जशी असेल तशी वर देऊन पाठभेद टीपांत देणे अधिक सुरक्षित असते. आपआपल्या मताप्रमाणे त्यातील कोणताही पाठ कोणीही स्वीकारावा. प्रस्तुत प्रतीतहि मुळातील अनेक पाठांपेक्षा टीपांतील पाठ सरस आढळतील. मुळांतील व टीपांतील अशुद्ध शब्द-प्रयोग मूळ ग्रंथकाराचे, लेखकाचे की छापखान्याचे हे सांगणे, ग्रंथकाराच्या हातची पोथी जोपर्यंत मिळत नाही तोपर्यंत अशक्य असते.

डॉ. रा. ग. हर्षे यांनी ज्ञानेश्वरीच्या पहिल्या अध्यायाची पाठभेदासह जी आवृत्ती प्रसिद्ध केली आहे तीत हीच जुनी पद्धती स्वीकारली आहे. कारण त्यांच्या मते " प्राचीन मराठी ग्रंथांच्या संहिताशुद्धीचा प्रश्न किती बिकट आहे याची पूर्ण कल्पना फारच थोड्यांना आहे... जी अपभ्रष्ट रूपे त्यांच्या ऱ्हस्वदीर्घादि बारकाव्यांसह .

अनुक्रमणिका

मराठीत रूढ आहेत त्यातून अमुकच बरोबर व मूळ ग्रंथकारांचे असे सांगणे कसे अशक्यप्राय आहे" हे (त्यांनी केलेल्या) पाठसंग्रहावरून कळून येण्यासारखे आहे. संस्कृतज्ञ ग्रंथकार अपभ्रष्ट शब्दाऐवजी संस्कृत शब्द योजील हे जितके संभवनीय तितकेच मुद्दाम देशी भाषेत तो लिहीत असल्यामुळे रूढ अपभ्रष्ट शब्दही तो योजील हे संभवनीय आहे. "संस्कृतमध्ये अपभ्रष्ट रूपांना मज्जाव आहे. मराठीत त्यांना सन्मानाचे स्थान आहे. विशेषतः ओवी छंदासारख्या सैल वृत्तांत कवीच्या निरंकुशत्वाला अधिक वाव असल्यामुळे पर्यायरूपांचे वंड मराठीत फार वाढले आहे. स्थलकालपरत्वे होणाऱ्या उच्चारभेदांमुळेही पर्यायरूपांच्या संख्येत आणखी भर पडली आहे." संस्कृत ही नियमबद्ध भाषा असल्यामुळे तीत हा प्रकार नाही. म्हणून एखाद्या संस्कृत ग्रंथाची नव्या पद्धतीची संशोधित मूळपाठ घालून व्यक्तिनिष्ठ प्रत तयार करण्याइतके प्राचीन मराठी ग्रंथाची तशी प्रत सिद्ध करणे सोपे नाही.

त्याकरिता "राजवाडे यांनी म्हटल्याप्रमाणे, पूर्ववैदिक, वैदिक, संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश व तदुत्पन्न आर्यकुलांतील अर्वाचीन भारतीय भाषा यांच्या व्याकरणाची उत्तम माहिती व आधुनिक भाषाशास्त्राचे सोपपत्तिक अध्ययन असल्याखेरीज अशा प्रयत्नाचा उपक्रम करणे हास्यास्पद होय" असे डॉ. हर्षे यांचे मत आहे. त्यांतही भाषाशास्त्राचे अर्धशतकापूर्वीचे ज्ञान जुने झाल्यामुळे अद्ययावत ज्ञान अवश्य आहे. यावरून प्राचीन मराठी ग्रंथाची, ग्रंथकाराचे म्हणून मूळ पाठ देणारी व्यक्तिनिष्ठ अशी नवीन प्रकारची प्रत सिद्ध करणे किती कठीण आहे हे लक्षात येईल. असा प्रयत्न सर्वमान्य होणे अशक्य असल्यामुळे त्याकरिता केलेले परिश्रम व लागलेला पैसा इष्टफलदायी होण्यासारखा नसतो. त्यामुळे काही थोड्या लोकांचे समाधान झाले तरी मतभेद कमी होण्याऐवजी वाढण्याचाच अधिक संभव असतो. कारण व्यक्तिनिष्ठ प्रत हा नवीन ग्रंथ होतो व तो मूळ ग्रंथकाराचा म्हणता येत नाही. म्हणून डॉ. गोखले यांनी स्वीकारलेली जुनी पद्धती योग्य वाटते.

डॉ. गोखले यांच्या प्रस्तुत प्रतीचा आणखी एक विशेष असा आहे की, अनुभवामृताची मागून पाडलेली प्रकरणे मुळात नसल्यामुळे ही प्रत प्रकरणावाचून सलग छापली आहे. "प्रकरणे निःसंशय अलीकडची आहेत" असे प्रा. दांडेकरांनीही म्हटले आहे. तसेच प्रस्तुत ग्रंथ 'अमृतानुभव' म्हणून प्रसिद्ध असला तरी ज्ञानदेवांना 'अनुभवामृत' हेच नाव अपेक्षित होते असे याच ग्रंथातील ओव्यांच्या आधारे डॉ. गोखले यांनी प्रस्तावनेत (पा. ७) दाखविले आहे.

प्रस्तुत ग्रंथात ओव्यांचे सार्थ विवरण डॉ. गोखले यांनी केलेले नाही. मूळ योजनेत ते अपेक्षितही नव्हते. पण ग्रंथाला विवेचक प्रस्तावना जोडली असून वादग्रस्त प्रश्नांची माहिती दिली आहे आणि काही ठिकाणी स्वतःचे मत साधार सांगितले आहे, तर काही ठिकाणी ठाम मतप्रदर्शन न करता स्वतःचा कल सुचविला आहे.

पहिला प्रश्न ज्ञानेश्वरी आणि अनुभवामृत यांच्या पौर्वापर्याचा. कै. प्रा. वा. ब. पटवर्धन यांनी मुंबई विद्यापीठात दिलेल्या व्याख्यानात 'अनुभवामृत आधी व ज्ञानेश्वरी नंतर' असे मत व्यक्त केले होते. अनुभवामृत ग्रंथ लहान असून त्यात केवळ शिवशक्तीला वंदन असल्यामुळे, तो आधी लिहिला व बुद्धीला विशालत्व आल्यावर ज्ञानदेवी लिहिली. तसेच अनुभवामृत ग्रंथ नीरस आहे. त्यात ज्ञानदेवीतील काव्यविलास दिसत नाही असेही एक कारण कै. पटवर्धनांनी दिले आहे. डॉ. गोखले यांनी या सर्व कारणांचा सविस्तर ऊहापोह करून ज्ञानेश्वरी आधी लिहून अनुभवामृत नंतर लिहिला या प्रचलित मताचा साधार पुरस्कार केला आहे. तसेच त्यांच्या मते ज्ञानेश्वरीपेक्षा अनुभवामृतांतील तत्त्वज्ञान निराळे आहे, ही समजूतही बरोबर नाही. "अनुभवामृत हा गीता व्याख्यानाचा एक प्रकारचा अनुबंध (Continuation) आहे. अनुभवामृतातील प्रतिपाद्य विषय बीजरूपाने ज्ञानेश्वरीत ठायी ठायी विखुरला आहे," (प्र. पा. ६) "ज्ञानदेवीतील तात्त्विक विचारांचा पूर्णोद्धार म्हणजे अनुभवामृत" असे म्हणून ज्ञानदेवीत अनुभवामृताची बीजे कशी आहेत ते अनेक अध्यायांतील सदृश विचारांच्या ओव्या उद्धृत करून (प्र. पा. २७ ते ३०) त्यांनी दाखविले आहे.

ज्ञानदेव हे कवी की तत्त्वज्ञ याविषयी डॉ. गोखले यांचे मत, ते प्राधान्याने तत्त्वज्ञ होते असे आहे. "त्यांनी काव्य लिहिले नाही. काव्याच्या माध्यमातून मानवी जीवनाचे अंतिम मूल्य प्रतिपादन करणे हाच परमोच्च विचार...त्यांनी मनात ठेवला होता. ते कालिदास भवभूतींच्या कोटीत समाविष्ट होत नाहीत. त्यांची प्रकृती

तत्त्वज्ञाची आहे. रसात्मक वाक्ये त्यांच्या परतत्त्वस्पृष्ट वाणीतून सहजतेने बाहेर पडली " ( प्र. पा. ६ ).

वस्तुतः रसिकांना ज्ञानदेव कवी वाटावे आणि तत्त्वजिज्ञासूंना ते तत्त्वज्ञ वाटावे यातच त्यांचे अलौकित्व आहे. ज्ञानेशांचा वेदान्त हा रसपूर्ण, मोदक आहे. ' रसो वै सः ' अशा रसमय परमात्मतत्त्वाचे त्यांचे विवेचन रसाळ व्हावे हे स्वाभाविक आहे. ' वर्पला शांतरसे तो हा ग्रंथु " असे त्यांनीच म्हटले आहे. कारण शांतरसाचा स्थायीभाव रसमय आत्मा किंवा त्याचे ज्ञान आहे. यालाच ब्रह्मरस किंवा महारस असे ते म्हणतात. इतर सर्व रसांचा तो आधार आहे. रसमय आत्मतत्त्वावर नानाविध रसांच्या-भावभावनांच्या लहरी उठत असतात. त्यामुळे ज्ञानदेवांमध्ये, कवित्व, रसिकत्व आणि तत्त्वज्ञत्व एकरूप झाली आहेत. त्यात श्रेष्ठकनिष्ठत्व ठरविणे कठीण आहे. ज्ञानदेव हे महान योगी, प्रतिभासंपन्न महाकवी, साक्षात्कारी तत्त्वज्ञ, महान भगवद्भक्त व कर्मयोगी होते. वरवर भिन्न दिसणाऱ्या या सर्व भूमिका त्यांच्या अमृतमय अद्वैतानुभावात एकरूप होऊन गेल्या होत्या. चैतन्याचे ते एक प्रभावशाली स्फुरण होते. म्हणूनच त्यांचे वाङ्मय अनेक शतके पोटी जिरवून अमर झाले.

हा ग्रंथ का लिहिला याविषयीच्या अनेक आख्यायिका उद्धृत करून " या ग्रंथात नाथसंप्रदायाचे तत्त्वज्ञान असावे की ज्ञानदेवाचे स्वतंत्र विचार असावे हे निश्चित सांगणे अशक्य आहे " ( प्र. पा. ३ ) असे डॉ. गोखले लिहितात. पण ग्रंथाच्या नावावरूनच, या ग्रंथात मुख्यतः स्वानुभवाचे अमृत वाचकांकरिता ओगरिले आहे हे स्पष्ट होते. ज्ञानदेव हे शैव–नाथपंथी व श्रीकृष्णभक्तही असले तरी शैव किंवा वैष्णव, कोणत्याच संप्रदायांत मावण्यासारखे त्यांचे व्यक्तित्व संकुचित नव्हते. शिवाने किंवा श्रीवल्लभाने एखादी गोष्ट सांगितली म्हणून ती मानणारे ते नव्हते. विश्वव्यापी भूमिकेवर आरूढ झालेल्या या महापुरुषाने आपली अमृतमय अनुभूती या ग्रंथात सांगितली आहे. तिच्याशी संवादी जे जे आढळले त्या सर्व युक्तिवादांचा त्यांनी स्वीकार केला. कोणताच संप्रदाय त्यांनी जसाचा तसा स्वीकारला नाही. कारण अंतिम सत्य हे संप्रदायातीत आणि विश्वव्यापक असते. म्हणून ज्ञानदेवांना दामटून कोणत्या तरी संप्रदायात बसविण्याचा प्रयत्न निष्फल आहे. या दृष्टीने " निरनिराळ्या संप्रदायामध्ये व तत्त्ववादामध्ये त्यांच्या अनुभवाला व विवेकाला पटले त्याचा त्यांनी अंगीकार केला " हे श्री. वा. अ. भिडे यांचे म्हणणे ( प्र. पा. १६ ) योग्य आहे.

" ज्ञानेश्वरांचे तत्त्वज्ञान शंकराचार्यांच्या ठशाचे असे प्रतिपादणारापुढे अनुभवामृताच्या शेवटी प्रकरणशः जोडले जाणारे ' इति सिद्धानुवादे ' हे शब्द उत्तरादाखल ठेवण्यास हरकत नाही " असे कित्येक म्हणतात. पण अनुभवामृतातील प्रकरणे मागून कोणीतरी पाडली आहेत. हा ग्रंथ प्रकरणात्मक आहे काय ? या ' प्रश्नाचे सरळ आणि एकच उत्तर " नाही " हेच आहे ', असे डॉ. गोखले म्हणतात ( प्र. पा. ९ ). श्री. सोनोपंत दांडेकरही तसेच म्हणतात. आणि या मागून पाडलेल्या प्रकरणाच्या अखेरच्या ' इतिश्री ' वाक्यातही ' इति सिद्धानुवादे ' हे शब्द फक्त चार पोथ्यांत आढळतात. बहुसंख्य पोथ्यांत हे शब्द नाहीत. ' सिद्धानुवाद ' शब्दावर आधारलेला तर्काचा पायाच अशा रीतीने ढासळला आहे. येथील सिद्ध शब्दानेही संप्रदाय विवक्षित नसून सिद्ध आत्मवस्तुविवक्षित आहे असे डॉ. गोखले यांचे मत आहे. ( प्र. पा. २६ )

असे असले तरी अनुभवामृतातील तत्त्वज्ञानाचे स्वरूप काय आहे ते मात्र डॉ. गोखले यांना निश्चित करता आले नाही. याविषयीची अनेक ग्रंथकारांची मते देऊन, त्यांतील विरोधामुळे वाचक गोंधळात पडतो असे त्यांनी म्हटले आहे. अनुभवामृतात माया-अविद्येचे खंडन करून ज्ञानदेवांनी अद्वैत सिद्ध केले आहे तर शंकराचार्यांनी मायेचा स्वीकार करून व जगाला मायिक ठरवून अद्वैतसिद्धी केली आहे. त्यामुळे दोघांच्या अद्वैताचे स्वरूप भिन्न आहे असे काही मानतात तर काही एकच आहे असे मानतात. या वादाच्या दोन्ही बाजू देऊन हा वाद कधी मिटण्यासारखा नाही असे डॉ. गोखले यांनी म्हटले आहे. ' यतो वाचो निवर्तन्ते ' असे शब्दांच्या पलीकडे असणारे द्वंद्वातीत अंतिम सत्तत्त्व शब्दांनी सांगू लागले म्हणजे त्यांतून उत्पन्न होणारे वाद कधीही मिटण्यासारखे नसतात हे खरे आहे. ज्ञानदेवांनी म्हणूनच केवळ अज्ञानाचेच नव्हे तर तत्सापेक्ष ज्ञानाचे व ते करून देणाऱ्या शब्दाचेही खंडन केले आहे. डॉ. गोखले यांना अनुभवामृतातील तत्त्वज्ञानाविषयी निश्चित मत देता आले नसले तरी विविध मतांमध्ये " ह. भ. प. दांडेकर व तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांचे यासंबंधीचे विवेचन

अनुक्रमणिका

विचारार्ह आहे " (प्र. पा. २४) असे म्हणून त्यांचा कल कोठे आहे ते त्यांनी दर्शविले आहे. तर्कतीर्थ म्हणतात—" ज्ञानदेवांपासून वामनपंडितापर्यंत जे संत-पंडित झाले त्यांनी मायावादासहित अद्वैतसिद्धान्त मान्य केला आहे. अद्वैतवादातील मायावाद हा विश्वाची उपपत्ती आहे. शुद्ध अद्वैतदृष्टीला या उपपत्तीची किंवा मायावादाची आवश्यकता नसते......अंतिम दृष्टिकोणातून अविद्याखंडन अथवा अज्ञानखंडन शंकराचार्यांपासून मधुसूदन सरस्वतीपर्यंतच्या सर्व अद्वैतवेदांत्यांनी केले आहे......शंकराचार्यांचा मायावाद ज्ञानदेवांना अमान्य आहे असे काही विद्वान म्हणतात. परंतु त्यांना हे माहीत नाही की शांकरसंप्रदायात पारमार्थिक भूमिकेवरून अविद्याखंडन करण्याची प्रथमपासून प्रथा आहे. केवल अद्वैत ब्रह्मच सत्य होय. अन्य सर्व असत्य. दृश्य विश्व जसे मिथ्या तसेच दृश्य विश्वाला प्रसविणारी अविद्यात्मक मायाही मिथ्या आहे. हा विचार मायावादाचाच एक भाग आहे. शांकर अद्वैतातील हा दृष्टिकोन नीट न समजल्यामुळेच ज्ञानदेवांचे अज्ञानखंडन म्हणजे मायावादखंडन आहे असा अर्थ केला गेला. ते मायावाद खंडन आहे. पण शांकरमताशी अविरुद्ध आहे" (प्र. पा. २२). उतारा मोठा आहे पण तर्कतीर्थांसारख्या परिणतप्रज्ञाचे हे तर्कशुद्ध आणि व्यासंगपूर्ण विवेचन या वादाचा निर्णय लावण्यास समर्थ असल्यामुळे मुद्दाम दिला आहे. "पूर्णाद्वैतात विश्व किंवा जग चिन्मय परमात्म्यापेक्षा वेगळे नसते. या दृष्टीने विश्व आत्म्याहून काही वेगळे झाले असे ज्ञानदेव मानीतच नाहीत. त्यामुळे ते सत्य किंवा मिथ्या हा प्रश्नच उद्भवत नाही" असे प्रा. दांडेकर म्हणतात (प्र. पा. २०). साक्षात्कारी संत गुरुदेव रानडे यांनी "ज्ञानेश्वरीत साधनरूपाने येणारा मायावाद व अमृतानुभवात सिद्धान्तरूपाने येणारा स्फूर्तिवाद या दोहींत तत्त्वतः विरोध नसून ज्ञानदेवांचे तत्त्वज्ञान एकंदरीत सुसंबद्ध आहे" असे म्हणून मायावाद विरहित केवळ स्फूर्तिवादातील धोका स्पष्ट केला आहे. आणि 'ज्ञानेश्वरांनी स्फूर्तिवादाचा मायावादाशी समन्वय केला' असे म्हटले आहे. (प्र. पा. १४) तर्कतीर्थ जोशी आणि गुरुदेव रानडे यांचे अभिप्राय, ज्ञानेश्वरांचे संपूर्ण दर्शन ज्यांना झाले आहे त्यांना निर्णायक वाटतील. अनुभवामृतातील तत्त्वज्ञानाविषयीची विविध मते वाचकांपुढे ठेवून, आपला कल कोणीकडे आहे हे दाखविण्यात डॉ. गोखले यांचे सौजन्य जसे दिसते तशी सावधगिरीही दिसते.

प्रस्तावनेत पाठभेदाकरिता निवडलेल्या पोथ्यांची माहिती दिली आहे आणि ओव्यांवर टीपा देऊन काही ठिकाणी पाठभेदांची चर्चा केली आहे. अनेक शब्दांचे व्युत्पत्तिसह अर्थही दिले आहेत. टीपांचा भाग शेवटी दिला असता तर बरे झाले असते. ग्रंथाच्या शेवटी पुनः कठीण शब्दांचे अर्थ देणारा कोश जोडला आहे आणि अकारविल्हेने ओव्यांची प्रथमचरणसूचीही दिली आहे. अशा रीतीने सर्व पाठभेदांसह विविध मतांच्या वाचकांना आणि अभ्यासकांना उपयुक्त होईल अशी अनुभवामृताची ही प्रत अनेक वर्षांच्या परिश्रमांनी सिद्ध केल्याबद्दल अभ्यासक, डॉ. गोखले यांचे ऋणी राहतील.

**शं. दा. पेंडसे**

●

## निरंजनमाधव विरचित

## सुभद्रा–स्वयंवर

संपादक :— **रामचंद्र चिंतामण ढेरे.** प्रकाशकः— प्रकाश दामोदर रानडे, नीळकंठ प्रकाशन, १६४३ सदाशिव, टिळक रोड, पुणे ९; मूल्य रु. ८–५०

निरंजनमाधव हा पूर्व पेशवाईतील एक मुत्सद्दी, परमार्थ मार्गातील एक थोर अधिकारी आणि उच्च प्रतीचा पंडित कवी होता. त्याने बरीच अध्यात्म प्रकरणे व काही काव्ये लिहिली आहेत. त्यांपैकी सुभद्रा-स्वयंवर हे एक चंपू म्हणजे गद्य-पद्यात्मक काव्य आहे. त्याचे संपादन जुन्या मराठीचे एक चिकित्सक संशोधक व काव्यमर्मज्ञ रा. चिं. ढेरे यांनी केले आहे. प्रस्तुत सुभद्रा स्वयंवर पांगारकरांनी आपल्या 'मुमुक्षु' साप्ताहिकातून १९२७ साली छापून प्रसिद्ध केले. निरंजनमाधवाच्या काव्यसंग्रहाचा हा तिसरा भाग होता: त्यानंतर हे उत्कृष्ट काव्य चाळीस वर्षे उपेक्षेच्या गर्तेत पडले होते. विश्वविद्यालयात पुस्तके नेमताना ठराविक चाकोरीच्या बाहेर जावयाचे नाही या अभ्यासमंडळाच्या ठरीव प्रवृत्तीमुळे हे काव्य इतके दिवस दुर्लक्षित राहिले. पांगारकरांनी प्रकाशित केलेल्या मूळ प्रतीवरूनच रा. ढेरे यांनी आता हे स्वतंत्र पुस्तकरूपाने प्रकाशित केले आहे व त्याला आपल्या सर्वांगसुंदर संपादनाची जोड दिली आहे. आपल्या ५८ पानांच्या प्रदीर्घ व विवेचक प्रस्तावनेस रा. ढेरे यांनी राजकारण, परमार्थमार्ग व काव्यव्यासंग ही त्रिवेणी आपल्या प्रस्तावनेत

सविस्तर चर्चिली आहे. त्यांच्याच शब्दांत सांगावयाचे झाले तर "निरंजनमाधवाचे चरित्र व वाङ्मय या विषयाची प्रदीर्घ व विवेचक प्रस्तावना, संहितेतील सर्व वृत्तान्त-निर्देश विस्तृत अर्थस्पष्टीकरणात्मक टीपा तसेच वृत्तलक्षणे, चूर्णिका आणि निरंजनमाधवाचे घर, देवधर व घराणे इ. उपयुक्त परिशिष्टे या विशेषांनी हे संपादन समृद्ध आहे."

निरंजनदास नामक निरंजनमाधवाच्या शिष्याचा संप्रदाय परिमल या ग्रंथाच्या आधारे ढेरे यांनी निरंजनमाधवाचा अध्यात्मविकास खुलासेवार चर्चिला आहे व त्यानंतर त्यांनी थोरले बाजीराव पेशवे व नानासाहेब यांच्या कारकीर्दीतील निरंजनमाधवाच्या राजकारणाची चर्चा केली आहे व शेवटी निरंजनमाधवाच्या समग्र लिखाणाचा परामर्ष घेऊन सुभद्रा-स्वयंवरातील सौंदर्यस्थळे मोठ्या मार्मिकपणे टिपली आहेत.

वास्तविक पाहिले तर भावे किंवा पांगारकर यांनी या काव्याचे नाव सुभद्रा–चंपू असे दिले आहे. पण ढेरे यांनी यास 'सुभद्रा–स्वयंवर' म्हटले आहे, ते थोडे खटकल्यावाचून राहात नाही. सुभद्राचंपूच्या प्रत्येक सर्गाच्या शेवटी एक पुष्पिका म्हणजे ग्रंथ समाप्तिदर्शक संस्कृतमधील मजकूर आढळतो. त्यात 'निरंजनमाधव विरचिते सुभद्रास्वयंवरे चंपूकाव्ये' असा उल्लेख आढळतो. त्यावरच आपली भिस्त ठेवून ढेरे यांनी या काव्यास 'सुभद्रास्वयंवर' हे नाव दिले आहे. वास्तविक निरंजनमाधवला आपल्या काव्याची दोन तीन नावे मान्य होती असे दिसते. तो काही ठिकाणी त्यास 'पार्थचंपू', काही ठिकाणी 'अर्जुनसुभद्रा पाणिग्रहणकथा', 'सुभद्राविवाहाख्य–गाथा' असे म्हणतो. यांपैकी कोणते तरी नाव विशेषतः सुभद्राविवाहासारखे सुटसुटीत नाव ढेरे यांनी द्यावयास पाहिजे होते. सीता–स्वयंवर, द्रौपदीस्वयंवर यांतील स्वयंवर या विशिष्ट अर्थाने अर्जुन–सुभद्रा विवाह झालेला नाही. म्हणून हे नाव अयोग्य वाटते. शिवाय सर्गाच्या शेवटचा मजकूर लेखकाचा का निरंजनमाधवाचा याचा निर्णय करता येत नाही. तो जर निरंजनमाधवाचा मानावयाचा तर त्यात त्याने आपणच वर दिलेल्या नावांपैकी एखादे नाव न घालता स्वयंवर हे निराळे नाव का घातले? आणि सर्ग पहिला व शेवटचा यांच्या पुष्पिकांमध्ये "इति श्रीमद् कविकुल तिलक निरंजनमाधव विरचिते" ही आत्मप्रौढी अध्यात्ममार्गी निरंजनमाधव स्वतः लिहीलसे वाटत नाही. म्हणून ढेरे यांनी या काव्यास अर्जुन–सुभद्राविवाह कथा किंवा भावे–पांगारकर यांनी म्हटल्याप्रमाणे नुसते सुभद्रा-चंपू असे म्हटले असते तर बरे झाले असते. हा एक किरकोळ मुद्दा सोडला तर इतर संपादन सर्वांगपरिपूर्ण आहे.

सुभद्राचंपूतील निसर्गवर्णन, स्वभावपरिपोष इ. अंगे तर त्यांनी मोठ्या रसिकतेने व बहारीने उकलून दाखविली आहेत व शेवटी निरंजनमाधवाचे पंडितकवीतील स्थानही यथार्थतेने निश्चित केले आहे. निरंजनमाधवाचे हे काव्य चंपूप्रकारात मोडत असले तरी ते महाकाव्यच आहे. हे काव्यरत्न स्वतः तेजस्वीच आहे पण ढेरे यांच्या संपादनाच्या कोंदणात ते अधिक उठावदार दिसते याबद्दल मराठी रसिक श्री. ढेरे यांना धन्यवाद देतील. त्यांचे हे संपादन जुन्या मराठी काव्याच्या संपादनाचा आदर्श आहे असे म्हटल्यास त्यात मुळीच अतिशयोक्ती नाही.

**के. ना. वाटवे**

●

## 'मराठी आरती'

ले – **म. वि. गोखले**; प्रकाशक-सावित्री प्रकाशन, सदाशिव पेठ, पुणे २; पृष्ठें डेमी १६ + ४६२; मूल्य रु. १५–००.

भारतीय भाषांतील मध्ययुगीन साहित्य बव्हंशी भक्तिमय आहे. त्यातही निर्गुण-निराकार ब्रह्मरूपाच्या प्रतिपादनापेक्षाही सगुण साकार लीलामयाचे चिंतन-भजन अधिक प्रमाणात आढळते. भक्तांनी देवाला आपल्यासारखा मानव करून टाकला होता. त्यांनी त्याचे सोहाळे आणि सोपस्कार नाना तऱ्हेने चालविले होते. या लीलावतारी परमेश्वराचे वैष्णव रूप भक्तांना विशेष आवडलेले दिसते. या वैष्णवपंथी भक्तिमार्गात देवाच्या भजन–पूजनाचे नित्य-नैमित्तिक असे अनेक सभारंभ असत आणि ते अजूनही तसेच चालू आहेत. वर्षातून एकदा येणारा देवाच्या जयंतीचा उत्सव जनसामान्यांच्या उत्साहाला उधान आणीत असे. पण दैनंदिन कार्यक्रमातही काही समारंभ असे असत की जे केवळ एकट्या एका पुजाऱ्यासाठी नसत. सर्व लोकांसाठी ते असत. अशा सभारंभातील एक प्रमुख सभारंभ 'आर्तिक्य' किंवा 'आरात्रिक' होय. देवाच्या 'पंचारती' वरून वीरांना पंचारती ओवाळून आवाहन करण्याची

प्रथा पडली की मूळ लौकिक परंपरेचा देवाच्या भक्तीत समावेश झाला, ते कळणे कठीण आहे. भागवतपंथी देवपूजेतील अन्नकूट, शेज, न्हाणी, पाळणा, वगैरे प्रकार लौकिकातून अलौकिकाला चिकटलेले दिसतात. आरती ओवाळण्याचा प्रकारही असाच देवमंदिरात शिरला असावा. शयनमंदिरातली शय्यागृहातली 'सेज' देव-मंदिरात-गर्भागारात गेली व तिला शेजारतीचे स्वरूप आले. धूपाच्या सुगंधाची जोड त्याच पद्धतीने भक्तीला मिळून ती धूपारती झाली. 'रती' कडून 'भक्ती' कडे झालेली वाटचाल आरतीच्या मार्गानेही तशीच झाली असण्याचा दाट संभव आहे.

भारतीय भाषांत सर्वत्र आरतीची गीते आहेत. पण मराठीतील आरत्या संख्येने कदाचित सर्वांहून अधिक भरतील. गुजराती-हिंदी भाषी प्रदेशातील आरती जशी विशिष्ट तऱ्हेने म्हटली जाते, तशी मराठी प्रदेशातील आरतीही म्हटली जाते. मात्र त्याची चाल वेगळी असते, ताल वेगळा असतो, छंद निराळा असतो. तसे पाहिले तर सर्वच भक्तिमार्गी सोहळ्यात तोच तोपणा आलेला होता आणि आजही तो तसाच आहे. याचाच अर्थ असा की छंदांच्या बाबतीत काही प्रमाणात विविधता असूनही मराठी आरत्या या एकसूरीपणाला अपवाद ठरत नाहीत, मुख्य वाङ्मय प्रकारांच्या पाठशालेय शोध-बोधाच्या वेळी उत्साहाचा वेग असतो आणि त्या त्या अभ्यास-क्षेत्रासारखे विविधरंगी व लोभनीय अन्य क्षेत्र क्वचितच असू शकेल अशा ऐटीने शोध प्रबंध लिहिले जातात. या उत्साहामुळे त्या त्या अभ्यासक्षेत्रातला बारकावा कितपत पकडला जातो, हे नेहमीच सांगता येत नसले तरी त्याचा विस्तार मात्र बहुधा नेहमीच नजरेत भरण्या-सारखा झालेला असतो; त्याची बहुतेक सर्व वैशिष्ट्ये नमूद केलेली असतात. प्रस्तुत प्रबंधात आरतीच्या विस्ताराचा अनेक बाजूंनी विचार केलेला आढळतो. मात्र प्रबंधकारांचा दावा आहे त्याप्रमाणात बारकावे पकडले गेलेले नाहीत असे नाइलाजाने म्हणावे लागते.

स्वतः लेखकाच्या दृष्टीने या ग्रंथाची वैशिष्ट्ये पुढील-प्रमाणे होत.

"... वर्गीकृत आरत्यांवरून आरतीकार व आर-त्यांचे विषय यांचा स्वतंत्र अभ्यास करून तत्त्वज्ञान, नीती, साक्षात्कारमार्ग याविषयी व काव्यसौंदर्या विषयी काही निष्कर्ष काढता येतील असे वाटले. या ग्रंथात वरीलपैकी प्रत्येकी विषयाचे एक एक स्वतंत्र प्रकरण लिहिले आहे ते पाहिल्यास आरतीवाङ्मय हे सर्व दृष्टींनी कसे समृद्ध आहे, याची कल्पना येईल. आजवर संशोधक अभ्यासकांचा 'आरतीचे अंतरंग हा अभ्यास विषय न बनता बव्हंशी आरती या पद्याच्या बाह्यांगा-विषयी विशेषतः तिच्या छंदाविषयी अभ्यास झालेला दिसतो. या ग्रंथात आरतीच्या छंदाचाही विचार एका स्वतंत्र प्रकरणात केला असून तेथे पूर्वीच्या मताचा परामर्श घेता घेता नव्या दृष्टिकोनाचा निर्देश केला आहे. छंदाविषयी लिहिणारांच्या पुढे जेवढ्या आरत्या होत्या त्याहून अधिक आरत्या पाहण्यात आल्यामुळे **किती किती तरी नवीन रचनाप्रकार दाखविता आले आहेत**. शिवाय शब्दचर्चा, इतर पद्यप्रकारहून आरतीचा वेगळेपणा, पाठभेद, आरत्यांतून आढळलेली चरित्रविष-यक माहिती आणि या रचनेत सहजतया व बुद्धिपुरस्सर केले गेलेले सामाजिक मूल्यांचे व समाजस्थितीचे चित्रण अशा विविध अंगोपांगांचा विचार वेगळेपणाने मांडला आहे. शेवटी जोडलेल्या परिशिष्टांत महानुभाव, जैन, लिंगायत या महाराष्ट्रातील विशिष्ट संप्रदायांतील आरत्या व त्यावरील विवेचन आढळेल. विवेचनात ज्या विशेष आरत्यांचा उल्लेख आला आहे त्या आरत्या मुख्य संग्रहात दिल्या असून ज्या आरत्या विवेचनात उल्लेखिल्या नाहीत त्यांचे एक स्वतंत्र परिशिष्ट शेवटी जोडले आहे." (पृष्ठ आठ.)

यात जे लेखनहेतू व दिशा उल्लेखिलेल्या आहेत, त्यांचा बराचसा प्रपंच ग्रंथात आढळतो यात शंकाच नाही. पदव्युत्तर परीक्षेसाठी लिहिल्या जाणाऱ्या ग्रंथात असे लेखनहेतू व फलश्रुती सांगावीच लागते आणि ती सांगताना स्व-प्रमेयाच्या आपुलकीमुळे व प्रबंधाच्या गरजेमुळे 'एको देवः केशवो वा शिवो वा' यासारखी अतिरिक्त एकनिष्ठा प्रकट होते. पदव्यर्थी प्रबंधात ते क्षम्य असल्यामुळे या प्रबंधात लेखकाने व त्याच्या मार्गदर्शक-निरीक्षकांनीही असला अतिशयोक्तिपूर्ण दावा राहू दिलेला असला तरी या ग्रंथाच्या विषयाच्या मर्यादा इतक्या स्वतःस्पष्ट आहेत की त्या वेगळ्या दर्शविण्याचेही कारण नाही. लेखकाने वरील लेखनहेतूत व्यक्त केलेल्या गोष्टींपैकी काही ग्रंथात साधलेल्या आहेत. विशेषतः ११+५५=६६ महानुभावी आरत्या, १८ जैन सांप्रदायी-आरत्या, ४ लिंगायती आरत्या आणि शेवटी ३२५ आरत्यांचा सर्वसंग्रह या ग्रंथात उपलब्ध करून दिल्या-

बद्दल मराठीच्या अभ्यासकांनी **प्रबंधकर्त्यास मनःपूर्वक धन्यवाद दिले** पाहिजेत. शिवाय यांपैकी बहुतेक आर, त्यांचे अंतरंग-परीक्षणही या ग्रंथात आले असल्यामुळे तो भागही चांगला वाचनीय आणि उपयुक्तही झाला आहे. पण लेखक जेव्हा काही वेगळे, अजूनपर्यंत न साधलेले, साध्य झाले असल्याचा दावा करतो तेव्हा तो फक्त इष्टचिंतन किंवा ' विशफुल थिंकिंग ' करीत आहे एवढेच मत होते--ग्रंथवाचनानंतर तसे काही झाल्याचे प्रत्ययास येत नाही. मुळात आरती या पद्यप्रकाराच्या सापेक्ष महत्त्वाबद्दलच या प्रबंधकाराचा अपसमज झालेला आढळतो. प्रबंधाला सोयीचा हा पद्यप्रकार असला तरी त्याचे अस्तित्व आशय-विषयदृष्ट्या भक्तिगीताच्या पोटीच आहे. त्याचे जे काही थोडे वैशिष्ट्य आहे, ते तांत्रिकतेवरच निर्भर आहे, आणि प्रसंगनिष्ठ आहे. उलट भक्तिमार्गी पदांचा जो अत्यंत समृद्ध वर्ग लेखकाने वेगळा मानला आहे त्यातल्या प्रत्ययकारी जिव्हाळ्याएवढा उत्कट भक्तिभाव या तांत्रिक रचनात येऊ शकत नाही. त्याचे खरे वैशिष्ट्य त्याच्या समारंभात, सोहळ्यात, सामूहिकतेत आहे. आशयदृष्ट्या पाहता या आरत्यांत आढळणारा कंटाळवाणा तोच तो पणा हा अन्य भक्तिगीतांत स्वभावतः आढळणाऱ्या एकसूरीपणाच्याहून, अधिक स्पष्ट आहे. विषयाचा विस्तार प्रबंध लिहून, त्यात प्रकरणे पाडून सविशेष दाखविता आला तरी त्यातले मर्म किंवा रहस्य तांत्रिकतेहून अधिक खोल गेलेले दाखविता येत नाही. ही एक आरतीच्या पद्यप्रकाराची मर्यादा आहे व ती समजून व स्वीकारून त्याचा अभ्यास करण्यानेच काही वेगळे हाती लागण्याचा संभव आहे. खरे म्हणजे आरत्या ज्या प्रसंगांनी म्हटल्या जातात, ज्या समारंभासाठी त्या असतात, त्यांचे सामाजिक-मानसिक स्वरूप शोधपूर्वक दाखविले गेले असते तर ते अधिक संतोषकारक झाले असते. खरोखर या आरत्यांत वेगळे असे तत्त्वज्ञान, नीतिविवेचन, भक्तिकीर्तन काय असू शकणार? त्या त्या पंथाची वा संप्रदायाची इष्ट देवता त्यात वर्णिलेली असणार, इष्ट तत्त्वविचार त्यात वरवर आलेला असणार, बाकी सर्व सारखे! लेखकाने हे सर्व निरनिराळ्या आरत्यांत कोठल्याप्रकारे आले आहे ते एकत्र दिग्दर्शित केलेले असल्यामुळे **ग्रंथाची उपयुक्तता काही प्रमाणात सिद्ध झाली आहे**. सर्वात असफल झालेला प्रयत्न म्हणजे आरत्यांतून आरतीकाराचे दर्शन घडवून



देण्याचा प्रयत्न. प्रयत्न केलेला आहे हेच खरोखर त्याचे समर्थन आहे, यातच त्याचे महत्त्व आहे, व तो साधलेला नसला तरी त्यामुळे त्याच्या महत्त्वाला बाध येत नाही. छंदांच्या बाबतीत काही नवे सांगितल्याचा-दाखविल्याचा दावा मात्र अगदी व्यर्थ आहे. तो निव्वळ पवित्रा आहे. खरी स्थिती अशी दिसते की या प्रबंधकर्त्याला छंदांचे मर्म उकलण्याची उपजत शक्तीच नाही, त्याने केवळ मागल्यांचे विवेचन आपल्या प्रबंधात उतरून घेतलेले आहे. (अलबत नामनिर्देशपूर्वक!) आणि काही विवेचन तर त्याच्या नजरेसच पडलेले दिसत नाही.

या उणीवांचा आता थोडक्यात विचार करू

(१) ' आरतीतील काव्यसौंदर्य ' म्हणून जे प्रकरण आहे त्यात खूप तऱ्हेची माहिती एकत्र केलेली आहे. पण जे विहिरीतच नाही, ते पोहऱ्यात येणार कोठून? त्यामुळे यातले रस-भाव-अलंकार यासंबंधीचे विवेचन जंत्रीवजा होणे अपरिहार्य होय. त्यातूनही एकनाथाच्या काही आरत्या व विशेषतः रामदासांच्या आरत्या सूचक ध्वनि-योजनेसाठी लक्षणीय कशा आहेत ते नीट सांगता आले असते तर या प्रकरणाला काही वैशिष्ट्य लाभले असते. लेखकाने ' मारुतीच्या आरती ' चा कर्ता 'रामी रामदास' असा दिला आहे. ते खरे असले तरी हा ' रामी रामदास' स्वतः ' रामदास ' होत याविषयी शंका तर त्यांच्या मनात नाही ना? रामदासी संप्रदायात इतर संप्रदायांच्या तुलनेने लेखकादी तपशीलाचा बारकावा अधिक आहे व ही आरती रामदासांची म्हणून पंथमान्य आहे.

(२) ' आरत्या व आरतीकार ' या विषयीचे विवेचन केवळ ठोकळमानाने केलेले लेखन आहे. काही प्रमुख आरतीकार संतांचा नामनिर्देशच येथे आहे. त्या मानाने ' आरत्यांतील पाठभेद ' हा पोटविभाग अधिक महत्त्वाचा आहे. कोणाही अभ्यासकाला तो साह्यकारक होईल असा आहे.

(३) ' आरत्यांतील छंद ' या विषयासंबंधात लेखकाचा जो विशिष्ट दावा आहे तो असा : " आरत्यांच्या लेखनात आलेला अनियमितपणा तालांचा निर्देश करून नियमित करता येईल असे आम्हांस सुचवावयाचे होते." प्रत्यक्षात मात्र तसे काहीही न करता " रूढ पद्धतीप्रमाणे आरत्यांच्या छंदांचा अभ्यास करून ज्या विविध मात्रावृत्तांत व छंदांत, आरत्यांच्या समावेश करणे शक्य

अनुक्रमणिका

होईल तितक्या पद्धतीने तो करून दाखविला आहे," असे स्वतः लेखकाने लगेच नमूद केले आहे! (पृ. २४२). मग आपण काही स्वतंत्र मार्गदर्शन या बाबतीत केल्याचा दावा लेखकाने करावा कशाला? वस्तुस्थिती अशी आहे की, ना. ग. जोशी यांच्या "मराठी छंदोरचना" ग्रंथात जे विवेचन आरतीच्या छंदांबाबत आलेले आहे तेवढे सर्व या ग्रंथात उपयोगाला आलेले आहे. 'आरतीच्या छंदा' बद्दल लिहिताना एक कै. डॉ. माधवराव पटवर्धन यांचा सदोष 'गाण्याचा कान' सोडला तर कै. तात्याबुवा सहस्रबुद्धे व श्री. ना. ग. जोशी यांनी, प्रत्यक्ष आरत्या कशा म्हटल्या जातात, त्यात ताल कोणते असतात, हे लक्षात घेऊनच विवेचन केलेले आहे. "एकाने केलेली मोडणी दुसऱ्याने खोडून काढावी आणि स्वतःची नवीन मोडणी सांगावी असा प्रकार आरती म्हणणाऱ्यांमध्ये आढळत नाही," असे हे लेखक, त्याच ठिकाणी, म्हणतात. मग काय हे छंदःशास्त्रज्ञ कपोलकल्पित नव्या म्हणणी चूष म्हणून निर्माण करून मग नवनव्या मोडणी सांगतात? लेखकाने तसे सिद्ध केलेले नाही, आणि आपली वेगळी सर्वग्राही मोडणीही तो देऊ शकला नाही. मग ही कोपरखळी का? की ही कोणा गुरूची शोधविषयक सूचना या नाकर्त्या शिष्याच्या द्वारे छंदःशास्त्रज्ञांना भोवत आहे? या लेखकाने 'जतूच्या आरत्या' परिशिष्टात दिल्या आहेत; पण त्या आरत्यांचे छंदोदृष्टीने केलेले विवेचन ना. ग. जोशी यांच्या "मराठी छंदोरचनेचा विकास" या ग्रंथात आहे हे शुभवर्तमान या लेखकापर्यंत पोचलेले दिसत नाही; कारण त्या आरत्यांचा छंदात्मक आलेख या ग्रंथात कोठेच आढळत नाही. कै. तात्याबुवा सहस्रबुद्धे यांनी ना. ग. जोशी यांच्या मात्रिक-छांदस उच्चारणाबाबत आक्षेप घेतल्याचे लेखकाने आवर्जून नमूद केलेले आहे. पण छंदात काही अक्षरांचा उच्चार द्विमात्रक होण्याच्या क्रियेला 'छांदस' म्हणावयाचे नसेल तर 'दीर्घप्रयत्न'-'गुरुप्रयास' असे जुने रूढ शब्द आहेत हे तात्याबुवांनाही ज्ञात झाले नव्हते आणि या लेखकांना तर मुळीच माहीत नाही. जुन्या पद्यरचनेत रचनेचा लवचिकपणा आहे. पद्यकर्ते त्याबाबत उदासीन होते, कारण 'पद' म्हणणे एवढीच क्रिया तेव्हा अभिप्रेत होती व ती गोष्ट उत्तम प्रकारे साधली जात होती. म्हणून आता या तऱ्हेच्या रचनेला नवे अभ्यासक शिथिल, विस्कळित, अव्यवस्थित अशी न मानता प्रत्यक्ष म्हणताना होणारे उच्चार लक्षात घेऊन, त्यातील उच्चारण क्रिया लवचिक आहे, असे ते म्हणतात. या लवचिकपणात लघू अक्षराचे दीर्घीकरण होते आणि गुरू अक्षरांचे ऱ्हस्वीकरण होते. पण जेव्हा ते होते तेव्हा ते संस्कृत व्याकरणाला धरून नसले तरी देश्य भाषेच्या उच्चारप्रक्रियेला धरून होत असते. या दोन्ही 'करणां' साठी 'दीर्घप्रयत्न' (प्रयास) व 'लघु-प्रयत्न' (प्रयास) अशा संज्ञा रूढ होत्याच. "मराठी छंदोरचनेचा विकास" आणि (आगामी) "तुलनात्मक छंदोरचना" या ना. ग. जोशी यांच्या ग्रंथात या प्रक्रियेची अनेक उदाहरणे मराठी व मराठीतर भाषांत कशी आढळतात ते नमूद केलेले आहे. तात्पर्य एवढेच की, या प्रबंधकर्त्याला छंदोरचनेमधले काहीही विशेष गम्य नाही.

मात्र एवढे वगळल्यास ग्रंथ संग्राहकदृष्टीचा असून उपयोगाला येईल असा झाला आहे, हे नमूद केलेच पाहिजे. लेखकाने परिश्रम खूप केलेले आहेत आणि त्यांचे हे ग्रंथरूप फळ स्वागतार्ह आहे एवढे नक्कीच.

**ना. ग. जोशी**

●

## मुसलमान मराठी संतकवी

**रा. चिं. ढेरे** ज्ञानराज प्रकाशन, पुणे २, ७ रु.

श्री. रा. चिं. ढेरे हे जुन्या मराठी वाङ्मयाचे एक साक्षेपी संशोधक म्हणून साऱ्या महाराष्ट्राला परिचित आहेत. मराठी वाङ्मयात जे मुसलमान संतकवी होऊन गेले त्यांची माहिती त्यांनी या आपल्या नव्या ग्रंथात दिलेली आहे. एकनाथांचे गुरू जनार्दनस्वामी यांना दत्तात्रेयांनी मलंगवेशात दर्शन दिले अशी परंपरागत समजूत आहे. हे मलंगवेशातील दत्तात्रेय म्हणजे देवगिरीचे सुप्रसिद्ध मुसलमान संत चांद बोधले होत असे आता ऐतिहासिक प्रमाणांनी प्रस्थापित झाले आहे. चांद बोधले यांनी शेख महंमदास ज्ञानेश्वरीची प्रत दिली अशी एक आख्यायिका सांगितली जाते. या गोष्टी ध्यानात घेता एकनाथांच्या आधीच्या काळापासून महाराष्ट्रात हिंदू व मुसलमान साधुसंतांमध्ये धर्मविषयक विचारांची देवघेव होऊ लागली होती असे म्हणता येते. मर्यादित प्रमाणात का होईना पण ही देवघेव अव्वल इंग्रजीच्या काळापर्यंत

चालू होती, असे ढेरे यांच्या या ग्रंथातील आढाव्या-वरून स्पष्ट होते. ही सारी माहिती ढेरे यांनी अतिशय प्रयत्नपूर्वक गोळा केली आहे. त्यासाठी महाराष्ट्रातील संबंधित स्थळांना त्यांनी मुद्दाम भेट दिली आहे, त्याच-प्रमाणे अनेक जुन्या ग्रंथांचा धांडोळा घेतला आहे. प्रमुख अशा सहा मुसलमान संतकवींचा परिचय त्यांनी या ग्रंथात विस्ताराने करून दिला आहे आणि अखेरच्या एका प्रकरणामध्ये इतर काही अल्पज्ञात कवींचा उल्लेख त्यांनी केला आहे. कबीराचा अवतार म्हणून महाराष्ट्रात मान्यता पावलेल्या शेख महंमदाची माहिती त्यांनी दिली आहे, त्याचप्रमाणे गीतेवर अंबरहुसेनी या नावाची ओवीबद्ध टीका लिहिणाऱ्या हुसेन अंबरखानाचा वृत्तान्त दिला आहे. आनंदपरंपरेतील सहजानंदांचा उपदेश घेतलेला व मृत्युंजयस्वामी या हिंदू नावाने ओळखला जाणारा बेदरच्या राजघराण्यातील शहा मुंतोजी ब्रह्मणी याचे चरित्रदर्शन त्यांनी घडवले आहे, तशीच महानु-भावांच्या द्वैती तत्त्वज्ञानास अद्वैतसिद्धान्ताची जोड देणाऱ्या शहामुनीची ओळख त्यांनी करून दिली आहे. त्या त्या कवीच्या चरित्राविषयी उपलब्ध होणारी सर्व माहिती सुसूत्रपणे मांडून दाखवणे, त्याच्या ग्रंथसंपत्तीचा धावता परिचय करून देणे आणि जाता जाता त्या कवीच्या व्यक्तिमत्त्वाचे शक्य तेवढे दर्शन घडविणे अशा पद्धतीने ढेरे यांनी आपला हा ग्रंथ सजविला आहे. त्यांनी प्रास्ताविकात उल्लेख केला आहे त्याप्रमाणे या ग्रंथात नवीन माहितीचे अनेक कण इकडे तिकडे विखुरलेले आढळतात आणि हे सारे अनेक ठिकाणांहून गोळा करण्यामधील लेखकाची मधुकरवृत्ती जाणवते. चरित्र आणि वाङ्मय या दृष्टीने प्रत्येक कवीची संपूर्ण माहिती ढेरे यांना मिळालेली नाही आणि अनेक स्थळी मिळालेल्या त्रोटक माहितीवर त्यांना समाधान मानावे लागले आहे. तथापि उपलब्ध होऊ शकणारी सारी माहिती एकत्र गोळा करून त्यांनी आपल्यापुढे ठेवली आहे ही त्यांची कामगिरी महत्त्वाची आहे.

या सर्व संतांची चरित्रविषयक माहिती महीपतिकृत भक्तविजय, राजारामप्रासादीकृत भक्तमंजरीमाला, भानजी त्रिंबक देशपांडेकृत नागेशलीलामृत आणि इतर काही जुनी प्रकरणे यावरून ढेरे यांनी घेतलेली आहे. या साऱ्या ग्रंथांतील माहिती ऐतिहासिक दृष्टीने दिलेली नाही आणि विश्वसनीय असा काही प्रत्यंतरपुरावा मिळाल्याशिवाय ती जशीच्या तशी स्वीकारता येत नाही, याकडे ढेरे यांचे लक्ष जावे तितके गेलेले दिसत नाही. विशेषेकरून चमत्कारकथांच्या बाबतीत हे जाणवते. या सर्व संतांच्या आयुष्यात घडलेले चमत्कार ढेरे यांनी आपल्या ग्रंथात जागोजाग वर्णिले आहेत, पण त्या कथांची चिकित्सक दृष्टीने तपासणी करण्याचा प्रयत्न त्यांनी केलेला दिसत नाही. अलमखानाला समाधी घेण्यासाठी जागा देण्यास मुगळी येथील ग्रामस्थांनी उशीर केल्यामुळे त्याने करळी येथे जाऊन समाधी घेतल्यावर मुगळी गावात सर्वत्र सर्प निघू लागले, एवढेच नव्हे तर मारुतीच्या देवळातून एक महाभुजंग निघाला तो अलमखान बसत असे त्या स्थळी जाऊन गुप्त झाला, किंवा चांद बोधले यांनी निजाम-शहाचे मलविसर्जनच बंद करून टाकले (पृ. ६०,८९); अशा प्रकारच्या कथा ढेरे यांनी उद्धृत केल्या आहेत. अशा सर्वच कथांचा काही उलगडा करता येणार नाही हेही मान्य होण्यासारखे आहे, पण बऱ्याच वेळा त्यांनी या कथा जशाच्या तशा पत्करल्यासारख्या वाटतात. जयरामस्वामींना प्रथम दर्शन देताना ते शेख महमदाने वाघाच्या रूपाने दिले, ही गोष्ट सांगून पुढे 'ही चमत्कारकथा खरी नसावी' असे ढेरे यांनी म्हटले आहे. (पृ. ९४). या त्यांच्या उद्गाराचा अप्रत्यक्षपणे असा अर्थ होतो की, या पुस्तकात त्यांनी दिलेल्या अशा प्रकारच्या इतर कथा खऱ्या आहेत. पण चिकित्सक दृष्टीला हे मानवण्यासारखे नाही.

कोणाही कवीच्या वाङ्मयाबद्दल लिहिताना त्याला एक प्रकारे गौरवून लिहिण्याची ढेरे यांची पद्धत आहे. कोणाबद्दल सहसा उणा उद्गार काढू नये किंवा संतांचे सारेच काही उत्तम असते या दृष्टीने हे लिहिणे ठीक असले, तरी त्यामुळे साऱ्या लेखनात एक प्रकारचा ढोबळपणा उत्पन्न होतो आणि कोणाच्याच जीवनाचे किंवा वाङ्मयाचे चित्र त्यातील गुणदोषांसह किंवा अंगभूत वैशिष्ट्यांसह रेखीवपणे डोळ्यांसमोर उभे राहत नाही. भक्ती व साक्षात्कार यांचे वर्णन काव्यात आलेले असले की तो कवी व त्याचे काव्य ढेरे यांच्या दृष्टीने एकदम श्रेष्ठ कोटीत जाऊन बसते आणि त्यामुळे त्यांच्या लेखनात अनेक ठिकाणी अतिशयोक्ती उत्पन्न होते. शहामुनीवरील आपल्या लेखाचा प्रारंभ करिताना 'मराठी जनमानसावर आपल्या चरित्रचारित्र्याचा आणि वाणीचा

प्रभाव गाजविणारा संतकवी ' असे त्याचे वर्णन ढेरे यांनी केले आहे. शहामुनीचे वर्णन या शब्दांमध्ये केले तर ज्ञानेश्वर-तुकारामांचे वर्णन त्याच्या तुलनेने कसे करावयाचे असे मनात येऊन जाते. जन्मजात उच्चनीचतेवर आधारलेले सारे भेद व्यर्थ आहेत असा विचार शहामुनींनी एका ठिकाणी मांडला आहे. त्याचा उल्लेख करून ' अशाच प्रकारचे उद्गार आणि समन्वयशील विचार त्याने दहा सहस्र ओव्यांत मांडले आहेत, वाचकांनी मूळ ग्रंथ अवश्य वाचावा, ' असे आपल्या लेखाच्या अखेरीस ढेरे यांनी म्हटले आहे. हा उद्गार वाचल्यावर शहामुनींचा ग्रंथ सर्वत्र अशा उदार विचारांनी भरलेला असावा असा ग्रह होतो. पण शहामुनींचा सिद्धान्तबोध हा ग्रंथ वाचताना तत्त्वज्ञानाच्या व वाङ्मयाच्या दृष्टीने सरस वाटणारा भाग अधूनमधून आढळला, तरी त्यांच्या विवेचनातील शिथिलता व भावडे विचार यांचाच ठसा मनावर अधिक उमटतो आणि मग ढेरे यांचे उद्गार केवळ औपचारिक प्रशस्तीचे आहेत असे वाटू लागते. ग्रंथाचे अखेरचे प्रकरण ' अविंध आणि गोविंद ' असे आहे. नावावरून अशी अपेक्षा उत्पन्न होते की मुसलमानांनी श्रीकृष्णभक्तीचा अंगीकार कसा व किती प्रमाणात केला याचा आढावा त्यात घेतला असावा. पण प्रत्यक्षात काही मुसलमान कवींची माहिती त्यात दिली आहे आणि अध्यात्मपर लेखन करणाऱ्या कवींबरोबरच शाहिरी कविता लिहिणाऱ्या व संगीत किंवा ज्योतिष या विषयावर लिहिणाऱ्या लेखकांचाही उल्लेख त्यात केला आहे असे आढळते. आणखी एका किरकोळ तपशीलाचा उल्लेख येथे करावासा वाटतो. पृष्ठ १६६ वर, अहमदनगर येथील शहाशरीफच्या दर्ग्याला शाहूछत्रपतींनी दिलेली एक सनद मुळातून उद्धृत केल्यावर पुढच्या परिच्छेदाचे पहिले वाक्य ' या प्रलयंकर आक्रमणाने सारा महाराष्ट्र दिङ्मूढ झाला ' असे आले आहे. या वाक्याचा संदर्भ तेथे काहीच लागत नाही. येथे काहीतरी मजकूर राहून गेला असावा किंवा मागेपुढे झाला असावा असे वाटते.

अशा काही उणीवा जाणवल्या तरी जुन्या मराठी भक्तिपर वाङ्मयात ज्यांनी काही भर घातली अशा मुसलमान संतकवींची माहिती संकलित करून आणि तीमध्ये आपल्या नवीन संशोधनाची भर घालून ती मराठी वाचकांना ढेरे यांनी या ग्रंथात उपलब्ध करून दिली ही त्यांची कामगिरी महत्त्वाची आहे. ढेरे यांचे संशोधन अखंड चालू असते. त्यांनीच ' आंथरलेल्या या बैठकीवर ' उरलेले मुसलमान लेखकही त्यांनी यथाकाल आणून बसवावेत एवढीच अपेक्षा मराठी वाङ्मयाचे अभ्यासक त्यांच्याकडून करतील. ही अपेक्षा ते पूर्ण करतील असा विश्वास आहे.

वि. रा. करंदीकर

●

## संशोधन : पद्धती, प्रक्रिया, अंतरंग

संशोधन : पद्धती, प्रक्रिया, अंतरंग–लेखक **डॉ. दु. का. संत**, अनाथ विद्यार्थी गृह प्रकाशन, पुणे २, १९६६, पृ. १२ + २०३, मूल्य रु. ९.

गेल्या पंधरावीस वर्षांत पीएच्. डी. पदवीची आवश्यकता वाढत्या प्रमाणावर वाटू लागल्यामुळे तो प्रबंध लिहिण्यापुरती तरी किमान संशोधनाची पद्धत माहिती करून घेण्याची गरज हल्ली निर्माण झाली आहे. ती ओळखून डॉ. संतांनी अशा विद्यार्थ्यांना व संशोधनाची वाटचाल करू पाहणारांसाठी प्राथमिक मार्गदर्शन करणारा हा ग्रंथ रचला. यापरिचय करून देणारा मराठीतला हा पहिलाच ग्रंथ विषयाचा आहे.

ऐतिहासिक पार्श्वभूमीकडे पाहताना अंगीकृत विषयाची अचूक आणि विश्वसनीय माहिती, ज्ञानाची पुनर्संघटना, वस्तुनिष्ठ, तर्कशुद्ध व विशिष्ट पद्धतीने करावयाची मांडणी अशी स्थूलमानाने संशोधनाची सर्वमान्य वैशिष्ट्ये दाखविली आहेत. ड्यूईच्या शास्त्रीय पद्धतीचा परिचय, सामाजिक शास्त्रांच्या शास्त्रत्वाचे सर्वेक्षण, शास्त्रांची विविधता, त्यांच्या मर्यादा दाखविल्यानंतर तत्त्वज्ञान, इतिहास, मानसशास्त्र इत्यादी ज्ञानशाखांतील संशोधनाचे वेगळेपण व त्यावरील मतमतांतराचा परामर्श घेतला आहे. ' साहित्यक्षेत्रीय संशोधन : व्याप्ती व मर्यादा ' विचारात घेताना प्रज्ञा व प्रतिभा यांच्या व्यापाराची तीन क्षेत्रे मानली आहेत. १ विज्ञान, २ सामाजिक शास्त्रे, ३ साहित्य व कला. विज्ञानोपयोगी मूल्यांचा साहित्य-विचारात तितक्या सूक्ष्मपणे उपयोग झाला नाही तरी पृथक्करण, संकलन, तुलना वगैरे वाचून डावलून चालत नाही, हे लक्षात ठेवले पाहिजे.

या प्रकरणातील महत्त्वाची गोष्ट म्हणजे हिंदी भाषेमध्ये खच पडत चाललेल्या ग्रंथमहोदधींची दिलेली आकडेवारी आणि तथाकथित संशोधनाला येत असलेली

पौर्णिमेची भरती. हे भाषेला किंवा ज्ञानाला आलेले खरे बाळसे नव्हे हे आवर्जून सांगितले पाहिजे. मराठीतलेच काय कोणत्याही भाषेतले साहित्यसंशोधन हे एक निराळेच क्षेत्र मानून त्याचा विकास करण्यासाठी झटले पाहिजे याबद्दल वाङ्मयाची आस्था असणारे व्यासंगी निश्चित सहमत होतील. इंग्रजीतील या विषयीचे ज्ञान आपल्या गरजेप्रमाणे संस्कार घडवून ते आत्मसात केले पाहिजे. वाङ्मयाचा सर्वांगीण व सर्वंकष अभ्यास होणे अगत्याचे आहे. या संदर्भात एक खेदाची गोष्ट नमूद करणे प्राप्त आहे. मराठीतील शोधनप्रधान लेखनाचे एक परिशिष्ट या ग्रंथाला जोडावे असे डॉ. संतांच्या मनात होते. ते त्यांनी टाळले आहे. खरे म्हणजे ते परिशिष्ट महत्त्वाचे आणि या ग्रंथाची उपयुक्तता वाढविणारे ठरले असते.

संशोधनप्रक्रियेचे प्रकरण तांत्रिक माहिती देणारे आहे. पण त्याचे पोटमथळे एम. ए. नंतर संशोधन करू पाहणाऱ्या प्रौढ विद्यार्थ्यांसाठी नसून प्राथमिक शाळेतल्या मुलांसाठी असावेत तसे आहेत. उदा. 'शेवटचा हात फिरवा', 'वाचकाची आठवण ठेवा.' इत्यादी. या प्रकरणाच्या मांडणीत अस्ताव्यस्तपणा आणि आखणीमध्ये बरीच शिथिलता आढळते. ज्ञान-शाखेचे वैशिष्ट्य, विषयाचे गांभीर्य, संशोधनाची पातळी आणि मांडणीचा प्रकार आधी ध्यानात घेऊन या सर्व बाबींचे संतुलन त्या संबंधीच्या लेखनात दिसले पाहिजे. ते या प्रकरणात दिसले असते तर बरे झाले असते.

शोधक्रियेचे अंतरंग हे मानसशास्त्रीयदृष्ट्या विवेचन करणारे प्रकरण आहे. शास्त्रीय पद्धतीचे मानसिक अधि-ष्ठान, प्रज्ञावंत व विचारवंत यांच्या मनाच्या ठेवणीतला सारखेपणा आणि वेगळेपणा, यासारख्या विषयाचा ऊहापोह करताना क्वचित मध्ये "स्फूर्ती म्हणजे अंतर्म-नाच्या परिशोधनाला गवसलेले उत्तर" अशा प्रकारचे काही सिद्धान्तवजा विचार आढळतात.

या प्रकारच्या ग्रंथरचनेत परिभाषेचा मोठा यक्षप्रश्न असतो. पारिभाषिक संज्ञांची निश्चिती झटकन होणे शक्य नाही, त्यावर अनेक अभ्यासक आपापल्या परीने विचार करतात. तेव्हा पुष्कळशा अर्थच्छटा प्रकाशात येतात आणि त्या अनुषंगाने संज्ञेची निश्चिती होते. कोणाही एकाला सर्व संज्ञा अचूक सापडतील असेही नाही. तरी शक्यतो एका मूळ धातूपासून किंवा नामापासून संबंधित संज्ञा साधाव्यात असा संकेत आहे. या दृष्टीने पाहिले तर Actisve Reseasch ला "प्रात्यक्षिक संशोधन" आणि Action Research ला "कार्यकारी संशोधन" या पर्यायात Act पासून Active व Action हे शब्द इंग्रजीत ठीक झाले पण मग मराठीत एकाला 'प्रात्यक्षिक' तर दुसऱ्याला 'कार्यकारी' इतके वेगळे शब्द कशासाठी? असा प्रश्न पडतो. शिवाय Engineering ला जर 'यांत्रिकी' ही संज्ञा आहे तर Civil Enginreeing ला कोणता पर्याय वापरला असता? याचे अनुमान करणे कठीण जाते.

या ग्रंथाच्या विवेचनाचा सारभूत भाग मुख्यतः इंग्रजी आधाराचा असून मराठी ग्रंथांना त्या मानाने गौण स्थान दिलेले आढळते. अर्थात विषयविवेचनाच्या प्राथमिक अवस्थेमध्ये हा दोष नव्हे. परंतु प्रस्तुत ग्रंथाचा तोल वैज्ञानिक संशोधन पद्धतीकडे जाणारा नसून साहित्यसंशोधनाकडे झुकणारा आहे. त्या मानाने साहित्याच्या संशोधनासंबंधीचे इंग्रजीतले ग्रंथ व लेख अधिक पाहिले असते तर जास्त उपकारक ठरले असते. विषयाची बांधणी अधिक रेखीव व मांडणी थोडी ठाशीव झाली असती.

साधनभूत झालेल्या साहित्याची ग्रंथाच्या शेवटी एक यादी दिलेली आहे. संशोधनाचे शास्त्र विशद करून प्रत्येक टप्प्यावर काटेकोरपणाचे महत्त्व कसे आहे हे पटवून देणाऱ्या ग्रंथाची ही आधारग्रंथसूची आहे. तिच्यात एकाही ग्रंथाची किंवा लेखाची नोंद पूर्ण नाही. संशोधन ग्रंथसूची-मध्ये लेखक, ग्रंथनाम, आवृत्ती क्रमांक, प्रकाशन स्थळ व प्रकाशन काल एवढ्या गोष्टी तरी अत्यावश्यक असतात. येथे लेखक व ग्रंथ यांचीच फक्त नावे आहेत. सूची हे वेळ आणि श्रम वाचविण्याचे साधन असून संशोधनाचा पाया आहे. तो कच्चा व अर्धवट सोडून कसे चालेल? ग्रंथसूची हादेखील संशोधनप्रक्रियेतलाच एक भाग आहे म्हणून येथेही "विश्वासार्ह बिनचूक पद्धतशीर वर्गीकृत मांडणीची" गरज असते. ही सूची परिपूर्ण व शास्त्रशुद्ध झाली असती तर विद्यार्थ्यांपुढे एक आदर्श राहिला असता. आदर्शाचे वर्णन करण्यापेक्षा विद्यार्थ्यां-समोर प्रत्यक्ष आदर्श ठेवणे जास्त उपकारक ठरते. संशोधनपद्धती अंगी मुरण्याला महत्त्व आहे.

निवेदन करताना डॉ. संतांनी म्हटले आहे : "मराठीत हा पहिलाच उपक्रम असल्याने त्याचे स्वरूप असे राहणेच

आवश्यक व अपरिहार्य होते. " ( पृ. १२ ) या विचार-सरणीमुळेच परिपूर्णता आणण्याच्या प्रयत्नांत उणीव राहिली असावी. " असे स्वरूप राहणेच आवश्यक होते " हे कोणीही मान्य करणार नाही.

He who can, does, he who cannot, teaches. या शॉच्या वचनाप्रमाणे डॉ. संतांची भूमिका विनयाची आहे असे त्यांनी म्हटले आहे. ती भूमिका सोईची असली तरी संशोधनाच्या मार्गदर्शकाला योग्य आहे का ? याचा विचार करायला पाहिजे.

विचार करू शकणाऱ्या बुद्धिजीवी व्यक्तींनी विधायकतेचा संस्कार झालेली शोधबुद्धी जागृत ठेवली पाहिजे. आपल्या जीवनाचा एकंदर चेहरामोहरा संशोधनाभिमुख झाला पाहिजे हे डॉ. संतांना पटले म्हणून त्यांनी हा उपक्रम केलेला आहे. तो अल्पसा आहे, हा ग्रंथ परिचयवजा झाला आहे वगैरे गोष्टींची डॉ. संतांना जाणीव आहे. त्यांच्या चित्ताला अधिक स्थिरता लाभली असती किंवा आणखी दोनचार वर्षांनी लिहिला गेला असता तर हाच ग्रंथ अधिक बांधेसूद झाला असता. डॉ. खैरांनी सुचविल्याप्रमाणे वाङ्मयाच्या संशोधनासंबंधी ग्रंथ लिहिण्यास डॉ. संतांना चित्तस्वास्थ्य लाभावे ही सदिच्छा.

**मु. ग. पानसे**

●

## Kunabi of Mahad

( A Survey of Marathi dialects, 3 ). ले. डॉ. अ. मा. घाटगे, मुंबई : महाराष्ट्रराज्य–साहित्य–आणि संस्कृति–मंडळ, १९६६. ( ५ ) + १४८ पृ. रु. ५. सहायक : श्री. वि. वा. परांजपे.

## Cochin

( A Survey of Marathi dialects, 4 ). ले. डॉ. अ. मा. घाटगे, मुंबई : महाराष्ट्रराज्य–साहित्य–आणि संस्कृति–मंडळ, १९६७. ( ७ ) + १४० पृ. रु. ४·५०. प्रस्तावना : श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी. सहायक ( मुरुवातीला ) : डॉ. डी. एन्. शंकर भट.

महाराष्ट्रराज्य-साहित्य-आणि-संस्कृति-मंडळाच्या साहाय्याने पुणे-विद्यापीठ-भाषाशास्त्र-विभाग, डेक्कन कॉलेज येथे मराठीच्या बोलींच्या वैज्ञानिक अभ्यासाचे काम चालले आहे. त्याचे फलस्वरूप म्हणून दक्षिण कानड्यामधील म्हणजे मंगळूरची कोकणी, कुडाळी ( म्हणजे रत्नागिरी जिल्ह्याच्या अर्ता दक्षिण भागातली ), व कुलाबा जिल्ह्याच्या दक्षिण भागातली म्हणजे महाड तालुक्यातल्या कुणबी शेतकरी समाजाची बोली, आणि केरळच्या दक्षिण भागातली म्हणजे कोचीनच्या गौड–सारस्वत जातीची बोली ( जिला ते स्वतः कोकणी म्हणून संबोधितात. ) ह्या चार बोलींवरचे खंड प्रकाशित झाले आहेत. त्यांपैकी पहिल्या खंडाचा परिचय पत्रिकेच्या जानेवारी–मार्च १९६६ च्या अंकात करून दिला आहेच. तिसरा आणि चौथा खंड आज आपल्यासमोर आहेत.

निरनिराळ्या बोलींची तुलना करायला सोपे जावे म्हणून सर्व खंडांना समान असा एक साचाच डॉ. घाटगे ह्यांनी ठरवून टाकलेला दिसतो : ( १ ) वीस–एक–पानी वर्णविन्यास, त्यात स्वर, व्यंजने, एकापुढे एक येणाऱ्या स्वरांचे आणि व्यंजनांचे समुदाय, एका अवयवात येणाऱ्या स्वर-व्यंजनांचे समुदाय ( शब्दमर्यादेच्या पलीकडे गेल्यावर गोचर होणाऱ्या सुरावली इत्यादी ध्वनिविकारांचा त्यात विचार नाही ). ( २ ) चाळीस-पन्नास पानी पदविन्यास; त्यात नाम, विशेषण, सर्वनाम, संख्यावाचक, क्रियापद ह्यांना होणारे विकार ( पद-मर्यादेच्या पलीकडे गेल्यावर लक्षात येणाऱ्या वाक्य-विन्यासतत्त्वांचा त्यात विचार नाही ). ( ३ ) आठ–नऊ सलग उतारे, छोट्या गोष्टी, क्वचित वर्णनात्मक ( उदाहरणार्थ महाड–कुणबी–बोलीमध्ये रानडुकराच्या शिकारीचे कथन ). ( ४ ) तीन–चारशे साधारण एका ठशाची वाक्ये, त्यावरून वाक्यविन्यासाचा थोडाबहुत अंदाज घेता यावा. ( ५ ) एक शब्दसंग्रह म्हणजे ध्वनिविकार आणि वाक्य-विन्यास ह्यांचा विचार नसणे ही त्या ' सर्वेक्षणा 'ची एक मोठीच मर्यादा मानावी लागेल. त्या बोलीचा आणि समाजजीवनाचा संबंधही कुठे दिग्दर्शित केलेला नाही. एवढ्या मर्यादा मानल्या तर निरनिराळ्या बोलींचे अलिप्त वैज्ञानिक वर्णन ह्या मालेच्या रूपाने आपल्यापुढे येत आहे हा एक मोठाच लाभ अभ्यासकांना होत आहे. ही वर्णने मराठीत न लिहिता इंग्लिशमध्ये लिहिली गेली आहेत हीही काही वाईट गोष्ट नाही.

ह्या बोलींच्या स्वरूपाची स्थूल कल्पना येण्यापुरते दोन उतारे पुढे देत आहे. पहिला महाडच्या कुणब्यांच्या बोलीमधील ( पृ. ८७ ) :

असा कर्ता कर्ता च्यार् दिवस् आमी रानात्मदी त्यान्च्या माङ्ग गेलो। परन्तू आमाना डुकराच्यी शिकार् काय् झाली नाय्। नन्तर् आमी घरी आलो। घरी आल्याच्या नन्तर आमच्या गावात् आमच फउदार्-बाबा मोट चाङ्ल ह्या भागाच कार्यकर्त होत। त्याना त्याची जानीव् होती। म्हनून् त्या गोश्टी-वर् त्यानी दुर्लक्श् केलेल होता। आनी त्या गोश्टीत्-मन्दी आमी आम्चा मन् घातला। नन्तर् चउत्या दिवशी आमी घरी आलो। घरी आल्याच्या नन्तर मना फउदार्-बाबानी साद् मार्ली। तात्या आन् अक्रा वर्सा आमी ठेव्लेला होता हत्यार्, तुमी तो उच्लाय् लाग्ला। अत्ता ल्हान् मोटा जनावर् कसा ही मारून् दाङ्लाव् तर बरा हाये। नायूतर आमच्या गावाच्यी तुमी इजत् घालवली।

( टीपा —– स्वरांची ह्रस्वदीर्घता व्यवच्छेदक नाही; इ–ई, उ–ऊ, अ–अ हा लेखनभेद केवळ वाचकाच्या सोयीसाठी घातला आहे. च्–च्य्, ज्–ज्य्, झ्–झ्य् ह्या जोड्यांमधील स्थान–भेद व्यवच्छेदक आहे. )

केरळमध्ये ‘ मराठी ’, ‘ कऱ्हाडी ’ आणि ‘ कोंकणी ’ ह्या नावाने ओळखल्या जाणाऱ्या बोली अनुक्रमे शेतकरी–समाज, सारस्वतेतर साक्षर समाज आणि गौड–सारस्वत समाज ह्यांमध्ये बोलल्या जातात. त्यांपैकी तिसरीचा हा नमुना ( पृ. ८५ ) मलयालम् भाषेचा परिणाम जरी तिच्यावर दिसून आला तरी मंगळुरी सारस्वतांच्या कोंकणीशी तिचे साम्य लक्षात घेण्यासारखे आहे. ह्या बोलीत दंत्य च्, ज, झ्, मात्र नाहीत; केवळ च्य्, ज्य्, झ्य् हेच वर्ण आहेत. इ, उ, ए, ओ, अॅ, ऑ, अ, आ ह्या सर्व स्वरांचे ह्रस्वदीर्घ व्यवच्छेदक आहेत. शीर्षबिंदु केवळ स्वरांचे अनुनासिकत्व दर्शविण्यासाठी वापरला आहे; नासिक्य व्यंजनांसाठी नाही.

वेणुमम्मान[1] केद्नायि[2] देव्ळान्तुल्या हस्तीकु[3] न्हाणोवन्च्याकु व्हरपु अस्सिलॅं[4]। देव्ळाच्या तेक्का[5] गोप्रान्तुल्यानु भायर देवुनु पगजिरा केरी लगिगच्च्यानु[6] देव्ळाच्या तळ्यान्तु वच्च्यु[7] वट्टेरि[8] वेणुमम्मानु अड्ग्डीन्तु थक्कूनु[9] फड्च्यानु काणु घेव्प अस्सिलॅं।[10] तॅं फड्चान्च्या अड्गडिलग्गीचि[11] पय्ममालि सिड्णी अड्गडि[12] सस्सिळि ! वेणुमम्मान फड्चानु खाव्न्चॅं वेळ्ळेरि पयममानु हस्तीक केलि[13] ग्रावव्पु अस्सिलॅं।

( अर्थाविषयी टीपा—१ वेणुमम्म आणि पय्मु ही व्यक्तिनामे आहेत. २ नेहमी. ३ हत्तिणीला. ४. न्हाणाला नेत असे. ५. दक्षिण. ६ पश्चिमेकडील रस्त्याच्या जवळून. ७ जायच्या. ८ वाटेवर. ९ दुकानात-मधून. १० विड्याची पाने विकत घेत असे. ११ दुकाना-शेजारी. १२ पय्मुमचे शिवणाचे दुकान. १३ केळी. )

दुसऱ्या उताऱ्याचे शब्दशः भाषांतर देण्याची माझी इच्छा होती. पण मूळ पुस्तकात त्याला जरूर ती सामग्री शब्दसंग्रहात व अन्यत्र उपलब्ध नाही. दुसरी एक लक्षात घेण्यासारखी गोष्ट उपान्त्य अवयव गुरु ठेवण्याची प्रवृत्ती दिसते आणि स्वरांच्या ह्रस्वदीर्घत्वाचा अधिक खोलवर विचार होणे जरूर दिसते.

ह्या खंडांचा एकत्रित विचार केला तर त्यांच्या मर्यादा स्पष्ट होतात. शब्दाच्या किंवा पदाच्या पलीकडे जाऊन वाक्याच्या पातळीवर उच्चार आणि व्याकरण ह्यांचा विचार नाही, उताऱ्यांचे भाषांतर शब्दशः मिळू शकेल ह्याची व्यवस्था नाही, उताऱ्यांचे स्वरूप चटकन मिळू शकणाऱ्या गोष्टी असेच मुख्यतः आहे. उच्चार आणि व्याकरण ह्यांची जो माहिती दिली आहे तिच्यामध्ये तपशील किती आणि कोणता द्यायचा ह्याबद्दल निश्चित धोरण दिसत नाही, एकंदरीत सर्व पाहणी आणि लिखाण काहीशा घाईने उरकल्यासारखे दिसते. सर्व पुस्तकावर लेखकाचा दोन-तीनदा हात फिरला असता तर आहेत त्या मर्यादा गृहीत धरूनसुद्धा वर्णनाला अधिक रेखीव-पणा आला असता असे वाटते. जी बोली परिचित आहे तिच्याबद्दल वाचकाला ही उणीव इतकी जाणवणार नाही, पण जिथे ही सोय नाही तिथे ती नक्की जाणवेल. सरकारी मदतीतून संशोधन करताना सरकारी वेळा-पत्रकाचा दाब संशोधकावर पडणे कितपत इष्ट आहे ह्याचा विचार करायची वेळ आली आहे असे मला अनुभवान्ती वाटू लागले आहे.

अर्थात् जे काम आपल्यापुढे आहे ते ही नसे थोडके.

**अशोक रा. केळकर**

●

अनुक्रमणिका

## केशवसुतांची काव्यदृष्टी

लेखकः—दि. के. **बेडेकर**, प्रकाशकः—पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, पृष्ठसंख्या १२७ : मूल्य पाच रुपये.

आधुनिक मराठी कवितेच्या प्रांतातील सर्वांत भाग्यशाली कवी कोण? या प्रश्नाचे उत्तर सामान्यतः ताम्बे असे देण्यात येते. ताम्बे यांना हे भाग्यशालित्व बहाल करताना ताम्बे यांच्या काव्यक्षेत्रातील यशाबरोबरच त्यांचे व्यावहारिक जीवनातील यशही लक्षात घेतले जाते.

हे असले व्यावहारिक यश केशवसुतांच्या वाट्याला कधीच आले नाही; केशवसुतांतील कलंदर कलावंताने त्याची कधी पर्वाही बाळगली नाही. शिवाय कोणत्याही कलावंताचे अंतिम भाग्यशालित्व व्यावहारिक यशापयशावर अवलंबून नसतेही. ते अवलंबून असते त्याच्या कलेतील सततच्या व्यापक आवाहनक्षमतेवर. आधुनिक कवितेच्या प्रांगणात या दृष्टीने केशवसुतांना फारच भाग्यशाली मानावयास हवे.

केशवसुतांच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने, त्यांच्या गुणगौरवाला आलेले भरते, औपचारिक नव्हते; त्यांनी उभारलेल्या कवित्वाच्या उंच गुढीला मराठी रसिकतेने मनःपूर्वक दिलेली ती मानवंदना होती; हे या निमित्ताने प्रकट झालेल्या केशवसुतविषयक विविध व विपुल साहित्यावरून स्पष्ट होते. या साहित्याच्या द्वारा केशवसुतांच्या कवित्वाचे व व्यक्तित्वाचे विविध अंगांनी जे पुनर्मूल्यमापन झाले, त्या मापनाने केशवसुतांची महती कमी न होता ती वृद्धिंगत झाल्याचे आढळून आले. एके काळी उच्चासनावर आरूढ झालेल्या अनेक साहित्यिकांची स्थाने आजच्या समीक्षेमुळे विचलित झालेली दिसत असता, त्याच समीक्षेने केशवसुतांना पूर्वीपेक्षाही अधिक सन्मानाच्या जागी स्थापण्यासाठी झटावे, हे दृश्य मोठे नवलपूर्ण व केशवसुतविषयक आदर वाढविणारे आहे.

केशवसुतविषयक या वाढत्या कुतूहलात व आदरभावनेत भर घालण्याचे कार्य श्री. दि. के. बेडेकर यांच्या 'केशवसुतांची काव्यदृष्टि' या पुस्तकाने होते. हे पुस्तक म्हणजे बेडेकरांनी प्रसंगोपात लिहिलेल्या केशवसुतविषयक आठदहा स्फुट लेखांचा एक छोटेखानी संग्रह आहे. आणि बेडेकरांच्या नेहमीच्या आशयानुगामी पद्धतीला अनुसरूनच ते लिहिले आहे. त्यातील 'मानवतावादी' अंगाला दिले गेलेले प्राधान्य केशवसुतविषयक समीक्षेला तसे नवे नाही. किंबहुना या पूर्वीच्या केशवसुतविषयक समीक्षेत केशवसुतांच्या कवितेतील मानवताप्रधान, समाजप्रचोदनात्मक आशयावरच विशेष मदार होती.

परंतु यामुळे बेडेकरांच्या पुस्तिकेतील विवेचनाचे महत्त्व कमी होत नाही. कारण यापूर्वीच्या केशवसुतविषयक विवेचनात हा मानवताविषयक आशय शोधताना किंवा त्याचे मूल्यमापन करताना, तत्कालीन राजकीय-सामाजिक परिस्थितीच्या संदर्भालाच अधिक महत्त्व दिले जाई, केशवसुतांच्या 'क्रांतिकारकत्वा'चा मागोवा किंवा इंग्रजी कवितेतील 'रोमँटिसिझम्' शी त्यांचा असलेला अनुबंध याच अनुरोधाने तपासला जाई. बेडेकरांच्या विवेचनातही या सामाजिक संदर्भाला किंवा सांस्कृतिक पार्श्वभूमीला महत्त्व आहेच; किंबहुना इंग्रजी राजवटीमुळे आधुनिक भारतात जी विविध सांस्कृतिक स्थित्यंतरे झाली, या स्थित्यंतरांच्या बाबतीत बेडेकरांनी जो एक दृष्टिकोण पत्करला आहे, त्या दृष्टिकोनाचे एक अंग म्हणूनच मूलतः बेडेकर केशवसुतांकडे पाहतात, आणि या क्षेत्रातील केशवसुतांची भूमिका कशी अनन्यसाधारण आहे हेच मुख्यतः बेडेकरांना या विवेचनाच्या द्वारा सांगावयाचे आहे.

पण हे सांगताना त्यांनी जो भर दिला आहे तो राजकीय-सामाजिक पार्श्वभूमीवर नाही; तर या सांस्कृतिक संदर्भात केशवसुतांचे जे चिंतनविश्व सिद्ध झाले, त्या विश्वाच्या उद्घाटनावर. केशवसुतांचे मानव व त्याची अंतिम नियती या संबंधाचे जे स्वतंत्र 'अध्यात्म' आहे त्या 'अध्यात्मा'चे प्रयोजन व स्वरूप विशद करणे, हे या लेखांचे उद्दिष्ट आहे. कवी केशवसुतांपेक्षा तत्त्वचिंतक केशवसुतांचे दर्शन घडविणे—किंबा असे म्हणता येईल की, या तत्त्वचिंतनाचा केशवसुतांच्या घडणीवर काय परिणाम झाला ते स्पष्ट करणे, हे या लेखांचे लक्ष्य आहे. केशवसुतांच्या मूलग्राही, उत्कट, विशाल, प्रौढगंभीर, व्रतस्थ व्यक्तित्वाचेही दर्शन विवेचनाच्या ओघात घडविले जाते. केशवसुतांच्या कवित्वाच्या व व्यक्तित्वाच्या अभ्यासाची एक नवी दिशाच या विवेचनाने उपलब्ध करून दिली आहे. यापूर्वीच्या केशवसुतविषयक समीक्षेत वरील दृष्टीने काहीसा विचार झालेला असला तरी त्या विचाराला एवढी सघनता नव्हती; केशवसुतांच्या काव्याशयात एवढे खोल मज्जन झाले नव्हते.

अनुक्रमणिका

या दृष्टीने या संग्रहातील ‘ हृदयस्थ प्रकाश ’ ‘ मूर्तिभंजन’ ‘ हरपले श्रेय ’ ‘ घड्याळ ’ ‘ केशवसुतांची काव्यदृष्टी ’ हे लेख पाहण्यासारखे आहेत.

बेडेकरांनी आपल्या प्रतिपादनासाठी केशवसुतांच्या लोकप्रसिद्ध कवितांपेक्षा काहीशा उपेक्षित गणल्या गेलेल्या कविताच अधिक घेतलेल्या आहेत (‘घड्याळ’ ‘ तत्त्वतः बघता नामा वेगळा ’ ‘ आगबोटीच्या काठाशी, समुद्राच्या शोभेकडे पाहात उभ्या असलेल्या एका तरुणीस ’ ‘ मूर्तिभंजन...इ. )’ त्यामुळे केशवसुतांचा विशिष्ट आशय त्यांच्या लहानमोठया सर्वत्र कवितांतून कसा ओतप्रोत भरला आहे, याची कल्पना येते. बेडेकरांच्या एकूण विवेचनामुळे केशवसुतांच्या पत्रांना, स्फुट उद्गारांना, त्यांच्या कवितांतील ‘ शून्य ’ ‘ दिव्य ’ ‘ बुद्धि ’ ‘ प्रकाश ’ ‘ सृष्टी ’ ‘ निसर्ग ’ ‘ भाव ’ यांसारख्या शब्दांना एक नवाच अन्वयार्थ प्राप्त होतो.

बेडेकरांना केशवसुतांच्या ‘ अध्यात्मा’चा किंवा ‘ धर्मकल्पने ’चा केंद्रबिंदू गवसला तो केशवसुतांच्या ‘ स्वर्गसमक्षते ’च्या कल्पनेत. केशवसुतांच्या या ‘ स्वर्गसमक्षते ’चा व तदनुषंगिक कल्पनाव्यूहाचा वेध त्यांनी प्रथम घेतला तो १९५५ साली, केशवसुतांच्या पन्नासाव्या पुण्यतिथीच्या निमित्ताने. तेव्हापासून ते केशवसुतांच्या जन्मशताब्दीपर्यंतच्या एक तपाच्या काळात केशवसुतांसंबंधी बेडेकरांनी जे चिंतन केले त्याचा परिपाकच एक प्रकारे या पुस्तिकेत उतरला आहे. केशवसुतांच्या काव्यकलेपेक्षा केशवसुतांच्या तत्त्वचिंतनावर या पुस्तिकेत दिलेला भर लक्षात घेता, या पुस्तिकेला ‘ केशवसुतांची काव्यसृष्टि’पेक्षा ’ केशवसुतांची विचारसृष्टी ’ हे नाव अधिक शोभून दिसले असते, असे वाटते.

केशवसुतांच्या या विचारसृष्टीबद्दल किंवा कल्पनाव्यूहाबद्दल, तिच्या पाठीमागील सांस्कृतिक परिवर्तनाबद्दल बेडेकरांना अजून पुष्कळच सांगावयाचे असावे. पण ते स्फुटलेखांच्या कक्षेत बसत नसल्यामुळे ते फार अधुरेपणाने किंवा घाईगर्दीने सांगितल्यासारखे किंवा सुचविल्यासारखे वाटते. त्यामुळे लेखांना पुष्कळदा सैल स्वरूप आले आहे. आपला अभिप्रेत अर्थ बेडेकर केशवसुतांच्या कवितेवर लादत तर नाहीत ना? अशीही एक शंका अधूनमधून वाचकांच्या मनात तरळून जाते. उदाहरण म्हणून ‘ हरपले श्रेय ’ या कवितेवरील विवेचनाकडे बोट दाखविता येईल.

केशवसुतांची ही शेवटची महत्त्वाची कविता; तीतील निराशाप्रधान आशयही उत्कटतेच्या परिसीमेवर [illegible] त्यामुळे या कवितेवर आजवर अनेकांची अ[illegible] भाष्ये झाली, तीतील निःसीम निरा[illegible] करण्याचा प्रयत्न अनेक वाङ्नी झाला; [illegible] कवितेतील निराशेची मीमांसा विस्तृत [illegible] पूर्ण पद्धतीने केली आहे. त्यांच्या [illegible] विवेचन (‘ काळी त्याविण सुचत न[illegible] आहे. [illegible] crack in the heart ’इ. ) मान्य [illegible] कवितेत [illegible] या कवितेतील केशवसुतांची तळ[illegible] ाल सर्वसाधारण निराशेहून फार वे[illegible] णवते; आणि केशवसुतांचे हे दुःख बेडेकर ग[illegible] ाप्रमाणे, प्रतिभावैकल्याच्या जाणिवेतून आलेले आहे असेही म्हणता येईल; पण काही असले तरी ही एक स्फुट भावकविता आहे. केशवसुतांच्या अपघाती मृत्यूमुळे केवळ योगायोगानेच ती केशवसुतांची शेवटची महत्त्वाची निराशाप्रवण कविता ठरली आहे; हे लक्षात घेता, केशवसुतांचे हे निर्वाणीचे व अंतिम बोल होते; असे बोल प्रकट होण्याला तत्कालीन भारतीय परिस्थितीही कारणीभूत होती; केशवसुतांनी पौर्वात्य व पाश्चात्त्य तत्त्वविचारांचे दोर आधीच कापून टाकलेले असल्यामुळे ही निराशा अधिकच गहिरी झाली आहे; वगैरेसारखे जे बेडेकरांचे प्रतिपादन आहे, ते कितपत मान्य होईल याची शंका वाटते. त्यांनी पतंगाच्या व सतीच्या दाखल्याचा लावलेला अन्वयार्थही विवाद्य आहे. विवाद्य अशी आणखीही काही स्थळे या पुस्तिकेतून काढून दाखविता येण्यासारखी आहेत. बेडेकरांनी पत्करिलेली विवेचनाची दिशा लक्षात घेता हे एकप्रकारे अपरिहार्यही आहे. ही दिशा अधिक स्पष्ट व सुगम होण्याच्या दृष्टीने व त्यांची केशवसुतविषयक निष्ठा लक्षात घेता, त्यांनी या विषयावर स्वतंत्र ग्रंथ लिहिल्यास अधिक श्रेयस्कर ठरेल; असे येथे आवर्जून सांगावेसे वाटते.

गो. म. कुलकर्णी

●



अनुक्रमणिका

## संचय

" संचय,- " ले. – **भवानीशंकर श्रीधर पंडित;** १९६६; पृ. २९२, किं. ७ रु. ५० पैसे, विदर्भ–मराठवाडा बुक कंपनी, पुणे.

काही लेखकांची बैठकच ग्रंथकाराची असते, तर काहींची निबंध-लेखकाची. निबंध-लेखक एखादा त्याला जाणवलेला नवा विचारधागा स्पष्ट करीत, सिद्ध करीत [illegible]खन करतो. ग्रंथकाराची बैठक असलेल्या लेखकाने [illegible]गोपात्त स्फुट लेखन केले तरी त्यातही त्याची ती बैठक कधीच [illegible]ते. प्रा. भ. श्री. पंडितांची बैठक साधारणतः त्याची क[illegible]. त्यांच्या " संचय " या स्फुट लेखांच्या [illegible] प्रबंध-लेखकाची शिस्त, हाती घेतलेल्या [illegible] साधनसाहित्य संशोधून, तपासून [illegible] स्ततच्या [illegible]ण्याची रीती, प्रस्तुत विषयाचा [illegible] मांडणी क[illegible] करण्याची वृत्ती दिसते. अनेक अंगोपांगांनी विचा[illegible]र करण्याची वृत्ती दिसते. १९३४ ते १९६५ या त[illegible]स-बत्तीस वर्षांच्या दीर्घ कालावधीत वेळोवेळी काही नि[illegible]ताने लिहिलेल्या चोवीस निवडक लेखांचा हा संग्रह. [illegible] तीस-बत्तीस वर्षांत प्रा. पंडितांचे काव्यलेखन, ललित निबंध-लेखन, ग्रंथलेखन, संशोधन-संपादन यांसारखे विपुल आणि विविध साहित्य-कार्य चाललेले होतेच. त्या सर्व कार्याशी [illegible]मांतर काळात पसरलेले त्यांचे हे स्फुट लेख. त्यामुळे त्यांत त्यांच्या एकंदर लेखनकार्याचे आणि लेखन-प्रकृतीच्या विकासाचे एका प्रकाराने जसे साररूप चित्र दिसते, तसे त्यांचा समशीक्षक म्हणून विकासही त्यातून दिसणे शक्य होते. हे स्फुट लेख आणि त्यांचे इतर ग्रंथलेखन, संशोधन-संपादनकार्य परस्परांस पूरकही ठरतात. ग्रंथ आणि त्याच ग्रंथकाराचे स्फुट लेख यांमधील संबंध हा एक अभ्यासाचा चांगला विषय आहे, त्याचे प्रत्यंतर येथे मिळते. " संचय " मधील मोठा भाग ' कवि व कविता-विषयक लेखांचा ' आहे. प्रा. पंडितांच्या " आधुनिक मराठी कविते "च्या ( प्रका. १९५२ ) पूर्वी लिहिलेल्या लेखांना तो ग्रंथ पूरक ठरतो, तर त्यानंतर लिहिलेले लेख त्या ग्रंथाला पूरक ठरतात. त्यांच्या लेखनातील हा अन्योन्य संबंध लक्षात ठेवून ते वाचल्यास अधिक फलदायी ठरेल.

'काव्य' हा प्रा. पंडितांचा बालपणापासूनच्या आवडीचा, आणि चाळीसाहून अधिक वर्षे अव्याहत व्यासंगाचा विषय आहे. कवि, काव्य–मीमांसक ही त्यांची प्रमुख प्रकृती, " संचया "तील लेख ' कवि व कविताविषयक ', ' इतिहास-विषयक ' आणि ' मनोरंजक ' अशा त्रिविध स्वरूपाचे जरी असले तरी त्यात प्रामुख्य आहे ते कवी व कविता-विषयक लेखांचेच. चोवीसपैकी पंधरा लेख असे आहेत. इतिहासविषयक पाच लेखांपैकीही ' राजकवि भूषण ', ' कवि कलश ' व ' दख्खनच्या वीरांचे हिंदुस्थानी भाट ' हे तीन लेख कवींविषयींच आहेत. हे कवी अलीकडील काळातील नसून इतिहास-काळातील आहेत आणि अ–मराठी असले तरी महाराष्ट्राच्या इतिहासाशी, साहित्याशी निगडित आहेत. केवळ मराठी साहित्याच्या कक्षेतून बाहेर जाऊन परभाषी साहित्याचा ( मराठीच्या संदर्भात ) केलेला विचार हा या लेखांचा विशेष आहे– आणि प्रा. पंडितांच्या टीकादृष्टीचाही तो एक विशेष आहे. मराठी व हिंदी साहित्याचा तुलनात्मक विचार या ओघात घडतो तो अधिक महत्त्वाचा आहे–वेगळी दृष्टी देणारा आहे. स्वतःपासून थोडे दूर जाऊन, त्या व्यापक पार्श्वभूमीवर केलेले स्वतःचे निरीक्षण अधिक यथार्थ असते.

कवि-कविताविषयक पंधरा लेखांतील ( १ ) काही लेख संशोधनपर, फारशा प्रसिद्ध नसलेल्या किंवा काळाच्या आवरणाखाली ज्यांचे कार्य-कर्तृत्व झाकले गेले आहे अशा कवींच्या, संशोधकांच्या ऐतिहासिक महत्त्वाच्या कार्याचा साक्षेपाने परिचय करून देणारे आहेत. परंपरागत मराठी काव्याचा मोहरा नव्या स्वरूपाच्या इंग्रजी वळणाच्या कवितेकडे ज्यांनी वळविला ते ' इंग्रजी कवितेचा मराठी अग्रदूत ' महादेवशास्त्री कोल्हटकर, ' आधुनिक मराठी साहित्याचे नागपुरातले आद्य प्रवर्तक ' हरि माधव पंडित आणि बाभन दाजी ओक, ' काव्यरत्नावलि 'कार नारायण नृसिंह फडणी , अर्वाचीन कालांतील निर्यमक काव्याचे आद्य प्रणेते ' घंटय्या नायडू ' हे अशा प्रकारचे लेख. ( २ ) श्री. रा. बोबडे, आनंदराव टेकाडे या, आज सापेक्षतः दुय्यम ठरलेल्या कवींवर दोन लेख आहेत. साहित्याचा पट प्रमुख साहित्यिकांच्या कर्तृत्वाने भरला जातो. पण, त्या विशिष्ट कालखंडातील सर्वसाधारण प्रवृत्ती जाणून घ्यावयाच्या असतील, तर दुय्यम लेखकांच्या लेखना-कडेच वळावे लागते. त्यांच्या परिचयाशिवाय त्या काळाचे समग्र चित्र पुरे होऊच शकत नाही. प्रा. पंडितांच्या अशा लेखांचे स्वरूप बहुधा व्यक्तिदर्शन आणि काव्यपरिचय असे दुहेरी असते. अशा लेखांत

अनुक्रमणिका

प्रा. पंडितांनी केलेले व्यक्तिचित्रणही रेखीव आणि वेधक असते. ( ३ ) तिसरा गट आधुनिक सिद्ध-प्रसिद्ध कवींवरील लेखांचा. यातही ( अ ) ' रेव्हरंड टिळकांचे नागपुरातील वास्तव्य ' आणि ' केशवसुतांचे गांवी गेलेले मित्र ' ( रे. टिळक ) हे दोन लेख संशोधन-स्वरूपाचे, घटनानिश्चितिपर असेच आहेत. ( ब ) गडकऱ्यांचा पिंड मूलतः कवीचा होता असे प्रतिपादन करणारा लेख ' भावकवि गोविंदाग्रज, ' ' महाकवि सावरकरांचे कवित्व, ' ' प्रणय-पंढरीचा वारकरी ' माधव जूलियन या लेखांत त्या त्या कवींच्या व्यक्तित्वाचा आणि कवित्वाचा विस्तृत परिचय करून दिलेला आहे, तसाच त्यांच्या काव्याचा परामर्श घेतला आहे. काव्य-समीक्षक पंडितांचे दर्शन घडते ते अशा लेखांतून. ' प्रणय-पंढरीचा वारकरी ' या लेखात, आंतरिक सौंदर्याची ओढ असणारे ' प्रेम ' आणि बाह्य विभ्रमांचे आकर्षण असणारा ' प्रणय ' असा भेद करून माधव जूलियनांच्या कवितेचे त्यांनी जे विश्लेषण केले आहे, ते विचार करण्यासारखे आहे. तथापि ' तांब्यांचा शृंगार प्रेमपर होता, तर पटवर्धनांचा शृंगार प्रणयपर होता ' ( पृ. १७५ ) एवढे म्हणून हे विधान पुरे होण्यासारखे नाही. तांब्यांची प्रीती ही सात्त्विक, निरागस असली तरी ती संपूर्णतः सांसारिक, ऐहिक होती. ती आत्म्यापर्यंत जाणारी असली तरी शरीरातूनच जाणारी होती, शरीर नाकारणारी नव्हती. माधव जूलियनांच्या कवितेत अनेक ठिकाणी शारीर ओढ असली, विभ्रमांचे मोहून जाऊन केलेले वर्णन असले तरी अनेकदा ती ' देऊं नको तूं चुम्बनें, देऊ नको आलिङ्गनें, देऊं नको तूं दर्शनें, मी धर्म माझा आचरीं ' असे म्हणून मनोमयी प्रीतिपूजेत दंग होऊन जाते. तांब्यांच्या आणि माधव जूलियनांच्या प्रीतीची जातच अगदी निराळी आहे, आणि तोवरच्या मराठी मनाला तरी माधवरावांची प्रीतीची जात अनोखीच राहिली. स्वतः पंडितांनीच पुढच्याच परिच्छेदात माधवरावांच्या मनावर ' प्लेटॉनिक लव्ह 'च्या कल्पनेचा पगडा होता असे म्हटले आहे. पंडितांच्या विवेचनातील ' प्रणय ' ( Romance) आणि ' प्लेटॉनिक लव्ह ' ' या दोन्ही कल्पना एकत्र अस्तित्वात असू शकतील का ? " विरहतरंगा "च्या विवरणातही ' हे काव्य कथाकाव्य मानण्यात येत असले तरी वस्तुतः ते भावकाव्य आहे ' ( पृ. १८० ) हे विधान " विरहतरंगा " च्या स्वरूपावर चांगला प्रकाश टाकणारे आहे. पण " विरहतरंग " आणि ' मेघदूत ' यांची त्यांनी जी तुलना केली आहे ती वरीचशी चुकीच्या पायावर केल्यासारखी वाटते. " विरहतरङ्ग " हे नांवच मूळात अपुरे, फार ढोबळ आहे, त्यामुळे अशा तुलना संभवतात. " विरहतरंग " हे केवळ विरहकाव्य नव्हे. प्रीतिविषयक दोन भिन्न भूमिकांचा संघर्ष, आणि त्यांतून अंती नायकाचे मानसिक परिवर्तन, प्रीति-विषयक कल्पनेचे उन्नयन हा त्यामधील एक महत्त्वाचा आशय आहे. तो लक्षात घेतल्यानंतर त्याची " मेघ-दूता "शी तुलनाच वस्तुतः अस्थानी ठरते. कविवर्य तांब्यांविषयी तर पंडितांना विशेष आत्मीयता. ' तांब्यांचे मार्गदर्शन ' या लेखात त्यांनी काव्यरसाच्या बैठ[illegible]ति रंगलेल्या तांब्यांचे समीप-दर्शन घडवले आहे[illegible]तःचे दर्शनातून सहजी तांब्यांच्या काव्यविषयक भू[illegible]मजावून ओळख होते. कवीचा असा अनौपचारिक, [illegible] पात्रे परिचय करून देणारे लेख मराठी[illegible]ळ विचार आहेत. त्यात हा लेख उठून दिसणारा आहे. ( ४ ) हरिभाऊ आपट्यांवरील किंवा अण्णासाहेब किर्लोस्करां-वरील लेख, टिळक-आगरकरांच्या वाङ्मयीन परंपरा सांगणारा लेख हे या विभागातील लेख आजच्या काटेकोर अर्थाने कवि-काव्यविषयक लेखात न बसणारे. ' हरिभाऊंचे कादंबरी-लेखनाचे तंत्र ' या लेखात त्यांनी हरिभाऊंच्या सहसा उपलब्ध न होणाऱ्या " करमणुकी "-तील निवेदनांवरून त्यांच्या कादंबरी-लेखनामागील बैठक अधिक स्पष्ट केली आहे. हरिभाऊंच्या कादंबरी-लेखना-तील पाल्हाळासारख्या तथाकथित दोषांवरील त्याच त्या चर्वित–चर्वणेला वेगळी दिशा देऊ शकेल अशी ही निवेदने आहेत. हरिभाऊंच्या कादंबऱ्या अपूर्ण राहण्यास त्यांचे सार्वजनिक जीवन कारण झाले असे प्रा. पंडित म्हणतात ( पृ. ९८ ) पण कदाचित त्या-मुळेच त्यांचे वाङ्मयीन व्यक्तिमत्त्व अधिक समृद्ध आणि जिवंत झाले असण्याचा संभव आहे याकडे दुर्लक्ष करता येणार नाही. 'मराठी रंगभूमीचे जनकः अण्णासाहेब किर्लोस्कर या ' या लेखातील ' भाव्यांच्या 'आख्यानां'चे मराठी रंगभूमीशी व मराठी नाटकाशी अगदी साम्य नाही' ' मराठी रंगभूमीचा व मराठी नाटकाचा जन्म इ. स. १८४३ साली झाला असा जो महाराष्ट्रात समज आहे तो वस्तुतः बरोबर नाही' ( पृ. ६४–६५ ) ही त्यांची विधाने रूढ समजुतीपेक्षा वेगळी आणि विचार करायला लावणारी आहेत.

अव्वल इंग्रजीपासून रविकिरण मंडळापर्यंतच्या काळातील मराठी साहित्याचे-विशेषतः काव्याचे धावते चित्र या सर्व लेखांतून उभे राहते. विशेषतः मराठी वाङ्मयाच्या इतिहास-लेखकाला या लेखांतील संशोधनाचे चांगले साहाय्य होते. मराठी काव्याचा अभ्यास करणारांसही ते साहाय्यक ठरतात.

" संचय"च्या दुसऱ्या विभागातील पाच लेख इतिहासविषयक आहेत. याही लेखांचे स्वरूप अभ्यासपूर्ण निबंधांचेच आहे. ज्या विषयावर लिहावयाचे त्याविषयीचे प्रकाशित, उपलब्ध सर्व साहित्य संशोधून, तपासून त्या विवेचनाला शक्य तितकी पूर्णता, सर्वांगीणता आणण्याची पंडितांची प्रवृत्ती याहि लेखांतून दिसते.

...ऱ्या विभागातील चार लेख मनोरंजक, ललित ...या स्वरूपाचे असले, तरी तेही मराठी वाङ्मय, ...संबंधीच असल्याने " संचया"त उपरे वाटत ...लेखांमध्ये तपशील, उदाहरणे भरपूर असतात. त्यातून प्रा. पंडितांची बहुश्रुतता, जागरूक निरीक्षण यांचा प्रत्यय येतो. या एकूण लेखसंग्रहातूनच प्रा. पंडितांचा अभ्यास केवळ मराठी साहित्यापुरताच मर्यादित नसून त्यांना इतिहास, लोकजीवन यांसारख्या जीवनाच्या वेगवेगळ्या अंगांचे स्वाभाविक कुतूहल आहे याचा प्रत्यय येतो. हे कुतूहल व्यक्तिमनाच्या जिवंतपणाची खूण असते. लिखित साहित्यच नव्हे, तर मौखिक वाङ्मय हाही त्यांच्या हौशी अभ्यासाचा विषय झाला आहे. ' निरक्षरांचे वाङ्मय ', ' बाळबोल ' यांसारखे लेख लोकवाङ्मयाच्या अभ्यासकांना उपयोगी पडणारे आहेत. ' बाळबोला 'मध्ये काही मराठी गीतांचे अन्य-भाषी गीतांशी साम्य दाखवून त्यातून प्रा. पंडितांनी भारतीय एकात्मतेचे जे संक्षेपाने दर्शन घडवले आहे, त्या दिशेने आणखी शोध घ्यावयाला हवा. ही एकात्मता बाहेरून साधलेली, प्रचारी नसून भारतीय मनाच्या अंतरंगातूनच सहजपणे प्रतीत होणारी आहे. या एकात्मतेचे भान होणे हे खरे महत्त्वाचे आहे, आणि ते होते ते अशा वेगवेगळ्या प्रांतांतील लोकवाङ्मयामधूनच. ' इंग्रजी राजवटीतील नवीन भाषिक संकेत ' या निबंधातून, मराठी जीवनाच्या विविध अंगांवर इंग्रजसहवासाचा प्रभाव किती पडला आहे, आणि त्याचा परिणाम मराठी भाषेवरही, तो वेगळा कळूदेखील नाही इतक्या खोलवर कसा झाला आहे ते लक्षात येते. भाषा आणि लोकजीवन यांचा किती अनन्य संबंध असतो ते येथे अनेक उदाहरणांतून सहज दिसून येते.

प्रा. पंडितांच्या बहुतेक सर्वच लेखनाला संशोधन-मूल्य विशेष असते. त्यात ऐतिहासिक माहिती, संशोधनाचा भाग अधिक असतो. वेगवेगळ्या ठिकाणचे संदर्भ शोधून, त्यातील संगती समजावून घेऊन त्यांनी विवेचन केलेले असते. लेख-विशिष्ट व्यक्ती किंवा घटना यांच्याबरोबरच त्यांच्याशी संबद्ध असेही अनेक संदर्भ त्यांना सहज आठवतात. लेखविषयाबरोबर इतरही व्यक्ति-घटना यांच्यासंबंधीची त्यांच्याजवळ असलेली दुर्मिळ माहिती ते लिहिण्याच्या ओघात देऊन जातात. संकलन, संशोधन आणि समालोचन अशी त्रिविध दृष्टी प्रायः त्यांच्या सर्वच लेखांत असते. माहितीचा भरगच्चपणा व विविधता, बिनचूकपणा, काटेकोरपणा, सत्याचा आग्रह, अभ्यासातील सच्चेपणा, भरपूर परिश्रम हे त्यांच्या लेखनाचे, आज दुर्मिळ होत चाललेले ( आणि कदाचित् म्हणूनच थट्टेचाही विषय होऊ घातलेले ) विशेष आहेत. त्यांच्या लेखनात संशोधनाची शिस्त आहे, तशीच संशोधनाला आवश्यक अशा कल्पकतेचीही जोड आहे. ऐतिहासिक दृष्टी आणि जरूर तो तपशील पुरवण्याची कोशीस त्यांच्या लेखांत असते. या बाबतीत त्यांची परंपरा जुन्या पिढीतील साक्षेपी अभ्यासकांशी जुळणारी आहे. अभ्यासाशिवाय ते लिहीत नाहीत. त्यात फाल्तु फुगवटा सहसा असत नाही. ( कधी थोडी आलंकारिक लिहिण्याची, शब्द-नाद-अर्थचमत्कृती साधण्याची हौस दिसते, ' वराहमांसप्रियता ' ( पृ. २७४ ) ' मिशांना अस्त्राय फट करून ' ( पृ. २८० ) अशा-सारख्या शब्द-गंमतीही कधी दिसतात. हेही त्यांचा मागल्या पिढीतील समीक्षकांशी दुवा जोडणारेच आहे. )

अशा स्फुट लेखांचे महत्त्व कधी, त्यातील प्रतिपादन परिचित व मान्य झाल्याने कालांतराने लक्षात येईनासे होते. ज्या काळात ते लेख प्रथम लिहिले-प्रसिद्धिले गेले त्या काळात ते अधिक असते. अशा लेखांचे मूल्य ठरवताना ही ऐतिहासिक पार्श्वभूमी लक्षात ठेवणे लेखकाच्या दृष्टीने आवश्यक असते. ' अर्वाचीन काळातील निर्यमक काव्याचे आद्य प्रवर्तक ' हे. घंटऱ्या नायडू यांचे विशेषण आता सर्वपरिचित झाल्याने तेवढ्यापुरता त्यांच्यावरील लेख इतिहासजमा ठरतो. तरी प्रा. पंडितांचे त्या मागील श्रेय मान्य करावे लागतेच. या विशिष्ट लेखातील काही माहिती आजही नवी वाटणारी आहे.

वेगवेगळया काळांत लिहिलेल्या लेखांत अनवधानाने काही विसंगती राहून जाण्याचा संभव असतो. लेखकाच्या भूमिकेतील बदल किंवा विकास समजून घेताना, असे लेख त्याच मूळ स्वरूपात संकलित होणे इष्टही ठरते. [ अशा लेखसंग्रहांचे वाचन विषयनिष्ठ असावे की लेखकनिष्ठ असा प्रश्न या ठिकाणी निर्माण होतो. अशा दोन निष्ठांपैकी जी स्वीकारली जाईल त्यावरही लेख संग्रहाचे स्वरूप ठरते. ] ' रंगनाट्य, पटनाट्य आणि नभोनाट्य ' या १९५१ साली लिहिलेल्या लेखात भोरप्याची बहुरूपे, नकला, लीळा, ललिते, तमाशे या अडाणीपणाच्या अवस्थांतून आजच्या ज्ञानमय अवस्थेत रंगमंचावरील नाट्य हा प्रकार उत्क्रांत झाला आहे असे विधान आले आहे. ( पृ. २६६ ) पण १९६३ मध्ये दिलेल्या ' मराठी रंगभूमीचे जनक : अण्णासाहेब किर्लोस्कर ' या व्याख्यानरूप लेखात बहुरूप्याची विविध वेषांतरे, कळसूत्री बाहुल्यांचे खेळ, दशावतारांची सोंगे, गोंधळ, तमाशा या मनोरंजक ग्रामीण प्रकारांशी रंगभूमी आणि नाट्य यांचा अर्थाअर्थीही संबंध नाही असे निक्षून म्हटले आहे. ( पृ. ६१-६२ )

अशा स्फुट लेखांच्या संग्रहात पुनरुक्ती येण्याचाही संभव असतो. अशी पुनरुक्तीही अनेकदा लेखकाची भूमिका आकलण्यासाठी साहाय्यक ठरते. या ठिकाणी लेखांचा क्रम कशा पद्धतीने ठरवावा हाही एक प्रश्न उभा राहतो. वेगवेगळ्या लेखांतील संबंध ध्यानात येण्यासाठी लेखनकालानुक्रम संभाळणे इष्ट ठरते. त्यातून लेखकाचीही विकसत जाणारी सलग भूमिका जाणवत राहते. या संग्रहात जर लेखनकालानुक्रमाने लेखांची मांडणी असती तर प्रा. पंडितांच्याच पूर्वीच्या एखाद्या लेखात त्यांच्या नंतरच्या लेखाचे बीज कसे होते ते समजले असते. पृ. १०१ वर त्यांनी ' पंडित व ओक या थोर व उदार साहित्य-सेवकांची स्मृति, आजच्या नागपूरकरांना नसावी यापरतें दुर्दैव तें कोणतें ! ' असे खेदोद्गार काढले आहेत ( लेखनकाल–? ). पुढे स्वतः प्रा. पंडितांनीच नागपुरातल्या या दोघा आधुनिक मराठी साहित्याच्या आद्य प्रवर्तकांवर विस्ताराने लिहून ( क. २,१९६३ ) पूर्वीच्या खेदोद्गारांचे निराकरण केले आहे. " संचय " मधील लेखानुक्रम विषयानुरोधाने ठेवला आहे. अशा क्रमाचेही सूत्र असू शकते, तेही सोईस्कर ठरू शकते, असे या संग्रहापुरते दिसते. –पण, या क्रमाबरोबरच लेखनकालानुसारही जर अनुक्रम एकत्रपणाने परिशिष्टांत तरी दिला असता, तर आरंभीचाही हेतू काही प्रमाणात साधू शकला असता.

' संशोधन ' म्हणजे केवळ ' जुन्या साहित्याचे नवे संशोधन ' नव्हे. अव्वल इंग्रजीनंतरच्याही साहित्यात संशोधनाला भरपूर वाव आहे, इतकेच नव्हे तर त्याची निकड आहे. केवळ ऐतिहासिक दृष्टीपुरते पाहिले तरी, या काळातील कित्येक साधने नाहीशी होत चालली आहेत. ती अजिबात लुप्त होऊन, मग त्यांच्या संशोधनाला प्रारंभ करण्यापेक्षा आजच त्यांचा अधिकात अधिक उपयोग करून घेतला पाहिजे एवढे जरी या संग्रहामुळे पटले तरी मोठे कार्य साधले असे म्हणता येईल. अशा दुर्लक्षित साधनांतील प्रा. पंडितांनी स्वतःचे विशेष करून शोध व उपयोग करून घेतला. समजावून जुन्या नियतकालिकांचा. त्यांच्या [illegible] पात्रे महत्त्वाचा विशेष झाला आहे. मराठी [illegible] निवळ विचार केवढे तरी धन अजून नियतकालिके बाहुली ठरतात. अडकून राहिले आहे, नाहीसे होण्याच्या बेतेमळीच त्यांचा शोध घेऊन ते प्रकाशात आणणे आता निकडीचे काम होऊन बसले आहे. वा. ल. कुलकर्णी यांच्या " मराठी ज्ञानप्रसारका "प्रमाणे इतरही प्रमुख नियतकालिकांचा तसा अभ्यास होणे तर अगत्याचे आहेच; पण " विविधज्ञानविस्तार ", " करमणूक ", " मनोरंजन " आदी अनेक नियतकालिकांचे संपादन-संकलनपूर्वक, विविध खंडांतून पुनःप्रकाशन होणे जरूर आहे. प्रा. पंडितांनी नियतकालिकांचे केलेले संशोधन व त्यांचा करून घेतलेला उपयोग बघितला म्हणजे अशा कामाचे महत्त्व आणि त्वरा अधिकच वाटायला लागते. खुद्द प्रा. पंडितांनीही आपल्या या संशोधनाचे एकमुखी फलित ' मराठी नियतकालिके व त्यांचे साहित्यकार्य ' ' अशासारख्या लेखातून विस्ताराने, सांगोपांग उपलब्ध करून द्यावे अशी अपेक्षा हे लेख वाचीत असताना विशेष तीव्रपणाने उत्पन्न होते. नियतकालिकांबरोबरच इतरही बऱ्याच जुन्या, दुर्लक्षित साधनसाहित्याचा, पुस्तकांचा प्रा. पंडितांनी भरपूर उपयोग करून घेतला आहे.

अशी साक्षेपाने माहिती संपादित केल्यानंतरही त्यात क्वचित काही त्रुटी, अपुरेपणा राहून जाणे शक्य असते.

घंटय्या नायडूंच्या "मैना" काव्यावरील अभिप्राय वामन दाजी ओक यांचा असावा असा प्रा. पंडितांचा अंदाज आहे. (पृ. ५१,८७). तथापि 'विविधज्ञानविस्तारा'च्या पन्नास वर्षांतील लेखांच्या सूचींत (वि. ज्ञा. वि., व ६८ अं. २) हा अभिप्राय वि. मो महाजनि यांच्या नावे नोंदविलेला सांपडतो. 'पावनखिंडीच्या रोमहर्षण प्रसंगावर मराठी काव्य नाही' असे १९३९ मध्यें म्हणताना (पृ. २३६) त्यांना गो. रा. हिंगणेकरांच्या "पावनखिंडी"चे (प्रका. १९२७) किंवा सावरकरांच्या बाजीप्रभूवरील गाजलेल्या पोवाड्याचे विस्मरण झाले असावे. हरि माधव पंडितांवरील लेख वाचताना, तलगू ज्ञानकोशाचे जनक के. व्ही. लक्ष्मणराव यांच्यासारख्या त्याचो ...तांयाने 'कै. गुरु हरि माधव पंडित यांचे कनिष्ठ संग्रहा... असा स्वतःचा साभिमान निर्देश "पंचवटीस्थलविषय..." या आपल्या पुस्तकाच्या आरंभी करावा विस्ता... मांडोत.

अनेक अंगांनीही ... अभ्यासास साधनीभूत होणाऱ्या असतात. त्यातून निरीक्षण ग्रं...कात, किरकोळच नव्हेत, तर अर्थघातक अशुद्ध राहावीत याचा विषाद, अधिकच वाटतो. 'अस्वाभाविक' ऐवजी 'स्वाभाविक,' 'सापेक्ष' ऐवजी 'साक्षेप,' 'श्लिष्ट' ऐवजी 'क्लिष्ट', 'बीज' ऐवजी 'वीज', 'वाहियेले' ऐवजी 'वाहियेले', 'मरोनि' ऐवजी 'मरोनि', 'जागें' ऐवजी 'जावें', 'मन' ऐवजी 'मत' असे एक ना अनेक मुद्रणदोष वाचता वाचता ठेचकळायला लावतात. 'शब्दहि [समर्पक ?] आहेत' (पृ. २७), 'गव्जलात [सूर्याच्या ?] उदयाचे' (पृ. १८६) अशा ठिकाणी शब्दही गळून जातात. 'पुढील खेदोद्गार काढले आहेत' (पृ. १००) असे म्हणूनही पुढे ते खेदोद्गार वाचायला न मिळाल्याने वाचणाऱ्यालाच खेदोद्गार काढायची वेळ येते. 'टेनिसनच्या — या संतापजनक ओळीचा उल्लेख येतो, पण त्या ओळी प्रत्यक्षपणे येतात पुढच्या पानावर मध्येच, वाक्याचा संदर्भ तोडून. पृ. ७६ वर ज्या घटनेचा उल्लेख 'चार तपे' असा बरोबर केला आहे, त्याच घटनेचा पुढे पृ. ७८ वर 'तीन तपे' असा उल्लेख होतो. अशा पुस्तकात अशा प्रकारच्या चुका राहू नयेत असे वाटते म्हणूनच त्यांचा एवढा आवर्जून उल्लेख करावयाचा.

प्रा० पंडितांच्या अभ्यासपूर्ण लेखांनाहि आज अभ्यसनीयता आलेली आहे. मराठी साहित्याची जवळजवळ गेल्या अर्धशतकाची वाटचाल सहृदय स्नेहभावाने आणि डोळस साक्षेपाने बघणाऱ्या या ज्येष्ठ पिढीतील अभ्यासकाच्या आजपर्यंतच्या इतरही असंगृहीत लेखांची यादी या संग्रहासमवेत उपलब्ध झाली असती तर ती इतर अभ्यासकांना उपयोगाची ठरली असती.——केवळ या संग्रहापुरते पाहिले तरी यांतील गोविंदाग्रज, सावरकर, बोवडे यांसारख्या कवींवर त्यांनी एकापेक्षा अधिक वेळा लिहिले आहे. त्या त्या लेखक-कवींवरील असे सर्व लेख मिळूनच प्रा० पंडितांचे त्यांच्यावरील विवेचन पूर्ण होते. निदान अशा लेखांचे संदर्भ तरी त्या त्या लेखाबरोबर मिळाले असते तरी बरे झाले असते. अजूनही कोणत्या तरी मार्गाने त्यांच्या एकंदर लेखनाची यादी उपलब्ध झाली तर ती हवी आहे. विद्यार्थ्यांच्या जागरूक आणि परिश्रमी वृत्तीने मिळेल तेथून माहितीच्या कणांचा 'संचय' करून सिद्ध केलेला हा संग्रह इतर अभ्यासकांनाही उपयोगी पडणारा आहे.

**सु. रा. चुनेकर**

●

## शान्ताचिया घरा

**ले. शान्ताराम आठवले**, गायत्री प्रकाशन, १६१३ सदाशिव, पुणे ९; कि. १२ रुपये

कवी शान्ताराम आठवले यांनी लिहिलेल्या स्फुट लेखांचा हा संग्रह आहे. काहीं लेख गुज गोष्टींच्या स्वरूपाचे आहेत. काही व्यक्तिचित्रे तर काही रसग्रहणात्मक निबंध असेही आहेत. परंतु लेखांचा घाट असा निरनिराळा असला तरी सर्वांतून एक सश्रद्ध विवेकी अंतःकरण प्रतिबिंबित झालेले दिसते. आठवले हे मराठी संतांच्या अमृतवाणीने अत्यंत प्रभावित झालेले आहेत. ज्ञानेश्वर, तुकाराम, एकनाथ यांच्यावरील या संग्रहात आलेले लेख या दृष्टीने मननीय ठरतील. आठवले हे मूळचे कवी आहेत आणि आता साक्षात्काराच्या मार्गातले साधक आहेत. पण त्यांच्या नव्या भूमिकेतही त्यांची काव्यप्रतिभा त्यांना यत्किंचित सोडत नाही असे दिसते. या संग्रहाला रसाळपणा आला आहे तो याचमुळे. मनुष्याची बुद्धी कांही मर्यादेपर्यंत पोचते. या पलीकडील गूढ व अनंत प्रांत हा अंतःस्फूर्तीचा आहे, आत्मज्ञानाचा आहे. भारतात या प्रांताविषयी फार खोल व चौफेर असा

विचार आजवर झालेला आहे. आठवले यांनी उपनिषदापासून आजच्या साक्षात्कारी पुरुषांपर्यंत अनेक महर्षींच्या संदेशाचा व अनुभवाचा मागोवा घेत मानवी शक्तीचे अपार सामर्थ्य सविस्तर वर्णिले आहे. विशेषतः नादब्रह्माच्या विश्वतोमुख रूपाचे व प्रार्थनेचे वर्णन केवळ अद्‌भुत आहे असे म्हणता येईल ' शान्ताचिया घरा ' अशा रीतीने ' अद्‌भुत ' रस पाहुणा आला आहे. प्रार्थना आणि संगीत या विषयावरील त्यांचे विचार विवेकवादी मंडळींनाहि पटायला हरकत नसावी. ' पतिव्रता ' या सारखी प्रकरणे विशेष हृद्य आहेत. ज्ञानेश्वरमहाराजांनी पतिव्रतेचे उपमान किती विविध संदर्भांत वापरून हा विषय दिव्य भव्य केला आहे याचे वर्णन आठवले करतात. ज्ञानेश्वरीचा अभ्यास करण्याची ही एक सुंदर पद्धती आहे. असे घाट काढण्यात आले तर या लोकोत्तर ग्रंथाचा सुवर्णमेरू चढून जाणे अशक्य होणार नाही.

या संग्रहातील निबंधात्मक प्रकरणापेक्षा व्यक्तिचित्रांचा भाग अधिक हृदयस्पर्शी वाटतो. ' एक जगावेगळी साधना ' हेच प्रकरण पाहा. यात रस्त्यातील केळांच्या साली उचलून टाकणाऱ्या आणि अशा रीतीने अगणित संभाव्य अपघातांचे मूळ दूर करणाऱ्या लोकसेवकांचे वर्णन फारच हृद्य वाटते. कर्मयोगात अध्यात्माला प्रत्यक्ष आकार येतो. त्यामुळे त्याचे स्वरूप कळणे सामान्य माणसाला शक्य होते. ' विश्वोद्धारक प्राणशक्ति ' हा लेख असाच उपयुक्त आहे. मात्र त्यातील माहितीचा अनुभव घेऊन पाहिला पाहिजे. कित्येक असाध्य रोग झाडपाल्याने बरे झाल्याचे अनुभवसिद्ध आहे. मात्र संशोधन झाले पाहिजे. आठवल्यांच्या विवेचनात नेमकेपणा आहे; पण विस्तार पुष्कळदा कमी पडतो. श्रद्धा म्हणजे अंधश्रद्धा नव्हे हे खरे. आणि बुद्धीच्या अतीत असते ते बुद्धिविरोधी असलेच पाहिजे असे मुळीच नाही. पण अध्यात्म किंवा साक्षात्कार असल्या सूक्ष्म व गूढ विषयावर लिहिताना लेखकाने आपले निर्णय सांगताना ठाम सिद्धान्त मांडण्याऐवजी अशा खुबीने प्रवचन करावे की, वाचकांना ते निर्णय स्वतः शोधून काढल्याचा आनंद मिळावा. प्रस्तुत प्रकरणात श्रद्धा व ज्ञान यांची बैठक असली तरी ही कला काहीशी कमी पडली आहे. मात्र यातल्या सिद्धांतांशी जे प्रथमपासूनच सहमत आहेत त्यांना हे पुस्तक विशेष रुचकर वाटेल. किंमत सामान्य वाचकांना न पेलणारी आहे.

**गोपीनाथ तळवलकर**

## स्वर्गकन्या

**ले. कुमार धनवडे,** वांसरी प्रकाशन, २५८ गडमुडशिंगी, कोल्हापूर किं. दहा रुपये

कोल्हापुरच्या बाजूस पाचगहा इयत्ता शिकलेल्या एका सामान्य शेतकऱ्याने हे पुस्तक लिहिले आहे. हा एक चमत्कार म्हणावा लागेल. पुस्तकाची लालित्यपूर्ण भाषा, कल्पकतेची चमक, तत्त्वज्ञानाची बैठक सारे काही एखाद्या विदग्ध पंडितास शोभण्यासारखे आहे. यावरून प्रतिभेचे देणे कुठेही सापडू शकते हाच जुना सिद्धान्
पुन्हा एकदा प्रस्थापित झाला आहे. स्वर्गकन्या ही
आहे ? ही एखाद्या पुराणाची किंवा कादंबरीची .त
नाही. लेखकाच्या हृदयात प्रकट होऊन अंतःचे
' अद्वयानंद वैभव ' मिळवून दिले. कुमार मजावून
या वाङ्मयात जिब्रान, टागोर, येशू, पा
अनेक रससिद्ध कवींचे आणि प्रेषितांच्या निवळ
जातात. पण या थोर विचारवंतांनी ले... बाहुल्या
मशागत केलेली असली तरी अनुभूती ... इ.
स्वतःची आहे. हा लेखक विवेक किंवा चिकित्सन
माध्यमातून अध्यात्माकडे गेलेला नाही. ...ची
साक्षात्कार होऊन त्याला अध्यात्म दिसल्याची
विकास न वाटता अकस्मात झालेले ... या
आणि म्हणूनच या प्रकरणांना इतके ...
देखणेपणा आला आहे. व्यक्तिमत्त्वच वेटे

वर ज्या महापुरुषांचा उल्लेख के
संयम मात्र यात अभावाने दिस...ध्ये कादंबरीकाराने
या विषयावर सबंध एक पान ...ण करण्यासाठी शस्त्रास्त्रे,
आहेत. पण काही ...क्षी इत्यादिकांची मोठया
म्हणून सांगितलेल्या ...आहेत आणि गंगाजमनी शब्द
भासात्मक असते. आ...ल कित्येक ठिकाणचे निवेदन
जमेस धरूनही विरोधा...ये चांगलेच यश मिळविले आहे.
सौंदर्याला सारखे ...केतिक आहेत. खांडेकरी पद्धतीच्या
विस्तार, कित्येक... अभावी विचक्षण वाचकांचा
ठिकाणचे विरोध...त्या ' मना 'वर कादंबरीकाराने १००
स्वरूप निःसंशय...या केल्या आहेत. त्यांचा तोंडवळा कुठेही
पण ले... ...मरा शिळ्या कढीला ऊत आणण्याचा
तिरेक अ... ' भावकथा ' साकार करताना मूळ महा-
आहे ... कथेमध्ये कादंबरीकाराने जे बदल केले आहेत,
पाला...

निःसंशय अभिनंदनीय आहे. संयम अनुभवानेच येतो. पण कलाकृतीला अधिक चिरस्थायी करायला तो आवश्यक असतो हे विसरून चालणार नाही. प्रस्तुत पुस्तकात मैत्री, मृत्यू, मौन, सौंदर्य याबद्दल आलेले विचार केवळ मननीयच नव्हेत तर फार रमणीयही आहेत. त्यात अध्ययन व अंतःस्फूर्ती यांचा उत्तम मिलाफ आहे. या पुस्तकाने संतुष्ट होऊन वाचक लेखकाच्या पुढील पुस्तकाची मार्गप्रतीक्षा खात्रीने करीत राहील.

**गोपीनाथ तळवलकर**

●

**नय**

**श्री. शिवाजी सावंत**, प्रकाशक. अ. अं.
विस्त... मांटिनेंटल प्रकाशन, टिळक रोड, पुणे २,
अनेक अं...
असतात. त्यात
निरीक्षण ...जी सावंत यांची 'मृत्युंजय' ही कादंबरी
अशुद्ध ...ल्यापासून अनेक कारणांमुळे चर्चेचा विषय
'अस्वाभा... त्यांच्यासारख्या अगदी कोऱ्या करकरीत
'साक्षेप,' ...काने एकाएकी धूमकेतूप्रमाणे एवढी प्रचंड
'वाहियेले' ऐ...त्री, ती तितक्याच चांगल्या रीतीने प्रसिद्ध
'जागें' ऐव...चेच साऱ्यांना फार मोठे आश्चर्य वाटले
अनेक मुद्रणदोष ...डे स्वरूप पाहिल्यामुळे कोणाला ती
'शब्दहि [ समर्पक ...], तर तिच्यातील वैशालीसारख्या
[ सूर्याच्या ? ] उदया...णाला महाभारत समजल्यासारखे
शब्दही गळून जातात. ...गदीच सामान्य, भयंकर कृत्रिम
( पृ. १०० ) असे म्हणून...ी' नंतर हिंदी चित्रपटकथेचा
न मिळाल्याने वाचणार... ...णारी ऑल इन वन टाईप
येते. 'टेनिसनच्या ...र एका चाणाक्ष वाचकाने
येतो, पण त्या ...काने खपासाठी बहुजन-
वर मध्येच ...लिहिल्याचेही ठामपणे
घटनेचा ...र तर्प' असा...च कादंबरीने इतक्या
त्याच घटनचा पुढे पृ. ७८ वर 'तीन...त ह्यांनी ज्याअर्थी
होतो. अशा पुस्तकात अशा प्रकारच्या...चसे काही विशेष
असे वाटते म्हणूनच त्यांचा एवढा
करावयाचा. ...ी शोकांतिका

प्रा॰ पंडितांच्या अभ्यासपूर्ण लेखांन...चित्रणांमध्ये
अभ्यसनीयता आलेली आहे. मराठी साहित्या...व्यासाने
...दायत्तं तु

पौरुषम्' असे गर्जून सांगणाऱ्या पराक्रमी कर्णाला देखील शेवटी दैवायत्तं कुले जन्मः या कल्पनेवर मात करता आली नाही. व्यासाच्या प्रतिभेचे सामर्थ्य असे की, त्यांनी परिस्थितीमुळे कर्णाची शोकांतिका झाली, असे दाखविले नसून परिस्थिती अनुकूल असतानादेखील शेवटी कर्णच आपल्या अनेकविध आंतरिक दोषांमुळे कमी पडला असे दाखविले आहे. व्यासांसारख्या अलौकिक कलावंताची ही 'किमया' आता गेल्या काही वर्षांतील वर्णभेदाच्या जाणीवेमुळे रसिकास्वादक्षम राहिली नाही. त्यामुळे कर्णाचे जीवन पांडवांच्या मानाने यातनामय, वंचित आणि उपेक्षित आहे, या कल्पनेने झपाटून श्री. सावंतांनी ही कादंबरी लिहिलेली आहे. ऐतिहासिक किंवा पौराणिक कलाकृती ही ज्या कालात लिहिली जाते, त्या कालाचे प्रतिबिंब ती मोठ्या प्रमाणात घुमवीत राहते. कलावंताकडून अपेक्षा मात्र अशी असते की त्याची कला ही ऐतिहासिक आणि पौराणिक कलाकृतीच्या बाबतीत वर्तमानकालसापेक्षतेचा दोष न पत्करता ती ज्या कालखंडाचे चित्रण करते, त्या 'भूतकालसापेक्ष' उतरावी. पण ही जबाबदारी फार मोठी आहे. ते सतीचे वाण आहे. श्री. सावंतासारख्या नवख्या लेखकाकडून ती आजच अपेक्षिणे त्यांच्यावर खासच अन्याय करण्यासारखे आहे.

पुराणकथांचे विश्व ज्या वेळी आधुनिक युगात विश्लेषिले जाते, त्यावेळी साहजिकच दोन निरनिराळे मार्ग विचारवंतांसमोर उभे राहतात. पुराणकथांचे सारे संकेत जसेच्या तसे मान्य करून त्याबद्दल कसलीही शंका न घेता पारंपरिक दृष्टिकोणातून कलाकृती सादर करावयाची हा पहिला राजमार्ग. आतापर्यंत आपल्या देशातील सर्वप्रकारच्या ललित-वाङ्मयामध्ये हा धोपटमार्गच हाताळण्यात आला आहे. बुद्धिवाद आणि तर्कशक्ती दूर ठेवून पुराणातील संकेतांना शरण जावयाचे आणि वाचकांच्या पातळीशी 'तान' साधून कलाकृती सजवायची. बुद्धिवादी मनोभूमिका ज्या प्रांतात विशेष रुजलेली नसते तेथे अशा प्रकारच्या वाङ्मयाचे उदंड पीक येते. हिंदी आणि कानडी प्रांतातील पौराणिक ललित वाङ्मयांचा अभ्यास या दृष्टिने उद्बोधक ठरते.

दुसरा मार्ग अर्थातच अधिक मोठा, बिकट, अतिशय गुंतागुंतीचा. या मार्गामध्ये पुराणकथांतील पौराणिकतेचा छेद करून मानवी मनाच्या निकषांवर त्यातला इतिहास

शोधू पाहणे. महाभारत हा एक इतिहास आहे असे मानले तर ( सुदैवाने श्री. सावंतही प्रस्तावनेत तसे मानताना दिसतात ) हजारो वर्षांपूर्वीच्या भारतीय ' मना ' चा वेध घेण्याचा प्रयत्न करणे अत्यंत अगत्याचे आहे. अनेक शतकांच्या कालगतीमुळे मूळ महाभारतातल्या इतिहासावर पुराणांची पुटेच्या पुटे चढली आहेत. समाजशास्त्र, मानववंशशास्त्र, भाषाशास्त्र, पुराणवस्तुसंशोधनशास्त्र, मूर्तिकला इत्यादी सर्व शास्त्रांच्या मदतीने त्या कालखंडातील प्रत्येक घटनेचा अन्वयार्थ लावण्यासाठी अत्यंत प्रतिभाशाली विवेचकबुद्धीचीच आवश्यकता आहे. सुदैवाने आपल्या ' ययाति ' या कादंबरीत अद्भुततेच्या वातावरणात आकंठ बुडालेल्या अतिशय सांकेतिक अशा ययाति-शर्मिष्ठा देवयानीच्या कथेचा उलगडा करताना खांडेकरांनी मानसशास्त्राचा फार चांगला उपयोग करून घेतला. तरीदेखील त्या पुराणकथेतील विश्लेषणाने बुद्धिवाद्यांचे पुरेपूर समाधान झाले नाही. कारण समाजशास्त्राची जोड देऊन खांडेकरांनी तिच्यातील पौराणिकांची सारी पुटे खरवडली नाहीत. त्यामुळे ' ययाति ' च्या रूपाने मराठी वाङ्मयात मोलाची भर घालता घालताच खांडेकर पुराणकथांच्या विश्लेषणाच्या मार्गातील महत्त्वाच्या अडचणींची कल्पना देऊन गेले. श्री. सावंतांनी खांडेकरांच्या बाह्यांगाचे पुरेपूर अनुकरण केले तरी ' ययाति ' चे अंतरंग त्यांना गवसले नाही. त्यामुळे श्री. सावंतांनी या कादंबरीमय ललितकृतीत काय करण्याचा प्रयत्न केला आहे, असा साहजिकच प्रश्न निर्माण होतो. त्याचे साधे उत्तर असे की, एका झपाटलेल्या तरुणाची महाभारतातील कर्णाला शोधण्याची ही एक विलक्षण जिद्दीची धडपड आहे. त्यासाठी त्याने महाभारतातील पुराणकथांना इतिहासाच्या कसोटीवर पारखण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु ते त्याच्या बुद्धीला पेलणारे नसल्यामुळे पुराणकथांच्या परंपरांना तो मुकाट शरण गेला आहे. त्यामुळे कर्णाच्या जीवनातील अनेकविध अद्भुत कथांचा अर्थ लावण्याची जबाबदारी आपोआपच टळली आहे. कर्णकथेचा श्रीमती दुर्गाबाई भागवतांनी ' व्यासपर्व ' या ग्रंथामध्ये लावलेला अर्थ आधारादाखल घेऊन महाभारतातील कथेच्या संदर्भात कर्णाचे भावजीवन शक्य तितक्या परिणामकारक रीतीने रेखाटण्याचा प्रयत्न केला आहे. आणि तो काही प्रमाणात यशस्वी ही झाला आहे. त्यामुळे ही कादंबरी संपूर्णपणे ' पौराणिक ' उतरली आहे. ऐतिहासिकतेच्या दृष्टीने ती अयशस्वी झाली आहे.

श्री. वि. स. खांडेकरांच्या 'ययाति' प्रमाणेच ही कादंबरी पात्रमुखी आहे, परंतु निवेदनामध्ये पात्रप्रकृती कोठेही उमललेली नाही. सारी पात्रे लेखकाची एक साच्याची भाषा बोलतात, भावनोत्कट व तीव्र प्रसंगी भडाभड बोलत राहतात आणि ठायीठायी आपल्या वागणुकीचा, आपल्यावर गुदरलेल्या प्रसंगाचा सारखा विचार करतात. त्यामुळे मानवी जीवनातील अनाकलनीय गूढ, अतर्क्य अशा विस्मयकारक जीवनदर्शनाचा प्रत्यय देण्याऐवजी ती कादंबरी कारणाच्याच भाषेत आपल्या वैचारिक जीवनाचा उगाच बाऊ करीत, भाष्य करीत आणि स्वतःची दुःखे उगाळीत राहतात ही पात्रे स्वतःचे जिणे कोठे जगतच नाहीत. ती आपले जिणे समजावून सांगण्यासाठीच अवतारतात. एका अर्थाने ही पात्रे अतिशय मनस्वी आहेत, आणि त्यामुळेच निवळ विचार व्यक्त करणारी लेखकाच्या हातची निर्जीव बाहुली ठरतात. पात्रमुखी निवेदनपद्धती या कादंबरीला अशा रीतीने मुळीच उपयुक्त ठरली नाही. चित्रपटकथेचे तंत्रही येथे फार ताणले गेले आहे. काही छोटछोटी प्रकरणवजा निवेदने ' कादंबरी 'च्या माध्यमात मुळी बसतच नाहीत. त्यामुळे या कादंबरीत कर्णाची ' भावकथा ' लेखकाने उमटविलेली आहे, असे भावळ्या वाचकांना वाटले तरी खरे म्हणजे त्यामधून कर्णाचे जिवंत, सळसळणारे व्यक्तिमत्त्वच येटे कुठे तरी गायब झाले आहे.

कादंबरीच्या निवेदनपद्धतीमध्ये कादंबरीकाराने महाभारतकालीन वातावरण निर्माण करण्यासाठी शस्त्रास्त्रे, वस्त्राप्रावरणे, वृक्षवेली, पशुपक्षी इत्यादिकांची मोठ्या बारकाव्याने वर्णने केलेली आहेत आणि गंगाजमनी शब्द सर्वस्वी टाळूनही कादंबरीतील कित्येक ठिकाणचे निवेदन परिणामकारक ठेवण्यामध्ये चांगलेच यश मिळविले आहे. मात्र साऱ्या प्रतिमा सांकेतिक आहेत. खांडेकरी पद्धतीच्या कोट्या नावीन्याच्या अभावी विचक्षण वाचकांचा विरस करतात. नुसत्या ' मना 'वर कादंबरीकाराने १०० पेक्षा अधिक कोट्या केल्या आहेत. त्यांचा तोंडवळा कुठेही नवीन नाही. स्मरा शिळ्या कढीला ऊत आणण्याचा प्रकार.

कर्णाची 'भावकथा' साकार करताना मूळ महाभारतातील कथेमध्ये कादंबरीकाराने जे बदल केले आहेत,

त्याबद्दल 'ललितकथा' म्हणून तक्रार करण्याचे काही कारण नाही, परंतु हे सारे बदल कथेची परिणामकारकता वाढविण्याच्या दृष्टीने परिणामकारक ठरलेले आहेत का, याचे साधे उत्तर 'नाही' असेच द्यावे लागेल. कुंतीचे आत्मनिवेदन आणि शोणाने वर्णिलेली कर्णाच्या दिग्विजयाची कथा काढून टाकली तर वाचकांना ही कादंबरी परिणामकारक वाटेल, विशेषतः द्रौपदीची कर्णाबद्दलची अभिलाषा कादंबरीकाराने ज्या पद्धतीने व्यक्त केली आहे, आणि कुंतीने स्वतःचे अरण्यांतील वास्तव्याचे चित्र ज्या पद्धतीने केले आहे ते पाहून लेखक अद्यापि या प्रांतात नवखा आहे, हे लक्षात आल्याखेरीज राहात नाही. लेखकाच्या मनावरचा हिंदी खंडकाव्यातील अतिरंजित भावविवशतेचा झालेला परिणामही तात्काल लक्षात येण्यासारखा आहे.

या कादंबरीच्या साधनेसाठी त्याने दिलेली संदर्भ-ग्रंथांची यादी! त्याने का दिली? प्रस्तावना, संदर्भ-ग्रंथांची यादी, शब्दार्थ इत्यादींची कादंबरीला आवश्यकता आहे काय? त्यामुळे लेखकाच्या सामर्थ्याची, त्याच्या मर्यादांची समीक्षकाला कल्पना येऊन जाते.

आद्यंत सोडल्यास ही कादंबरी म्हणजे जवळजवळ कर्णकथेच्या दृष्टिकोनातून मांडलेले सारे महाभारतच आहे. मराठीमध्ये महाभारताची भाषांतरे खूप झाली; त्यावर काही विश्लेषणात्मक असे ग्रंथही झाले, परंतु महाभारत इतके लालित्यपूर्णरीत्या मराठीत या कादंबरीच्यारुपाने पहिल्यांदाच अवतरत आहे. जणू काही ही कादंबरी म्हणजे विसाव्या शतकातील आधुनिक पांडवप्रतापच आहे, असेच म्हणाना!

**भीमराव कुलकर्णी**

●

## बॅरिस्टर अनिरुद्ध धोपेश्वरकर

लेखक—**भाऊ पाध्ये**, पॉप्युलर प्रकाशन, ताडदेव, मुंबई ३४. पृष्ठे १३२, मूल्य सहा रुपये.

वासूनाक्याच्या, वैतागवाडीच्या लेखकाची ही नवी कादंबरी म्हणजे अर्थातच कुतूहलाचा एक विषय! ही कादंबरी 'आपल्या संप्रदाया'ला जागणारी, आपल्या कुतूहलाला खाद्य पुरविणारी अशीच आहे. परंतु या कादंबरीच्या मलपृष्ठावर मात्र कादंबरीकाराची भलतीच भलावण करण्याचा प्रयत्न करण्यात आला आहे. (१) भाऊ पाध्ये हे पत्रव्यवसायात आहेत, म्हणून पत्रकाराप्रमाणे ज्या गोष्टीची माहिती द्यावयाची त्यात फार गुंतून चालत नाही,...(हे त्यांचे या कादंबरीत प्रकटलेले एक वैशिष्ट्य!) (२) पत्रकाराला यशस्वी होण्यासाठी वाचकाच्या मनाची पकड घेण्याइतके रेंगाळावे लागते.... (म्हणजे त्यांनी वासूनाका संप्रदाय सोडून आता यशस्वी होण्याची कास धरली आहे, हे दुसरे सुचविणे), (३) ह्या कादंबरीत लेखक इथे तिथे जाणाऱ्या प्रत्येक कल्पनेला, संवादाला ताणलेल्या दोरीवर खिळवून ठेवण्यात यशस्वी झाले आहेत....(म्हणजे काय हे आम्हांला कळले नाही. फक्त संवाद हेच या कादंबरीचे वैशिष्ट्य, म्हणून कादंबरीकार म्हणून अयशस्वी असे हे तिसरे सुचविणे असावे!) एकूण ही कादंबरीकाराची स्तुती का निंदा हे आम्हा पामरास न कळे!

'असो!' त्या ब्लर्बचे काहीही असो!! भाऊ पाध्यांच्या इतर कलाकृतींप्रमाणेच नेहमीपेक्षा 'विलक्षण' असे काही विशेष टिपण्याचा या ठिकाणी एक चांगला प्रयत्न जाणवतो, असे म्हणायला हवे! अनिरुद्ध धोपेश्वरकर नावाच्या एका प्रचंड पोकळीने भरलेल्या सुशिक्षित, सुसंपन्न व्यक्तीचा भंपकपणा पकडण्याचा या कादंबरीचा एक प्रयत्न आहे.–त्याचे सारे मन या पोकळीने व्यापल्यामुळे तो अतिशय थंड मनाचा आहे, त्याच्या विकारांचा रूढ सांकेतिक विकारांशी संघर्ष होतो आहे, परंतु प्रस्थापित समाजरचनेत होणारी त्याच्या मनाची कुचंबणा गुदमरवीत तो कसावसा जगतो आहे;—या सर्वांची जाणीव देण्यासाठी त्याच्या आचारविचारांचा एक परिणामकारक असा आलेख कादंबरीकाराने रेखाटला आहे.

ही कादंबरी वाचताना मला टेनेसी विल्यम्सच्या 'कॅट ऑन अ हॉट टिन रूफ' या नाटकाची चांगलीच छाया दिसली. मात्र त्याचे ओरिएंटेशन करताना कादंबरीकाराने सर्वस्वी स्वतंत्र प्रज्ञा वापरलेली आहे. म्हणजे कोणत्याही अर्थाने ही कृती अनुकरणात्मक वा अनुवादात्मक राहिली नाही. ती आपल्या वातावरणाशी सर्वस्वी एकरूप, एकजीव झाली आहे. मात्र टेनेसीच्या नाटकातील नायकाने सांकेतिक जीवनाकडे पाठ फिरविली असली तरी तो अतिशय अलिप्त व उदात्त प्रकृतीच आहे, हे दाखविणे अमेरिकेतील अत्यंत अत्याधुनिक प्रकृतीच्या नाटककारालाही आवश्यक वाटते, आणि आपल्या-

कडे मात्र निवळ रागावलेल्या तरुणांचे अनुकरणात्मक विचार भंपकपणाकडेच का झुकतात, असा एक प्रश्न मनात येऊन जातो. असो !!!

ही कादंबरी कित्येक ठिकाणी अशोक शहाणे व नेमाडे यांच्या शैलीची आठवण करून देते. धोपेश्वरकरांच्या व्रात्य खेळकरपणाची जी काही अल्प वर्णने आहेत ती कोसलाच्या जातीची आहेत, मात्र एका 'विशिष्ट' प्रकारच्या वास्तवतेचा आग्रह धरणाऱ्या या कादंबरी-काराने शेवटी शेवटी नायकाला ग्रामीण 'रोमँटिक' वातावरणात नेऊन आपल्या परंपरेशी प्रतारणाच केली आहे. कादंबरीतील 'प्रश्न' सहजासहजी सोडविण्यासाठी शेवटी मात्र कादंबरीकाराने कृत्रिमतेचा अवलंब केला आहे !

काहीही झाले तरी मराठी कादंबरीमध्ये ही एक लक्षणीय कादंबरी आहे, यात दुमत होऊ नये.

**भीमराव कुलकर्णी**

•

## 'खळाळ आणि मळणी'

खळाळ-ले.- **आनंद यादव**, मौज प्रकाशन, मुंबई; ४; रु. ६·२५.

**मळणी**-ले.- **रा. रं. बोराडे**, मौज प्रकाशन, मुंबई ४; ६ रु.

या दोन्ही संग्रहांतील कथा "ग्रामीण" आहेत. ग्रामीण बोलभाषेत शेतकऱ्यांच्या जीवनातील प्रसंग कथाकारांनी सांगितले आहेत, म्हणून त्यांना ग्रामीण कथा म्हणायच्या. पण कथा वाचल्यावर असे वाटत नाही. त्या कथांमध्ये माणसाचे मन व त्या मनाला होणाऱ्या बाधा यांचे जे चित्रण आहे, ते ग्रामीण नसून खोल आणि काव्यात्म आहे. माणसे मळ्यात राहतात का शहरी गाळ्यात राहतात याला काय महत्त्व आहे? माणसे हरीभाऊंच्या सदाशिव पेठेतली आहेत, का हार्डीच्या वेसेक्स भागातली आहेत. का टॉलस्टॉयच्या रशियन खेड्यातली आहेत, याच भान राहते का? खऱ्या कलेमध्ये हे भान राहात नाही. या ना त्या कुठल्या तरी मातीत पाय रोवून उभी असलेली माणसंच भेटतात. ती कुठल्या तरी खऱ्याखुऱ्या सुखदुःखांतच हेलावतात, हे खरे. नाही तर ती माणसंच नाहीत व कापडी बाहुल्या आहेत असे वाटेल. ...... चांगल्या कथेत त्यां माणसांना ग्रामीण, शहरी, आजकालची आणि जुन्या काळातील अशी लेबले शेवटी राहात नाहीत.

बोराडे आणि यादव यांच्या कथांतही असे गुण आहेत की त्यांना ग्रामीण म्हणावेसे वाटत नाही. मराठीमध्ये "ग्रामीण" परिसराची कथा, कादंबरी, कविता आली तेव्हापासून तिच्या भाषेत, मांडणीत फरक पडत गेला. कलात्मक एकसंधपणा व सहजपणा येत गेला. भाषा व प्रसंग यांच्यामध्ये जो कच्चा नवीनपणा होता, तो कमी होत गेला. आजच्या लेखकांची गिरी त्या नवीनपणातून बाहेर येत आहे. कोणताही नवीनपणा, मग तो शहरी किंवा ग्रामीण असो, त्यात जसा जोप असतो तसा बाधणारा भागही असतो. अगदी कोवळ्या ज्वारीच्या ताटातले हायड्रोसायनिक विष पुढे आपोआप नाहीसे होते, तसे जणू काही होते, व बाधणारा भाग नाहीसा होतो. ग्रामीण कथेत आता तो भाग नाहीसा होत आहे, याची ग्वाही देणाऱ्या या कथा आहेत.

### मळणी

"मळणी" या रा. रं. बोराडे यांच्या संग्रहातील १६ कथा साधारण गेल्या चार वर्षांत लिहिलेल्या आहेत. बोराडे यांच्या भाषेची घडण जशी सहज आहे तशीच प्रसंगाची निवडही. कोठल्याही कथेमध्ये काही अ-घडलेले नाही. साधे जगणे आहे. त्यातच जाणवून गेलेला पण कलात्मक जाणिवेने त्याला आकार दिल्या-मुळे क्षोभक झालेला अनुभव आहे. "मळणी" या कथेतच पाहा. कथा सांगितली आहे जणू एका अधू पायाच्या पोराने. आई वारल्यापासून बापाला तो चिकटून आहे. खळ्यावर मळणी चालू आहे. बापू, म्हणजे बाप, काय करतो इकडे पाहात पोर बसला आहे. बापाला दुसरे लग्न करायचा आग्रह करणारा मित्र येऊन भेटतो. गोष्टी होतात. मुलाला सावत्र आईचा जाच होईल, या काळजीने बापू नकार देतो. मित्र जातो. पण संध्या-काळच्या वेळी शेजारच्या मळ्याची बायना येते. नवरा दमेकरी म्हणून त्याला कंटाळलेली बायना पुरुषांशी बोलण्यात रमणारी. बापूलाही तिच्याशी बोलताना बरे वाटते. पोराला बायनेचा राग वाटतो. ती गेल्यावर बापू पोराला म्हणतो, माझ्यावर रागावलायस होय. मी पण एक माणूस आहे. असा साधा पण तितकाच खोल जाणारा मनांचा हा खेळ या कथेत मूर्त झाला आहे.

'खेळ' या कथेतली गुजाबाई थोवाच्या नादी लागून कुठे गेलेल्या नवऱ्यामागे दुःखी आहे. तिच्या दुःखाचे सांत्वन करणाऱ्या पोक्त बाईचा व तिचा संवाद उघडा पण तरी हळवा व नाजूक आहे. या बाईचा शाळकरी पोर दुपारची भाकरी खायला गुजाबाईकडे जातो. ती उदास पडून असते. तिला रिझवायसाठी खेळण्याची गोष्ट पोर काढतो. या खेळातून गुजाबाईचे मन कसे भरकटत जाते, पागल होते, याचे चित्र या कथेत आहे. गोष्टीच्या शेवटी अजाण, भ्यालेला पोर गुजाबाईची पागल अवस्था वर्णन करतो. तिथे भाषा व वर्णन, अस्ताव्यस्त मनांशी एकरूप बनून कवितेचाच जणू लय पकडते. ते वर्णन मुळातून या दृष्टीने वाचण्यासारखे आहे. 'मळणी'तल्या बहुतेक कथा अशा सहजतेने मनाची आतली लय पकडणाऱ्या सुंदर कथा आहेत.

## खळाळ

आनंद यादवांच्या 'खळाळ' संग्रहातील कथांमधून एक वेगळेच कविमन प्रकट होते. मळणीप्रमाणे 'खळाळ' या संग्रहातही ग्रामीण कथांतील आजवरच्या जत्रा, गावगुंडी, तमाशा व पोरी नाहीत. आणि भोळ्या बळिराजाच्या गौरवाची रेखाटणीही नाही. मात्र भावनांच्या कोवळ्या किंवा जटिल स्तरावरचा सहजपणाही येथे रेखाटलेला नाही. यादवांची भाषा साधी आहे, पण साधेपणाच्या पलीकडचे सूचित करू शकणारी आहे.

एक गोष्ट 'बाळा' नावाच्या खोंडाची. वासरू असल्यापासून खची होऊन नांगराचा बैल होण्यापर्यंतची बाळ्याची ही कथा सांगताना लेखकाने एक तटस्थपणा पाळला आहे. बापू हा तरुण शेतकरी बाळ्याला खेळगडी म्हणून जपतो व त्याच्यावर प्रेम करतो. बाळ्या वयात येताच त्याला खच्ची करताना बापूचे मन हळहळते, पण फारसे नाही. बापूचे लग्न होते. संसार सुरू होतो. शेवटच्या प्रसंगात बाळ्या गाईच्या मागे उधळत जातो, पण शेवटी नाकातली वेसण धरून त्याला बापू पकडतो व बेदम मारत सुटतो. बापूची बायको तेथे येते व उगाच का मारता म्हणते. बापूच्या मनातल्या वादळाची कल्पना तिला येत नाही. अपराधीपणाचे विषारी शल्य बापूला बेभान करीत असते. आसूड बाळ्याच्या अंगावर पडत असतात, पण खरे म्हणजे बापू स्वतःवरच ते घाव घेत असतो. बाळ्याच्या डोळ्यावर आसूडाचा फटका बसतो, तेव्हा बापू थांबतो.

यादवांच्या या कथेत सूचित होणारी, साकार होणारी व्यथा आपल्याला परिचित अशा व्यथांपेक्षा वेगळी आहे खोलही आहे. 'नरेच केला हीन किती नर' ही जाणीव व जाग माणसाला केव्हा आली? अगदी अलीकडे. भूतदयेची जाणीव मात्र फार प्राचीन आहे. मुक्या प्राण्यांना यज्ञात मारू नये हे तर बुद्धांनी सांगितले. यात खटकणारे व विचित्र असे आहे की, प्राण्यांबद्दलची दया व करुणा प्राचीन असून, माणसाला माणसाबद्दलची खरी कणव मात्र फार उशिराने आली आहे. यादवांच्या कथेत एका मुक्या जनावराबद्दल करुणा आहे, का जास्त काही आहे? का काही वेगळे आहे? आधी मी सूचित केल्याप्रमाणे इथे भूतदया नसून माणसाला एक नवी दृष्टी येत आहे. 'मी बाळ्याच्या जागी असतो तर' या भीषण शंकेने आलेली व्याकुळता बापूला प्रथमपासून जाळीत आहे. खेळगड्याशी रमलेले त्याचे जुने मन मेलेले नाही. ते मन बापूला अजूनही बाळ्याशी एकरूप होण्यास सांगत आहे. बापू आपल्या संसारात रमलेला असताना त्याचे मन कोठे बाहेर आहे, ते जुन्या मनाच्या छायेत वावरत आहे.

बापू आणि बाळ्या खोंड यांच्यामधील प्रेम व त्यांच्यातील नंतरचा क्रूर अंतराय, हे द्वंद्व नुसते व्याकुळ भावविवश तऱ्हेने जाणवू शकेल. तीस वर्षांपूर्वीच्या सहृदय लेखकाने ते मोठ्या समर्थपणे रंगविले असते. पण, ते भूतदयेच्या स्तरावर. आज यादवांच्या मनात भूतदयेच्या पलीकडची, मानवी मनाने जास्त व्यथेने पाहिलेली, अंतर्मुखता आहे. निसर्गाचे, किंवा खरे म्हणजे अस्तित्वाचे नवे कोडे मनाला उलगडेनासे झाले आहे. बाळ्याचे जीवन त्याच्या पशुत्वाने मर्यादित आहे, माणसाने त्याला खच्ची करून आणखीच निर्जीव बनविले आहे.

माणसाचे जीवनही असेच मर्यादित आणि खच्ची झालेले आहे का? पूर्वी खेळगडी म्हणून आपल्याशी एकरूप झालेला बाळ्या आज दुरावलेला व दीन दिसत आहे, माझे तरी जगणे या विराट अस्तित्त्वात अर्थहीनच नाही का? हा घोर मनाला लागणे, ही आजची अंतर्मुखता व माणसाची व्यथा आहे.

यादवांच्या वरील कथेत हा गर्भितार्थ पाहात असताना, पूर्वीचा, हार्डीच्या कादंबऱ्यांचा व कवितांचा, माझ्या मनातील खोल संस्कार तर नव्याने मी अनुभवीत नाही ना? हा प्रश्न मनात आला. पण,

अनुक्रमणिका

पुढील कथा वाचीत जाऊन मी त्यांची अखेरची "मोट" ही कथा वाचली, आणि मला वाटले की हा आपल्या कल्पनेचा खेळ नाही. जुने संस्कार नाहीत, निसर्गाशी एकरूप होऊन आपल्या अस्तित्वाबद्दलची एक खोल मग्नता अनुभविण्याची वृत्ती यादवांच्या कथेतच आहे. "मोट" या कथेमध्ये हिरा नावाचा हत्तीसारखा बलवान पण कमालीचा शहाणा बैल आहे. उभी हयात तो मोट ओढतो व पिकांना जोपासतो. शेवटी तो मरतो आणि त्याच्या कातड्याची नवी मोट तयार होते. त्या मोटेने पाणी काढणारा बाबू हा लेखकाची व्यथा भोगणारा माणूस आहे. तो हिराशी एकरूप होऊन गेलेला आहे. मोट हिराच्या कातड्याची, त्या मोटेने पाजलेले पाणी पिणारी पिके ही हिराची, त्या मोटेशी एकरूप होणारा बाबूही हिऱ्याचाच. सगळे कसे एका रक्तमांसाचे व मनाचे वाटू लागते. मरणानंतरही मोटेच्या रूपाने जिता राहिलेला हिरा, आणि हिऱ्याच्या मृत्यूत आपल्याला हरवून बसलेला बाबू, यांच्यातील अंतरच उरत नाही. या कथेत अनेक स्तर व धागे असून ते एकजीव विणलेले व कालवले गेलेले भासतात. आणि, असणे-नसणे, जगणे-मरणे, यांतील फरक काय? हा विलक्षण प्रश्न मनापुढे उभा राहतो. त्या प्रश्नाचे उत्तर कोण देणार? पण तो प्रश्न विचारण्याचे, तो सजीव मूर्त करण्याचे सामर्थ्य यादवांच्या कथेत आहे, या अर्थाने मी त्यांच्या लेखनाला काव्यात्म कथा म्हणतो.

## परिशिष्टाबद्दल

'खळाळ'च्या शेवटी, एक परिशिष्ट जोडून त्यांत यादव यांनी ग्रामीण कथांच्या भाषेबद्दल आपली भूमिका मांडली आहे. कथेतील माणसांची स्वाभाविक भाषा वापरण्यात 'अतिरेक' होत आहे, अशी टीका त्यांच्या भाषाशैलीबद्दल कोणी केली असेल, तर ती रास्त नाही. याबद्दल मतभेद होण्याचे तसे कारण मला दिसत नाही. नागर प्रमाण भाषेपासून किंवा शिष्ट संकेतांपासून लेखकाच्या भाषेचे अंतर मोजावयाचे व ते अंतर अमुक प्रमाणापेक्षा जास्त असेल तर 'अतिरेक' किंवा श्लील-तेचा भंग झाला असे मानावयाचे ही भूमिका मर्यादित अर्थाने बरोबर असते, पण प्रयोगशील अशा अल्प परंतु महत्त्वाच्या लेखनापुरती ती भूमिका लागू ठरत नाही. असे लेखन सर्वच चांगले असते असे नाही, पण त्याचा दर्जा ठरविताना प्रमाण भाषेचे व संकेतांचे उल्लंघन झाले आहे हे स्वीकारून परीक्षा करावी लागते, त्या उल्लंघनावर बोट ठेवून साहित्यिक मूल्यमापन करणे अयोग्य ठरते.

येथपर्यंत यादव यांच्या भूमिकेशी मी सहमत आहे. पण त्यांनी परिशिष्टाच्या पहिल्या दोन परिच्छेदांत मांडलेली भूमिका मला तरी पटली नाही. कलावंताच्या दोन भूमिका त्यांनी कल्पिल्या आहेत. एक 'निवेदका'ची व दुसरी 'आविष्कार' करणाऱ्याची. पहिली भूमिका घेऊन लिहिणारा लेखक कथेतील पात्रांच्या आहारी न जाता लिहितो व दुसरा 'आविष्कारात' मग्न होऊन जणू काही पात्रांच्या आहारी जातो, त्यांच्याच 'स्वाभाविक' भाषेत बोलू लागतो. 'निवेदक' स्वतःचे भान ठेवून लिहितो, व दुसरा बेभानपणे म्हणा पात्राचे मुख बनतो. असा काही फरक यादव करतात, तो मला योग्य वाटत नाही. उत्तम कादंबरी किंवा कथा निवेदनही असते व आविष्कारही असते, दोन्ही एकदम व एकजीव असते, मिश्रण नसते; किंबहुना हा फरक मला उमगत नाही व जाणवत नाही. हा फरक केला तर, कलावंताला 'निवेदक' म्हणून कर्तृत्व वहाल करावे लागेल किंवा पात्रांना कर्तृत्व वहाल करून कलावंताला नुसता 'निरोप्या' जिवंत टेप-रेकॉर्डर बनवावे लागेल. कलावंत दोन्ही नसतो.

यादवांनी केलेला फरक मानून त्यांच्या ग्रामीण भाषेची तरफदारी करण्यात मला धोका वाटतो तो असा : अशा समर्थनामुळे 'आविष्कार', त्याचा 'प्रामाणिकपणा', 'शुद्धपणा' वगैरे काही संकेत, यांना भरमसाट व एकेरी महत्त्व येईल; कलावंताने कथा 'निर्माण' करावी लागते या मूलभूत गोष्टीला गौणत्व येईल. यादवांच्या 'मोट' या कथेची भाषा व तिची काव्यात्म रचना यात एकसंध-पणा आहे. यात त्या कथेचे सौंदर्य आहे,—नुसते 'स्वाभाविक' भाषेचे सौंदर्य नाही. थोडे ताणून असे म्हणता येईल की, ही कथा प्रमाण भाषेत लिहिली तरीही तिचे आंतरिक सौंदर्य प्रतीत होत राहील. परिशिष्टामध्ये मांडलेली भूमिका यादवासारख्या समर्थ कलावंताने मांडलेली आहे, व म्हणून तिचा जास्त विचार व्हावा यासाठी माझा वरील आक्षेप मी मांडीत आहे.

**दि. के. बेडेकर**

## संध्याकाळच्या कविता

( संध्याकाळच्या सावल्या : ग्रेस, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई; ३ रु. )

ग्रेस या कवीचा हा पहिला संग्रह असला तरी यात पहिलेपणाच्या खुणा अजिबात आढळत नाहीत. चित्रकाराने कुंचल्याच्या एकाच फटकाऱ्यात सुरेख चित्र रेखाटावे; आणि वाहवा मिळवावी तसाच प्रकार या पहिल्याच संग्रहाने कवी ग्रेसबाबत झालेला आहे.

विलक्षण संवेदनक्षमता या कवीला लाभलेली आहे. या संवेदनक्षमतेच्या बोलक्या खुणा प्रत्येक पानावर आढळतील. निसर्गाच्या सजीव रेखाटनांतून रंग, रूप, बंध, नाद व स्पर्श या सर्व संवेदना एका भावपूर्ण आशयाला आकार प्राप्त करून देत आहेत. पाण्याप्रमाणे निसटू पाहणारा अगदी सूक्ष्म आणि तरल अनुभवही, संवेदनांची द्रुव घेऊन या कवितांतून प्रकट होतो. आणि या संवेदना वाचकाच्या मनात तितक्याच उत्कटतेने संक्रांत करण्याचे अभिव्यक्ती सामर्थ्यही या कवीला लाभलेले आहे. म्हणूनच कोणत्याही कवितेतील भाववृत्ती मूळ अनुभवाप्रमाणेच वाचकांच्या मनातही निर्माण होते. मूळ अनुभव, संवेदनासह शब्दबद्ध करून एक विलक्षण आणि अत्युत्कट भाववृत्ती निर्माण करून, कवितेला ' विशुद्ध भावकविते 'चा दर्जा प्राप्त करून देण्याचे श्रेय ग्रेस यांना निश्चितपणे द्यावे लागेल. मराठीतील विशुद्ध भावकविता पाहण्यासाठी कोणालाही ' संध्याकाळच्या कविता ' हा संग्रह उघडावा लागेल.

कवीची स्वानुभूती ' देहास आठवे स्पर्श । तू दिला कोणत्या प्रहरी । की धुके दाटले होते । या दग्ध पुरातन शहरी ( ऊर्मिला )' या सरळ आणि स्पष्ट रचनेतून व्यक्त होईल किंवा ' हा श्रावण गळतो दूर । नदीला पूर । तरूवर पक्षी । घन ओले त्यातुन । चंद्र दिव्यांची नक्षी ( श्रावण )' या चित्रमय निसर्गरेखाटनांतून होईल. तर कधी एखाद्या प्रतिमेच्या साहाय्याने आशयाला घनता प्राप्त करून देणाऱ्या ' पुढे कोण आहे ? मी जसा वर्फातून आलो तसाच वर्फातून जाईन; रात्रीच्या शेवटच्या प्रहरातील रहदारीसारखा ' अशा विधानात्मक आविष्कारातून होईल. अभिव्यक्तीचे कोणतेही रूप भाववृत्तीला जरासुद्धा धक्का पोचू देत नाही. अनुभव घेण्याची आणि अनुभव व्यक्त करण्याची पद्धती एकच असल्याने, आशय आणि अभिव्यक्ती यांचा सुरेख संगम ग्रेसच्या कवितेत पाहायला मिळतो.

' वर्फाच्या कविता 'मध्ये ग्रेस थोडेसे चिंतनशीलही बनतात. पण ही चिंतनशीलता भावनेची पुटे लेऊन येत असल्यामुळे, तिला बुद्धिवंताची वैचारिकता येत नाही. इथे बुद्धीवर भावना मात करते. वैचारिकता आली असती तर तिला गद्यकाव्याचे स्वरूप आले असते. तथापि या कवितांचे रूप आलंकारिक आणि विधानात्मक ( ' पुढे कोण आहे ' इ. प्रश्नामुळे स्वगतात्मकही ) बनल्यामुळे, इतर कवितांप्रमाणे त्यांना विशुद्ध भावकवितेची पातळी लाभत नाही. या कवितांतून ग्रेस नाजुक, साजुक आणि मोहविणाऱ्या शब्दसौंदर्याच्या अतिरिक्त आहारी गेलेले आहेत.

या कवीला एका अनाम दुःखाने झपाटलेले आहे. या दुःखाचे स्वरूप शब्दांतून प्रकट करता येत नाही. आणि हे दुःख संध्याकाळच्या वेळी थेट काळजालाच हात घालते. आत गलबलते, हृदय हालते, ओठ विलग होतात आणि वाचकाला हालविणाऱ्या संध्याकाळच्या रसपूर्ण कविता शब्दांद्वारे आकाराला येतात. या दुःखाला आकार देण्यासाठी, त्याचे मूळचे स्वरूप व्यक्त करण्यासाठी हा कवी एकसारखा धडपडतो आहे. आणि परिणामतः अनेक संध्याकाळच्या कविता जन्माला येतात. मलपृष्ठावर स्वतः कवीने म्हटल्याप्रमाणे ' संध्याकाळच्या कविता ' त अनंत संध्यावेळा एकवटल्या आहेत. सगळ्या वेळांची मिळूनच झाली आहे एक दीर्घ संध्याकाळ. प्रकाशाचा मृत्यू होत असताना सृष्टीवर दाटून आलेले गहन आणि गहिरे औदासीन्य, दूर दूर पसरत गेलेली जडता, स्तब्धता आणि निःशब्द एकटेपण, या एकाकीपणात जाणवणारे, चिरंतन सोबत करणारे गूढ पण उदात्त दुःख आणि अशा दुःखातच पटणारी त्या अद्भुत शक्तीच्या अस्तित्वाची ओळख हे अक्षरशः खरे आहे. ' ओवी किंवा अभंगातला भगवंत ' ही प्रतिमा एकसारखी का येते हे या पार्श्वभूमीवरून स्पष्ट होईल.

गाय, देऊळ, श्रावण क्षितिज आणि भगवा रंग इ. प्रतिमा पुनः पुनः आवृत्त होतात. प्रत्येक वेळी संदर्भ वेगळा असला आणि या प्रतिमा त्या त्या कवितेत चपखल बसत असल्या, तरी या प्रतिमाविषयी कवीला अप्रतिम वेड आहे एवढे निश्चित. या प्रतिमा उपन्य

म्हणून न येता आशयरूप होऊनच येतात. म्हणून कृत्रिमता येत नाही.

ग्रेसची सुटी कविता आपल्याला विलक्षण भावते. पण समग्र कविता वाचतांना तोच-तोपणा जाणवतो. प्रत्येक कवितेत तोचतोपणाचे रूप, रंग, छटा वेगळी असली आणि ती जाणवत नसली तरी समग्र वाचनाच्या वेळी हा दोष नाहीसा होत नाही.

या दोषावर ग्रेस सहज मात करू शकतात... !

**प्रसन्नकुमार पाटील**

●

## रानातल्या कविता

" रानातल्या " कविता **ना. धों. महानोर**, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई; ३ रु.

सत्यकथा आणि प्रतिष्ठानमधून जेव्हा ना. धों. महानोर यांच्या कविता प्रसिद्ध होत होत्या तेव्हाच त्यांचे वेगळेपण नजरेत भरत होते. हा कवी लक्ष वेधून घेत होता. आता संग्रहरूपाने या कविता वाचताना एका वेगळ्या व्यक्तिमत्त्वाच्या कवीची कविता आपण वाचीत आहो याची सुखद जाणीव आपणाला होत असते. हे व्यक्तिमत्त्व शेतमळ्याशी एकरूप झालेल्या एका तरुण माणसाचे आहे. सुरवातीच्या 'ह्या शेताने लळा लाविला' या ओळीतूनच ह्या व्यक्तिमत्त्वाशी आपला परिचय होतो. साऱ्या कवितांमधून हे व्यक्तिमत्त्व ठळकपणे जाणवत असते. अजिंठ्याच्या परिसरातला निसर्ग, शेतमळा, तिथले लोक, त्यांच्या भावभावना कालबाह्य ठरलेल्या श्रद्धा, लोकगीते या सर्वांशी हा कवी एकरूप झालेला आहे याची साक्ष प्रत्येक कविता देत असते.

'पोर तोऱ्यात' 'गावकोसाला पाणतळ्याला' या लोकगीतसदृश बांधणीच्या कविता जशा या संग्रहात आहेत तशाच खेडेगावच्या लोककथा-दंतकथा, त्यातील अद्‍भुतपणासकट व्यक्त करणाऱ्या 'नदीचा कांठ,' 'तिला एकदा सहज म्हणालो' याही स्वरूपाच्या कविता आहेत. अजिंठ्याच्या आसपासचा निसर्ग तर या सर्वच कवितांमधून कधी ठळकपणे तर कधी पार्श्वभूमीदाखल आपली हजेरी लावलेला दिसून येतो. या निसर्गातून कवीच्या भावनांचा आविष्कार आणि मानवी स्वभावाचे दर्शन घडते. कधी हा निसर्ग आपल्या समोर चित्ररूपाने उभा राहतो तर कधी कवीच्या प्रेमजीवनाची, तारुण्यसुलभ भावनांची चित्रणे त्यात येतात. मीलन, मीलनाची आतुरता, प्रतीक्षा, मीलनोत्तर शृंगार, तारुण्याची बेहोषी इ. अनेक अनुभव या कवितांतून व्यक्त होताना दिसतात. हे जे विविध अनुभव व्यक्त होतात ते प्रेमजीवनाच्या वेगवेगळ्या छटांचे अनुभव होत. आणि हे अनुभव समर्थपणे अंगभूत लय घेऊन, विविध प्रतिमांच्या द्वारे व्यक्त होतात; यातच या कवितांचे वेगळेपण दिसून येते.

'रानातल्या कविता' म्हटले की रान, रानातल्या लोकांची सुखदुःखे, त्यांचे अज्ञान, त्यांचे दारिद्र्य, त्यांची दैवाधीनता, जुन्या श्रद्धा कवटाळून धरण्याची वृत्ती, जीवनाशी झुंजताना येणारे मानअपमान, हर्षामर्श यांचे विविध अनुभव इ. गोष्टी आपल्या ध्यानात येतात. पण संपूर्ण संग्रह वाचून काढल्यानंतर या गोष्टींबाबत आपल्या पदरी निराशाच पडते. रानातील म्हणजेच खेड्यातील 'सामाजिक 'वास्तव' या कवितांतून—एखाददुसरी कविता वगळल्यास व्यक्त झालेले दिसून येत नाही. दिसते ते एवढेच की एक सुखवस्तू तरुण कवी रानाकडे रमणीच्या रूपात, तिच्या विविध साज-शृंगारात, रोमांचित (Thrlling) करणाऱ्या तारुण्यसुलभ भावनांच्या रूपात पाहात आहे. संग्रहाचे शीर्षक आणि आतील कवितांतून व्यक्त झालेले अनुभव यातील विसंगतीची विस्मृती पडत नाही. मलपृष्ठावरील प्रस्तावनेत वा. ल. कुलकर्णी म्हणतात— " खेड्यातील दुःख आणि आनंद, सौंदर्य आणि कुरूपता, ऐश्वर्य आणि असाहाय्यता, दिवस आणि रात्र मराठी कवितेतून आज प्रथमच आपापल्या रंगगंधासह साकार होत आहेत. " यातील पाठथोपटणीचा प्रकार बाजूला ठेवल्यास, प्रत्येक जोडीतील आनंद, सौंदर्य, ऐश्वर्य आणि रात्र या विषयीचे एका संवेदनक्षम कवीने व्यक्त केलेले अनुभवच रानातील कवितांत पाहावयास मिळतात. सूक्ष्म वाचकाच्या नजरेतून ही गोष्ट निसटू शकत नाही. खेड्यातील-सामाजिक वास्तवाकडे कवीने डोळे उघडे ठेवून पाहिलेले दिसत नाही.

रान म्हणजे खेडे—खेड्यातील वास्तव याबाबत यशवंत, गिरीश, ना. घ. देशपांडे, ग. ल. ठोकळ आणि आनंद यादव इ. कवींनी खूप लिहिले आहे. यशवंतानी खेड्यातील दुःखांना थोडासा स्पर्श केला, पण पुढे

त्यांनी तशा प्रकारचे लेखन थांबविले. ठोकळांना तर खेड्यातील फक्त अद्‌भुतरम्य जीवनच दिसले. गिरीशांच्या कवितांना कृत्रिमपणा आणि नागर जीवनाची झिलईच चढली. देशपांडे यांच्या कवितांत थोडासा वेगळेपणा आला पण त्यांनाही ' साजणी 'चा मोह आवरता आला नाही. खेड्यातील समृद्ध अनुभव चितारले ते फक्त आनंद यादव यांनी. अचूकपणे त्यांना रानची ' नस ' पकडता आली. देशपांड्यांच्या वाटेवरून ' ना. धों. ' चालत गेले पण त्यांची विविधता घेऊन नव्हे तर एकारलेपणा घेऊन.

एखाद्याच प्रतिमाद्वारे अनुभव साक्षात करण्याचे सामर्थ्य मात्र या कवीत आहे एवढे निश्चित. ' नांगरून पडलेली जमीन ' या कवितेतील ' ग्रीष्माचे ऊन ' ही प्रतिमा त्या कवितेतील संपूर्ण सामाजिक आशय उजळवून टाकते. आणि एक समर्थ कविता वाचल्याचा आनंद आपणाला मिळतो. त्याचप्रमाणे ' रात्रू रानभर उडून जातात ' यातील रात्रूची प्रतिमा विलक्षण संवेदनक्षम आणि बोलकी आहे.

परिशिष्टातील कवितेचे गालबोट मात्र या संग्रहाला लागलेले आहे. त्यात ' गिरामीण कथा ' बावत जो एक दूषित (–आणि स्वतःविषयी प्रौढी मिरविणारा ) दृष्टिकोण व्यक्त झाला आहे तो मात्र स्वतः रानातल्या कविता लिहिणाऱ्या कवीकडून अजिबात अपेक्षित नाही.

वा. ल. कुलकर्णी यांच्या शब्दांत रानातल्या कविता म्हणजे अजिंठ्याच्या पायथ्यातील शेताचे शब्दशिल्प! या शब्दशिल्पाबाबत जाणवते ते एवढेच की, अजून छिन्नी चालवली पाहिजे. अजून कंगोरे पडत गेले पाहिजेत कारण " मोहाच्याही झाडाला मोह व्हावा " अशी ना. धों. महानोरची कविता आहे.

**प्रसन्नकुमार पाटील**

•

## माती जागवील त्याला मत

माती जागवील त्याला-मत ले.— **बाबा आमटे** व **रमेश गुप्ता**, साधना प्रकाशन, पुणे २, १ रु.

ज्याला देश गहाण टाकायचा नाही त्या सर्वपक्षीय व अपक्षीय नेतृत्वासाठी अर्पण केलेला ' माती जागवील त्याला मत ' हे एक चिंतनपर काव्य असून, तो एका मतदाराचा जाहीरनामा आहे. मतदार आहेत आनंदवनाच्या मातीतून, झडलेल्या सडलेल्या हातांच्या साहाय्याने, महाकाव्य निर्माण करणारे कलंदर कलावंत– बाबा आमटे !

बाबा आमटे म्हणजे विलक्षण ध्येयाने भारलेले जिवंत व्यक्तिमत्त्व आहे. हे व्यक्तिमत्त्व चैतन्याने रसरसलेले असल्यामुळेच ते दुसऱ्यांच्यात चैतन्य निर्माण करू शकते. रात्री झोपताना उशाशी स्वप्ने घेऊन झोपणारे, दुसऱ्याच्या गालावरील अश्रू पुसणारे, सडलेल्या बोटांना निर्मितीची प्रेरणा देणारे आणि मातीवर मनमोक्त प्रेम करणारे हे जिवंत आणि ज्वलंत व्यक्तिमत्त्व सर्वांच्या आदराचे आणि कौतुकाचे स्थान व्हावे यात नवल काय ! अंगांचे ' बादशाहीपण ' मिरवावे ते बाबा आमटे यांनीच. या व्यक्तिमत्त्वाला कलावंताच्या प्रतिभेचा स्पर्श आहे, हे अधिक वेगळेपण. ' ज्वाला आणि फुले ' नंतरचा ' माती जागवील त्याला मत ' हा त्यांचा दुसरा काव्यसंग्रह.

राजकीय पक्षांचे जाहीरनामे असतात. पण हा संग्रह म्हणजे एका मतदाराचा जाहीरनामा आहे. दर निवडणुकीच्या वेळी राजकीय पक्ष आपापले जाहीरनामे मतदारांपुढे सादर करतात. आपण निवडून आल्यानंतर काय काय करू याबद्दलचे मतदारांच्या डोळ्यांत धूळ फेकणारी पोकळ आश्वासने आणि खोटी प्रलोभने त्यात असतात. निवडणूक झाल्यानंतर हा जाहीरनामा आणि जनकल्याण मागे पडून सत्तेचा शिमगा सुरू होतो. सामान्य माणसांना हे जाहीरनामे वाचण्याइतकी फुरसतही नसते, किंवा त्यावर ते उलट टोणेही हाणू शकत नाहीत. भुकेच्या विवंचनेत हे जीव चोवीस तास गुरफटलेले असतात. त्यांना पुढाऱ्यांचे मतलबी आणि संधीसाधू राजकारण कळत नाही. आणि हे अज्ञानी भुकेले मतदार पर्यायाने भुकेलेच राहतात. राजकीय पक्षाप्रमाणेच बाबा आमटे यांनी एका मतदाराचा जाहीरनामा काढून सर्व पक्षोपपक्षांचा ढोंगीपणा आणि भूतकालातील त्यांची निष्क्रियता चव्हाट्यावर आणली आहे. आपापसांतील भेद, मतमतांतरे, ढोंगीपणा, निष्क्रियपणा आणि सत्तास्पर्धा सोडून ' मातीवर धुंद प्रेम करण्याची ' कळकळीची विनंती त्यांनी केली आहे.

एका विशिष्ट ध्येयाचा ठसा आमटे यांच्या मनावर कोरलेला आहे. तो त्यांना वाचकाच्या मनावर ठसवा-

वयाचा आहे. मानवी जीवन--पददलित मानवी जीवन ही बाबा आमटे यांच्या चिंतनाची प्रेरणा आहे. म्हणूनच दलितांच्या कैवाराला, विज्ञानाच्या आश्रयाला आणि श्रमशक्तीच्या गौरवाला आमटे यांच्या कवितेत पहिले स्थान मिळते, प्रश्न हा आहे की हे सारे कलात्मक पातळीवर जाते का ?

' ज्वाला आणि फुले ' काय किंवा ' माती जागवील त्याला मत ' काय, या दोन्ही संग्रहांत कलावाह्य मूल्ये—उपदेश, प्रचारीपणा आढळतात हे निश्चित. साहित्याला प्रचाराचे वावडे आहे असे नव्हे पण हा प्रचार कलात्मक पातळीवर पोचला पाहिजे कारण कला-मूल्ये ही कलाबाह्य मूल्यापेक्षा श्रेष्ठ आहेत.

आमटे यांच्यातला उपदेशक आमटे यांच्यातल्या कलावंतावर मात करतो एवढे निर्विवाद... !

**प्रसन्नकुमार पाटील**

●

## मनोरा

**सौ. पद्मा लोकूर** ( मौज प्रकाशन ) मुंबई.

श्री. पद्मा लोकूर यांचा हा पहिलाच कविता संग्रह. मनोरा एकाकी उभा असतो. अवकाशात डोके खुपसण्याचा प्रयत्न करीत. एकटी एक ' प्रणय ' भावना हा मनोरा उभा करते, " शब्दावरती शब्द रचून " आणि " या शब्दाचा त्या शब्दाशी चिरा सांधुनी घेत." हा चिरा सांधून घेताना जे कौशल्य दाखवावे लागते, जे रसायन वापरावे लागते, ते कवयित्रीचे स्वतःचे; जिणे पिळवटून या गाण्याची किंमत म्हणून दिलेल्या डोळ्यातील पाण्याचे, हृदयाच्या जखमातील रक्ताचे.

हा ' मनोरा ' आकाशाकडे पाहात नाही. तो अंतर्मुख आहे. ही कविता अतिशय वैयक्तिक आहे. एकच एक भावना आळवणारी आहे. एक जीव आपल्या जीवींच्या जिवाला–म्हणजे स्वतःला–निजगुज सांगत आहे, असे स्वरूप काही कवितांचे असले, तरी बऱ्याच कवितांत कोणातरी ' तू ' ला उद्देशून ' मी ' ने केलेला हा संवाद आहे.

या संवादात सुसंस्कृत आणि संवेदनाक्षम अशा स्त्रीमनाच्या अनेक भावच्छटा रम्य, संयत स्वरूपात रेखाटलेल्या आहेत. छटा अनेक असल्या तरी मूळ एक आहे—जसा गुलाब. गुलाब पिवळा, पांढरा, लाल, गुलाबी–निरनिराळ्या रंगांत दृष्टीस पडतो. आणि आपण म्हणतो पिवळा गुलाब, लाल गुलाब इत्यादि. तशाच या कविता, सुख, दुःख, आशा, निराशा, स्वप्नाळूपणा, वैफल्य-छटा अनेक पण मूळ भावना प्रणय आणि ती भावना-सुद्धा " नातिचरामी " ला निरोला कुठेही तडा जाऊ नये " पंख शब्दांचे नकोत " ' काही तरी ' ला मिळाया " अशी दक्षता घेत प्रगट झालेली.

" लपवायाला शिकलें आहे बरेंच कांहीं " अशा संयमाचा खानदानी शेला पांघरून, नजर खाली वळवून ही कविता चालते आहे म्हणून ती अधिकच चटका लावते. ही भातुकलीतील लुटुपुटीची राणी असली तरी तिच्यात " आरसपानी काचेचे जिणे भुगारण्याची इच्छा आहे, रक्तातील आवेग आहे; एका बेभान डावाने पट उधळून टाकावासा तिला वाटतो आहे"; परंतु "परतायाचे आवेगाच्या काठापासून " या शपथेने ती बांधलेली आहे. इतकी की त्या शपथेचीच गाणी करून ती गात बसते. " या चक्रातुन त्या चक्रावर " अशी ससेहोलपट होते, पण त्या वेदनेला फार खोल धुसू दिले जात नाही, आणि म्हणून पुष्कळदा " या गाण्याला तारस्वरांची किनार नाही, भोवळ नाही... विखार नाही... "मग तेच ते सूर, आळवीत कविता सपक होते. जिथे भावना खोल पोचली आहे, संयमाचा शेला जरा बाजूला सरकला आहे, तेथे म्हणजे भातुकली, एकदाच, किंमत, बर्फ गारव्याची रात्र संपताना – वगैरे सारख्या कविता मनातील मनाला स्पर्श करतात.

सुखापेक्षा दुःख हे माणसाला जीवनाच्या अधिक जवळ नेते आणि त्याचे सत्य दर्शन घडवते. पण असे दर्शन घ्यायला फार मोठे धैर्य लागते. नाही तर कशाच्या तरी आड लपून ते घ्यावे लागते. लपून घेतलेले दर्शन समग्र असत नाही. तोकडे वाटते. तसा काहीसा भास पद्मावाईच्या कविता वाचताना होतो. मनोऱ्यात शब्द-बंबाळपणा नाही, विक्षिप्त प्रतिमा नाहीत. सहजपणे सूचक शब्दांत कविता अवतरते. पद्मावाईंच्या काव्यावर इंदिरा संत यांच्या काव्याची छाप दिसली तरीही त्यांनी आपले वेगळेपणही जपले आहे, आशयातील प्रामाणिकपणाने. त्यांच्या कवितेला मुक्तविहार करण्याचे सामर्थ्य लाभो ही सदिच्छा !

**पद्मावती गोळे**

## फुलमाळ

**प्रा. सदाशिव माळी**, शिवमूर्ती प्रकाशन, धुळे

' फुलमाळ ' हा प्रा. माळी याचाही पहिलाच संग्रह. फुलमाळेत हा पहिलेपणा, नवखेपणा जाणवतो. फुलमाळ साधी सुधी आहे. प्रेम, भक्ती, दलितांचा कळवळा, निसर्ग-प्रेम अशी बहुरंगी फुलांची ती आहे. परंतु ज्येष्ठांचे बोट अजूनही बऱ्याच वेळा धरलेले आढळते. उदारणार्थ— कोण करी ही जादुगिरी, फुलराणी, बालकवि माझ्या खानदेशाच्या भूमीत– ( बोरकर ), आसे मस्तक कसाले ( बहिणाबाई चौधरी ) आणि रविकिरणमंडळाची छापही डोकावतेच.

भक्ती, निसर्गवर्णन, प्रेम–कोणताही विषय आळविताना सांकेतिकता कुठेच सुटलेली नाही. दलितांविषयी, शेत-कऱ्यांविषयी जिव्हाळा प्रगट करताना त्याला तक्रारीचे फिर्यादीचे स्वरूप येते. काव्यात्मकता उणी पडते. वृत्त, छंद, जाती वापरल्या आहेत. परंतु त्यांतील अशुद्धपणा रसभंग करतो. त्यापेक्षा मुक्त रचना बरी.

परंतु काही काही कविता मनाला प्रसन्न करतात. त्यांत पहिला क्रमांक फुलराणीचा लागेल. "कोण करी ही जादु-गिरी ?" ' फुलमाळ ' याही जमल्या आहेत. शब्द, नादाची आणि हलक्याफुलक्या अर्थाची लय जुळली आहे. तशाच " कुंजवनामधि हृदय हरवले माझे ग ' " मधुरेच्या बाजारांत " " मुशाफिर " " आज कितीक दिसांनी " या कविताही उल्लेखनीय; अशा दृष्टीने की या कवितांवरून कवीला खास आपली स्वतःची अशी वाट अस्पष्ट का होईना दिसू लागली आहे असे वाटते. आणि कवी अधिक अंतर्मुख झाला तर ती त्याला खात्रीने दिसेल व तीवर तो आपल्या पायखुणाही उमटवील अशी आशा करायला हरकत नाही.

**पद्मावती गोळे**

● ● ●

## फुलवंती !

लेखक--**बलराम नांगरे**, अभय साहित्य. पृष्ठे ९६. मूल्य–चार रुपये.

बलराम नांगरे हे मराठी वाचकाला आता काहीसे परिचित झालेले नाव. काही कथासंग्रह व दोन कादंबऱ्या जमेच्या बाजूला. आता ही तिसरी कादंबरी फुलवंती ! कथा चाकोरीतलीच. खेड्यातली एक तरुण, सुंदर, देह-यष्टीने संपन्न, आकर्षक बांध्याची वगैरे स्त्री, तिच्यावर एका गावातल्या गुंड–टरेबाज वंडू खराडेची वाईट नजर, त्याच्याकडून तिच्यावर बलात्कार आणि फुल-वंतीचा मृत्यू ! तिचा आंधळा बाप, मनोमन प्रेम [illegible] गारा जयवंता इ. साहाय्यक पात्रे.

प्रास्ताविकात ' थोडेसे असंबद्ध–थोडेसे संबद्ध ' या शीर्षकाखाली वाचकाला समाजस्थितीबद्दल, राष्ट्रप्रेमा-बद्दल खूप ऐकवले आहे. मुळातच ते असंबद्ध असल्याची प्रामाणिक कबुली लेखकाने दिल्याने त्यातले सर्वच मनावर घेण्याचे काहीच कारण नाही. तरीही एक गोष्ट जाणवते की कादंबरीला सामाजिक सपकात्म चौकटीत बसवण्याचा एक प्रयत्न आहे.

लेखकाने अकारण लांबवलेले निवेदन मनी धरून कादंबरी वाचली तर खूपच निराशा होते. याचे कारण स्वच्छ आहे, ते म्हणजे लेखकाच्या मनातला जो रूप-कात्मक भव्य–दिव्य अर्थ आहे तो कादंबरी वाचताना कोठेच भावला नाही. फुलवंतीवरील बलात्कार आणि त्याच्या आसपासचे तेच तेच वर्णन यापलीकडे लेखक दूर जाऊ शकला नाही. घटनेपेक्षा त्याच्या होणाऱ्या परिणामातून आणि निर्माण होणाऱ्या परिस्थितीतून जी शोकात्म अवस्था होते ती आम्हांला अभिप्रेत आहे. वंडू खराडे आणि जयवंता यांच्या फुलवंतीवरील प्रेमाचे भिन्नभिन्न दृष्टिकोन अतिशय उथळ आहेत. त्या व्यक्ती म्हणून लेखक मानतो की प्रवृत्ती म्हणून ? प्रवृत्ती म्हणून जर त्या रूपकात्मक पद्धतीने अभिप्रेत असतील तर त्याची भीषणता, भयानकता तीव्रतेने, ठोकदारतेने जाणवली पाहिजे, आणि जर स्वतंत्र व्यक्ती म्हणून असतील तर त्यांच्या मनाचा तळ शोधून त्यातील अंत-रंगांच्या छटा स्पष्टतेने जाणवल्या पाहिजेत. तसेही होत नाही. लेखकाने मनात जेवढा अर्थ व्यापकपणे ठेवला तेवढा प्रत्यक्ष कथाविष्कारात उतरला नाही. फुलवंतीच्या देहसौंदर्याचे, पूर्णेश्वराला जाण्याचे वर्णन जेव्हा लेखक करतो त्याच वेळी त्या शब्दातून या स्त्रीवर काहीतरी विघटित प्रसंग येणार हे अगोदर कळते. त्यामुळे तिच्या-बद्दल कोणत्याच प्रकारची सहानुकंपा निर्माण होत नाही. वाचक घटनाप्रधान कथेत वा कादंबरीत स्वोत्कंठ वाचन करीत असतो. ती उत्कंठाच जर त्वरेने नष्ट पावली तर पुढचे सारे निवेदन नीरस, निर्जीव वाटते. त्यामुळे एक रूपक, वाया गेलेली कादंबरी आपण वाचल्याचे शेवटी ध्यानी येते.

समाज-राष्ट्र यातील विचारशक्ती जर ललित साहि-त्याच्या निमित्ताने व्यक्त करावयाच्या असतील तर त्या ताकदीने आल्या पाहिजेत. त्या जातीचे कथानक, पात्रे, प्रसंग, निवेदनशैली अपेक्षित आहे. त्यापेक्षा साधी कथा रंगवलेली बरी, आणि दुसरे म्हणजे प्रास्ताविकात लेखकाने अपेक्षा निर्माण करण्याचा धोका पत्करू नये. लेखकाला त्या कथाविश्वातून जो बोध होईल तो होवो. बोध व्हावा हा लेखकाचा हेतू दिसतो. लेखकाची दिशा चांगली आहे पण त्याकडे जाण्यासाठी जे पाथेय लागते त्याची उणीव आहे.

**वि. भा. देशपांडे**

● ● ●

अनुक्रमणिका



# सारसंकलन

## ' माझे लेखनगुरु ' या पुस्तकावरील पत्ररूप अभिप्राय*

P. No. 32707
५ मीनाबाग, New-Delhi
हल्ली मु. न्यायनिवास, वर्धा
३-१०-१९६५

Dr. M. S. Ancy M. P.

प्रिय मित्र माडखोलकर यांस,

सप्रेम आशीर्वाद, आपण ' माझे लेखनगुरु ' हा ग्रंथ मजकडे पाठविला. त्यावर रक्षाबंधन १२-८-६५ नागपूर ही तारीख आपल्या स्वाक्षरीसह आपल्या हस्ताक्षरांत लिहिलेली आहे. मजकडे ग्रंथ पोचल्याची ता. २६-८ ही आहे. मी ग्रंथाचे वाचन संपविल्याची ता. ३-१० ही आहे. आता रात्रीचे १०-२० मिनिटे झाली. मी त्या ग्रंथासंबंधाने माझा अभिप्राय थोडक्यात पाठवीत आहे. कारण येथून लवकरच मी दिल्लीस जाणार आहे. तेथे गेल्यावर मला कदाचित काही दिवस माझ्या पत्रव्यवहाराकडे पाहण्यासही अवकाश सापडणार नाही मग आपणाकडे अभिप्राय लिहून पाठविण्यास वेळ सापडणे दुरापास्तच होईल.

आपला ग्रंथ वाचत असता, रोजच्या रटाळ जागतिक व्यवहारातून क्षणभर मन निघून, साहित्यकाचे गुण-विश्लेषण करण्याच्या आपल्या वाङ्मयीन कला-कुसरीचे काम पाहण्यात ते दंग होऊन जाते. विद्यार्थीदशेत असताना मला कधी कधी नागपुरातील तत्कालीन नामांकित पंडितांचा संवाद ऐकण्याचा सुप्रसंग येत असे. त्यात एखाद्या श्लोकाचे विवेचन चालू असताना वक्ता निरनिराळ्या तऱ्हेने त्या कवीचा अभिप्राय दिग्दर्शित करण्यात आपल्या बुद्धीची पराकाष्ठा करी. एकाच श्लोकाचे निरनिराळे अर्थ, कोशाच्या व व्युत्पत्तीच्या आधारे, करून दाखवी. तेव्हा, त्या वक्त्याची रसिक व विद्वान पंडितांकडून मोठी प्रशंसा होत असे. पण त्या काळचे नागपूर नगरीतील श्रेष्ठ साहित्यशास्त्रज्ञ, रसिक-श्रेष्ठ व प्रासादिक कवी ह. भ. प. गोपाळजी हरदास यांचे मुखातून त्या वक्त्याच्या प्रशंसेपर एक वाक्य येत असे,-" जे नसे कवीच्या पोटी, ते येई टीकाकाराचे ओठी " कवीच्या कृतीपेक्षा टीकाकाराचीच करामत मोठी, असा त्यांच्या म्हणण्याचा अभिप्राय असे.

आपल्या या ८ गुरूंच्या गुण-गौरवात, कित्येक ठिकाणी आपण त्यातून जोड्या निवडून, त्यांच्या वैयक्तित्वाचे किंवा लेखनशैलीचे साम्य व भेद दाखविले आहेत. त्यात आपली कल्पकता, मार्मिकता, सूक्ष्म निरीक्षणशक्ती यांचा तर प्रत्यय येतोच; पण त्यावरोबरच आपल्या शब्द-सृष्टीच्या संपन्नतेकडे पाहून कौतुकच नव्हे, तर विस्मयही पण वाटतो.

दुसरी एक गोष्ट माझ्या लक्षात आली. तीही या लहानशा अभिप्रायलेखात सांगून टाकावीशी वाटते. तात्यासाहेब केळकर व तात्यासाहेब कोल्हटकर या दोन तात्यांची पकड आपले मनावर व आपली लेखनशैली आणि विचारसरणी यांवर आहे, असे वाटते पण आपण कोल्हटकरांना गुरुस्थान दिले, केळकरांकरिता केवळ गुरुतुल्य आदरस्थान दिले आहे. गडकरी व अच्युतराव कोल्हटकर यांनीही एके काळी आपले मन भारून टाकले असता, त्यांना आपण गुरुस्थानातून पदच्युत केले. इतकेच नाही, तर त्यांची गुरुगृहातूनसुद्धा हकालपट्टी केली आहे. आपण तात्यासाहेब कोल्हटकरांना अढळ गुरुस्थान दिले, ते त्यांनी जुन्या पंतोजीप्रमाणे, आपला हात धरून, दीर्घ कालपर्यंत आपले साहित्यलेखन, त्यांचे कल्पनेप्रमाणे, शुद्ध, सोज्वळ व सुंदर असावे, म्हणून जे मार्गदर्शन ते करीत राहिले, यामुळेच होय असे मला वाटते. आपण आपले लिखाण त्यांचेकडून पाठविले, म्हणजे कॉलेजमधील आचार्य ज्याप्रमाणे घट-

---

* ता. ४ फेब्रुवारी १९६८ च्या साप्ताहिक तरुण भारत, नागपूरमधून संपादकांच्या अनुज्ञेने साभार उद्धृत.

संपादक—म. सा. पत्रिका

आपल्या विद्यार्थ्यांचा आठवडे परीक्षेच्या उत्तराचा कागद तपासताना त्यात, अनेक चुका दाखवून, त्या दुरुस्त कशा कराव्या हेही सुचवित असतो, त्याचप्रमाणे आपले लिखाण त्यांनी दाखविलेल्या चुका व दुरुस्त्या यांनी चिताडलेले आपणाकडे परत येत असे, अशा अर्थाचे विधान आपल्या ग्रंथात आले आहे. त्यामुळे, त्यांचा पंतोजीपणा तुमच्या डोळ्यांत साहजिक भरला; व त्यांच्याविषयीची आदराची भावना परिणत होऊन आपण त्यांना आपले मनाचे देवघरात त्यांच्या पादुका मांडून गुरु म्हणून त्यांची मानसिक पूजा करण्याची प्रवृत्ती आपणात वळावली, असे मला वाटते; व ती योग्य व उचित आहे, असेही मी म्हणतो.

पण, महाराष्ट्रात गुरु करण्याचा सांप्रदाय कित्येक शतकांपासून वाढलेला आहे; व त्यात साधारणतः गुरुविषयीचा आदर, " उपासनेला दृढ चालवावे। भूदेवसंतांसि सदा नमावे। सत्कर्मयोगे वय घालवावे। सर्वांमुखी मंगल बोलवावे ", या श्लोकात दाखविलेल्या तऱ्हेने करण्याचा प्रघात दृष्टीस पडतो. त्यामुळे, वार्षिक उत्सव, पुण्यतिथी, कथाकीर्तन, ब्राह्मणभोजन, संतर्पणे, सीताकांतस्मरण, पार्वतीपते हरहर महादेव इत्यादी मंगल नामांचा उच्चार वगैरे व्यवस्थितपणे केले जातात. पण, त्या गुरूचे जे काही वैशिष्ट्य असेल, तदनुसार आपले व्यक्तित्व बनवण्याचा बुद्धिपुरस्सर व निष्ठायुक्त प्रयत्न करणारे योगी अरविंदासारखे किंवा स्वामी विवेकानंदासारखे शिष्य फारच कमी दृष्टीस पडतात. स्वामी विवेकानंद अथवा योगी अरविंद घोष या लोकोत्तर विभूतींच्या नावाचा मी उच्चार केलेला पाहून मी अभिप्राय लिहिण्याचे सोडून, कुठल्या कुठे भरकटत चाललो, असे आपणास वाटेल पण, माझा त्यात मुद्दा एवढाच आहे,— गुरूच्या शिक्षेचे मर्म काय हे समजून आपल्या आयुष्याचे नियमन तदनकूल—हेतुसिद्धयर्थ करणारे शिष्य फार विरळा आहेत. मग ते मर्म साहित्याचे असो, व्यवहारकुशलतेचे वा अध्यात्माचे असो. या दृष्टीने मी जेव्हा पाहतो, तेव्हा आपण कोल्हटकरांचे वैशिष्ट्य दाखविताना, इतर गुणांबरोबर त्यांच्या दोन गोष्टींचा ठळकपणे उल्लेख केला आहे. त्यांनी नाट्यलेखनात घडवून आणलेली क्रांति आणि मराठी वाङ्मयात विनोदी ढंगाने लिहिण्याचा त्यांनी केलेला उपक्रम. आपण लिहिलेल्या वर्तीस ४० ग्रंथांच्या वाङ्मयात ज्यात कोल्हटकरांच्या नाट्यलेखनाच्या वैशिष्ट्याचे, त्याचप्रमाणे त्यांनी मराठीत सर्वथैव नूतन उपक्रम केलेल्या विनोदी लेखनप्रथेचे प्रतिबिंब काही अंशी तरी पडले आहे, असे आपले ग्रंथ कोणते, याचे थोडेसे तरी दिग्दर्शन झाले असते, तर वाचकास आपल्या गुरुभक्तीचे स्वरूप आकलन करण्यास मदत झाली असती.

आता केळकरांसंबंधाने जे आपण लिहिले आहे, त्यात ' केळकरांची लोकोपयोगिता ' या मथळ्याखाली जे विवेचन केले आहे, ते मला त्यांचे संबंधीचा अनुभव आहे, त्याचेशी बहुंशी जुळणारे आहे. " माणसाने आपल्या उपयुक्ततेने आपली किंमत समाजाला पटवून दिली पाहिजे आणि ही त्याची उपयुक्तता हरएक बाबतीत समाजाला दिसली पाहिजे. " ते या बाबतीत शक्य तितक्या दक्षतेने वागत; व ते आपल्या उपयोगी पडतील अशी ज्याला अपेक्षा वाटली, त्याला ते आपल्या कल्पनेपेक्षा अधिक उपयोगी पडले, असाच अनुभव आला आहे. हा त्यांचा प्रकृतिधर्म होता म्हणूनच त्यांना न्या. मू. रानडे यांचे जीवन हेच अत्यंत आदरणीय व अनुकरणीय वाटत होते. हाच आदर्श मनात ठसला असल्यामुळे, त्यांच्यात भावनेचा उत्कटपणा, —लोकमान्य टिळकासारख्यांचे उजवे हात म्हणून सतत चोखपणे काम करीत असतांना सुद्धा— उत्पन्न झाला नाही. याचे एक उदाहरण मी देतो. कै. बा. तपस्वी डॉ. बाबासाहेब परांजपे यांनी आपल्या जीवनात सतत लोकांचे उपयोगी पडावे, हेच काम केले. जे लोक देशकार्य करीत, त्यांच्या रस्त्यात येणाऱ्या अडचणी नाहीशा करण्याकरिता उद्योग करण्यासाठी ते नेहमी तयार व तत्पर असत; व त्याबरोबरच, " मी माझे सर्व जीवन देशाचे सेवेस अर्पण केले आहे, माझे कुटुंबपोषण फार काय स्वतःचे उदरंभरण याकरिताही एक क्षण देखील मी खर्च करणार नाही, ज्या परमेश्वराने त्यांना निर्माण केले, तोच त्यांचा सांभाळ करील, " या विश्वासाने मोठ्या निर्धाराने त्यांनी आपल्या या असिधाराव्रताचे परिपालन केले. तात्यासाहेबांना तपस्वी बाबासाहेब परांजपे यांचेविषयी आदर होता; व त्यांच्या महनीय सेवेचीही त्यांना जाणीव होती. पण बाबासाहेबांची ती भीष्मप्रतिज्ञा त्यांना विवेकाची आहे, असे कधीच वाटले नाही. तात्यासाहेबांच्या लोकोपयुक्ततेला ही एक मुरड घालणारी अट होती.

आपल्यावरील वैयक्तिक जबाबदारी,—ती कौटुंबिक का का असेना,–तिला अजिबात लाथाडून जर कोणी दिव्य कर्म करावयाला निघाला, तर त्याच्या कार्याचा उद्देश व स्वरूप कितीही लोकोपयोगी असले, तरी त्यांना ते अनिष्टच वाटे. तात्यासाहेबांनी जर स्मृती लिहिली असती, तर त्यात वानप्रस्थ आणि संन्यास या दोन आश्रमास मान्यता तर दूरच राहिली, पण थारादेखील मिळाला नसता. आश्रितखाऊ वर्गात या लोकांची गणना करून, ते वर्ग नष्ट करता येतील त्या मार्गाने नष्ट करावे, असेच त्यांनी आपल्या स्मृतीत प्रतिपादिले असते.

तसेच तात्यासाहेब सामान्यतः शांत व विनोदी स्वभावाचे होते. पण, ते केव्हा उग्र रूप धारण करतील व मग काय बोलतील, याचा नियम नसे. एकदा ' टाइम्स ऑफ इंडिया 'च्या एका वार्ताहराने त्यांची मुलाखत घेतली. ती दुसऱ्या दिवशीच्या अंकात प्रसिद्ध झाली. तीत त्यांनी दिलेल्या मुलाखतीतील काही मजकूर आलेला नाही, असे आढळून आले. दुसऱ्या दिवशी तोच वार्ताहर पुन्हा त्यांचेकडे आला. त्याला पाहताच, सैंपाकघरात एखादे कुत्रे शिरायला लागले, म्हणजे जसा एखादा सोवळा ब्राह्मण हातात दगड घेऊन फेकतो व तोंडाने हाड हाड करीत त्याला अगदी घराचे आवाराबाहेर हाकून लावतो त्याप्रमाणे त्या वार्ताहराला, " माझे घरात येऊ नको, मला तुझ्याशी एक अक्षरदेखील बोलायचे नाही, " असे म्हणून त्याला त्यांनी घराचे बाहेर घालविला; व स्वतः घराचे बाहेर येऊन तो समोरच्या रस्त्यावर उभा असता, त्याच्यावर मोठमोठ्याने ओरडून रागावून ' निघूण जा,' असे ते सांगत होते. इतक्यात मी बाहेर कोठे तरी गेलो होतो, तो मी परत खिन्हाडावर आलो. तो रागाने गाजरासारखे लाल तोंड झालेले तात्यासाहेब व तो वार्ताहरही सडकेवर उभा राहून तात्यासाहेबांकडे हातवारे करून बोलत असलेला, असा अकल्पित पण मोठा खेदकारक देखावा मी पाहिला " टाइम्समध्ये आपला इंटरव्ह्यू यावा असे तुम्हालाही वाटत असते, " असे काही तरी वाक्य तो बोलला; व " माझी दोन पत्रे आहेत, मला प्रसिद्धीकरिता ' टाइम्स ' कडे येण्याची काही जरूर नाही, माझेकडे पुन्हा येऊ नको, तोंड दाखवू नको, " अशा अर्थाचे तात्यासाहेबांचे उत्तरादाखल त्यांच्याशी बोलणे इंग्रजीतून चाललेले दिसले. पण, तात्यांचा तो नृसिंहावतार मी जेव्हा पाहिला, तेव्हा एखादा कोकणातला भटजो बेफाम होऊन, आपल्या वागेतील फळे कोणी चोरून नेलेली पाहताच, जसा चवताळून त्याचे अंगावर जाऊन त्याला सारख्या शिव्या देत असतो, तसे मला तात्यासाहेब वाटले. पगडी घालणाऱ्या, सभ्य, सौम्य, सुशिक्षित व सुसंस्कृत तात्यासाहेबांच्या वरच्या चामडीच्या आत भांडखोर कोकणभटजी दडून बसला आहे, असा माझा तेव्हा ग्रह झाला; व कधी कधी तो अंगावर होऊन वरचे सर्व सभ्यतेचे कपडे फाडून आपले उग्र रूप दाखवीत असतो, असे मनात आले.

संयमाने मनुष्य प्रकृतीधर्म काबूत ठेवून वागतो. पण, सर्कशीतील उग्र जनावराप्रमाणे तो, रिंगमास्तरच्या चाबकाचे इशाऱ्यास न जुमानता, एखादे वेळी हल्ला करतो व गोंधळ उडवून देतो. " स्वभावो दुरतिक्रमः " असे म्हणण्याची पाळी मोठमोठ्या योग्यास देखील आलेली आपण पुराणांतरी वर्णिलेली पाहतो. त्या दिवशी जेवताना तात्यासाहेब नेहमीप्रमाणे गप्पागोष्टी करीत जेवले नाहीत. जेवण झाल्यावर पानसुपारी घेऊन वामकुक्षी केली, नंतर ' केसरी ' कचेरीत जाण्यासाठी निघाले, तो त्यांना मी शेजारच्या खोलीत काही तरी लिहीत बसलेला दिसलो. ते मला उद्देशून म्हणाले, " काल त्यांनी मुलाखत घेतली, त्यांतली दोन महत्त्वाची वाक्ये त्यांनी गाळून ती छापण्यास पाठविली. मी त्यांना निक्षून सांगितले होते की, यातले एक अक्षरदेखील गाळायचे नाही. पण हलकट सांगतील एक व करतील दुसरेच ! " मी त्यांना सहज म्हटले की, " त्यांनीच ती वाक्ये गाळून पाठविली, अशी तुमची खात्री झाली काय ? तुमच्याकडे छापायला पत्रे येतात त्यातला मजकूर तुम्ही मुख्य संपादक म्हणून कमी जास्त करीत असता की नाही ? असो. तात्यासाहेब, तुम्ही ते आता सर्व विसरून जा. पुन्हा कधी तो वार्ताहर भेटला, तर या गोष्टीचा खुलासा योग्य वाटला तर करून घ्या. " तात्यासाहेब हलक्या आवाजात पण मला ऐकू येईल अशा तऱ्हेने पुटपुटले, " त्याचेशी रस्त्यात उभे राहून मी भांडलो, हे बरे झाले नाही. असो. " असे म्हणून ते आपल्या कामास निघून गेले.

आपणही तात्यासाहेबांची स्तुती करता करता शब्दांचा फुलोरा उभा केला. पण, त्यात चांगल्या सुवासिक व सुंदर फुलांबरोबर, दिसायला बरे पण, वासाला अगदीच खराब अशाही शब्दसुमनांचा समावेश केलेला मला दृष्टीस पडला. " आगरकरांच्याशिवाय त्यांच्या व घट- ( तात्यासाहेब केळकरांइतका ) सरस बावदक

आणि बहुश्रुत संपादक महाराष्ट्रात केळकरांशिवाय दुसरा झालाच नाही. " या आपल्या प्रशंसेशी मी पुष्कळ अंशाने सहमत आहे. पण, ' वावदूक ' या शब्दाचा जो आपण येथे उपयोग केला, तो खरोखरीच अत्यंत अनुचित आहे असे मला वाटते. ' केसरी 'त या शब्दाच्या अर्थासंबंधाने एकदा वाद होऊन गेला होता. तो आपल्या लक्षात हे वर्णन लिहिण्याच्या ओघात आला नाही, असे स्पष्ट दिसते. महाराष्ट्रातील सुप्रसिद्ध मराठी भाषापंडित आणि वक्ते कै. प्रो. श्रीकृष्ण नीळकंठ चाफेकर यांनी, वसंतोत्सव व्याख्यानमालेत एका प्रसंगी, टिळक आणि आगरकर यांच्या लेखनपद्धतीचे व वादपद्धतीचे तुलनात्मक वर्णन केले. ते म्हणाले, " आगरकरांची पद्धती मल्लकी आणि टिळकांची वावदुकी अशी होती. " आपल्या विधानातही, आगरकर हे मोठे वावदूक होते व त्यानंतर केळकरच तेवढे वावदूक म्हणवून घेण्यास योग्य असे लेखक झाले, असे म्हटले आहे. चाफेकरांच्या या विधानावर ' केसरी 'त आक्षेप घेण्यात आला आणि टिळकांना वावदूक म्हटल्याबद्दल चाफेकरांची बरीच खरडपट्टी ' केसरी 'च्या संपादकीय टिप्पणातून केली होती. चाफेकरांचा अभिप्राय आगरकर हे सरळ व स्पष्ट वाद करणारे व टिळक हे डावपेचाने आपले म्हणणे प्रतिपक्षाचे गळयात बांधू इच्छिणारे हा होता; व त्यांनी 'वावदूक' हा शब्द त्यातील ध्वनिमाधुर्यामुळे, त्याचा खरा अर्थ काय हे न कळताच, वापरला. "वावदूकोऽतिवक्तरि" असा अमरकोशात त्याचा स्पष्ट अर्थ आहे. फाजील बोलणारा, वाह्यात बोलणारा, असंबद्ध बोलणारा असा त्या शब्दाचा अर्थ आहे. टिळकांच्या पद्धतीवर दुसरे काहीही आक्षप घेणाऱ्यांनी वाटल्यास घ्यावे. पण, असंबद्ध, फाजील, वाह्यात असे एक अक्षरदेखील त्यांच्या वाणीतून किंवा लेखणीतून निघाले, असे दाखविता येणार नाही. या ' केसरी 'तील स्फुटानंतर माझे कै. वा. मित्र चाफेकर यांना बरेच दिवस लोक " वावदूकी चाफेकर " म्हणून थट्टेने म्हणत असत; व ते अगदी तो शब्द ऐकताच खजील होऊन जात. आपण आपल्या वरील वाक्यात आगरकरांना वावदूक म्हटले आहे व त्यातच तात्यासाहेब केळकर हे त्या बाबतीत त्यांच्यापेक्षाही सरळ [illegible]ते असे ठासून सांगितले आहे. ही तात्यासाहेबांची व [illegible]गरकरांची स्तुती की निंदा ? खरे म्हटले, तर आपण [illegible] [illegible]ब्दात काही गुणगौरवदर्शक अर्थ आहे असे मानून [illegible]या[illegible] ओघात त्याचा उपयोग केला आहे. शब्दाच्या ध्वनीने आपण मोहून गेला व अर्थाच्या अनर्थ केला असे हे घडले.

पण, मला सामान्यतः असे आढळून येत आहे की, संस्कृत प्रौढ शब्दांचा व विशेषतः विशेषणांचा उपयोग करताना त्या शब्दांचा खरा अर्थ काय हे समजून घेऊन त्यांचा उपयोग करण्याची प्रवृत्ती लेखकात कमीच आहे. लेखक व वक्ते हे दोन्हीही या बाबतीत सारखेच दोषी असल्याचे दृष्टीस पडते. वावदूकी लिहिण्यात तात्यासाहेब केळकर व आगरकर हे दोघे मोठे पटाईत असे म्हणून आपण जी दुसरी तीन विशेषणे आपल्या मुख्य विधानाला उपोद्लक म्हणून दिली, ती फिकी पडली इतकेच नाही तर नुसती फुकट गेली.

आता शब्दाच्या प्रौढ स्वरूपामुळे पुष्कळदा लेखकांची व वाचकांची दोघांचीही कशी भ्रामक समजूत होते, याचे एक उदाहरण मला द्यावेसे वाटते व ते म्हणजे, मला पूज्य असलेल्या साहित्यसम्राट तात्यासाहेबांचाच सर्व महाराष्ट्रभर गाजलेल्या साहित्य-परिषदेच्या अध्यक्षपीठावरून केलेल्या भाषणात, ललित वाङ्मयापासून होणाऱ्या आनंदाची मीमांसा करताना, सविकल्प समाधीचा दाखला दिलेला आहे, तो होय. त्यासंबंधात तात्यासाहेब कोल्हटकरांनीही, तात्यासाहेबांच्या या सुप्रसिद्ध भाषणावर इतर बरीच टीका केलेली असली तरी या दृष्टान्ताबद्दल केळकरांची स्तुतीच केली आहे. " केळकरानी आत्मौपम्याबद्दलचा सिद्धान्त उपमादी अलंकारास लावला आहे. तेथे त्या सिद्धांताची कृत्रिमता दिसते. निर्विकल्प व सविकल्प समाधीचा दाखला या स्थळी अत्यंत समर्पक वाटतो, " असे आपले मत त्यांनी व्यक्त केले आहे. पण त्यापूर्वी त्यांनी एक वाक्य लिहिले आहे, ते असे,--" यापुढील वाङ्मयापासून होणाऱ्या आनंदाची मीमांसा सुंदर आहे. पण प्रत्ययोत्पादक नाही. परंतु तिच्यात सत्याचा अंश आहे, हे कबूल केले पाहिजे. "

या बाबतीत मला स्पष्टपणे सांगावेसे वाटते की, लोक ज्याप्रमाणे गाणे ऐकतात, त्याचप्रमाणे पुष्कळदा व्याख्यानेही ऐकतात. गाईलेल्या पदांचा अर्थ काहीही न कळता, ते मधुर आवाजातून एखाद्या चांगल्या रागातून गायले जात असतांना, श्रोता नुसता डुलतो. त्यातील पद्याच्या एखाद्या पदाचा अर्थदेखील त्याला कळला असेल किंवा नसेल. तशीच चांगल्या लेखकाचे

अनुक्रमणिका

लेख वाचताना किंवा वक्त्याचे व्याख्यान ऐकताना, पुष्कळदा आपणास पूज्य किंवा गूढ वाटणाऱ्या अशा अर्थाचे संदर्भ जेव्हा येतात, तेव्हा ते शब्द कानावर पडताच, वाचक व श्रोते यांवर एक प्रकारची मोहिनी पडते; व त्यांची चिकित्सक बुद्धी सुप्त होऊन तो पूर्वानुभूत भावनांच्या आनंदात नुसता डुलत राहतो. केळकरांना ललित-वाङ्मयापासून होणाऱ्या आनंदाची मीमांसा करायची होती; व त्याच्या गोडीचा प्रयत्य श्रोत्याला पटवून द्यायचा होता अशा वेळी दृष्टान्ताचा उपयोग करणे हे अपरिहार्य असते. जसे, भगवन्नामसंकीर्तनात गोडी आहे ती कशी, हे सांगताना कवी म्हणतो, "दधि मधुरं मधु मधुरं, द्राक्षा मधुरा सुधाऽपि मधुरैव मधुरादपि तन्मधुरं मधुरानाथस्य नाम यद्गीतम्." येथे कवीनी मधुरानाथ भगवान श्रीकृष्ण याच्या नामस्मरणाची गोडी चाखण्याची बुद्धी श्रोत्यांत निर्माण व्हावी म्हणून त्यांना चिरपरिचित जे पदार्थ होते व ज्यांच्या माधुर्याचा त्यांना प्रत्यक्ष अनुभव होता, त्यांचाच दृष्टान्त दिला; व आपला सिद्धान्त. त्यांना सुबोध व ग्राह्य केला. दृष्टान्त आणि उपमा यांचा मुख्य उद्देशच प्रतिपाद्य विषय त्यांच्या अनुभूतीवरून त्यांना आकलन करण्यास सुलभ व्हावा हा असतो; व म्हणूनच कवी, ग्रंथकार त्यांचा मोठ्या परिणामकारक रीतीने उपयोग करीत असतात.

ही कसोटी तात्यासाहेबांनी दिलेल्या या दृष्टान्तास लावून पाहू. ललित-वाङ्मयाचा आनंद कसा असतो, तो शब्दांनी अनिर्वाच्य आहे, म्हणून उपमा देऊन त्याचे दिग्दर्शन करणे अवश्य आहे व योग्य आहे. सविकल्प समाधीत मिळणाऱ्या आनंदाप्रमाणे तो आहे, असे म्हणणाऱ्या लेखकाला तरी सविकल्प समाधीचा आनंद कसा असतो, याची पुसट तरी कल्पना आहे काय? पण हा दृष्टान्त देऊन तात्यासाहेबांनी सिद्धान्त मांडल्याबरोबर लोकांनी टाळ्या का वाजविल्या व रसिकांनी माना का डोलविल्या? त्याचे कारण हे की, या शब्दाच्या उच्चाराबरोबर, या आनंदाचा अनुभव ज्यांनी घेतलेला आहे, असे आपण मानीत आलो, त्या योग्याची मूर्ती अंतश्चक्षूसमोर उभी राहते; व त्याच्या आदरार्थ त्या टाळ्या वाजविल्या जातात. दृष्टान्तामुळे सिद्धान्त कळण्यास काही मदत झाली म्हणून नाही. उलट, ते शब्द ऐकल्याबरोबर ज्या भक्तिभावना हृदयात उचंबळतात, त्यात सिद्धान्त व यावरील भाष्य त्या दोघांनाही प्रायशः जलसमाधी मिळाली असते, असेच म्हणणे सयुक्तिक होय. तात्यासाहेबांच्या वरील प्रौढ दृष्टान्त देऊन केलेल्या प्रतिपादनाने वाङ्मयानंदाचे स्वरूपाचा काहीही आविष्कार झाला नाही. उपमान व उपमेय यांतील गुणांचे साधर्म्य कळावयास त्यातील एखाद्या गुणाचा परिचय हा अवश्य नसेल, तर बोलणे वाया गेले व डोलणे व्यर्थ झाले म्हणून ही सर्व मीमांसा जरी सुंदर शब्दांत लिहिली असली, तरी खपुष्पान्वेषणाप्रमाणे ती निरर्थक आहे. यापेक्षा हा आनंद स्वसंवेद्य आहे, एकाने दुसऱ्यास सांगण्याजोगा नाही असे म्हटले, तर ते अधिक अर्थबोधक झाले असते. आहे हा प्रकार म्हणजे, "अन्धेन नीयमाना यथान्धाः" अशा प्रकारचा आहे. प्रौढ शब्दांच्या नादाची मोहिनी वाचकाला पाडणे ही लिखितवाङ्मयाची किमया प्रशंसनीय आहे, असे मी म्हणतो. पण ही आनंदाची व्याख्या किंवा मीमांसा नव्हे.

तात्यासाहेब हे हौशी लेखक होते. रसिक, विनोदी आणि कष्टाळू होते. त्यांचा लेखसंभार पुष्कळ आहे. त्या सर्वांची पातळी वरच्या दर्जाची आहे, असे म्हणावयास हरकत नाही. त्यांचा वाङ्मयविलास सर्वस्पर्शी आहे, असे यथार्थतेने म्हणता येईल. पण त्यांना 'साहित्य-सम्राट' ही पदवी देणाऱ्यांच्यापुढे त्यांनी केलेल्या वाङ्मयसेवेच्या उच्चतेपेक्षा, 'केसरी'चे संपादक म्हणून त्यांनी केलेली कामगिरीच मुख्यतः होती. 'लो. टिळकांचे त्रिखंडात्मक चरित्र' व 'इंग्रज आणि मराठे' हेच त्यांचे ग्रंथ वाङ्मयात चिरस्थायी होतील. पण, त्यामुळे त्यांना 'मराठी भाषेचे साहित्यसम्राट' ही पदवी अर्पण करण्यात, त्यांच्या राजकीय क्षेत्रातील कामगिरीचाच प्रभाव ज्यांचे मनावर पडला, त्यांचाच भाग विशेष होता, असे मला वाटते. तथापि, राजकारणाच्या धबडग्यात असताना तात्यासाहेब केळकर यांनी केलेली वाङ्मयसेवा पाहिली म्हणजे मला बंगालमधील सुप्रसिद्ध देशभक्त रमेशचंद्र दत्त यांची आठवण होते. पण, बंग वाङ्मयाचे सम्राट बंकिमचंद्र चट्टोपाध्यायच मात्र राहिले. रवींद्रनाथ टागोर जगद्वंद्य कवी झाले. पण साहित्यसम्राट 'आनंदमठा' सारख्या अमर कलाकृती निर्माण करणारे बंकिमबाबू चट्टोपाध्याय हेच होत. मराठी वाङ्मयाचा बंकिमबाबू किंवा रवीन्द्रनाथ अजून जन्मावयाचा आहे.

हे पत्र लांबवता लांबवता फारच लांबले. पण आपले पुस्तक वाचून खाली ठेवल्यापासून, हातात लेखणी घेऊन जे लिहीत सुटलो, ते कारण होय. अजून पुष्कळच घट-

नांचा उल्लेख आपल्या ग्रंथातील विवेचनावरून करावासा वाटतो.

आपण आगरकरांचा बुद्धिनिष्ठ अनीश्वरवादी मानवतेचा पुरस्कार हा विशेष गुण सांगितला व त्यांचे सुधारणांचे समर्थन हे काही समर्थनीय नाही असे म्हटले. पुष्कळ वर्षांपूर्वी प्रि. गोळे यांनी ' हिंदुधर्म आणि सुधारणा ' या ग्रंथात महाराष्ट्रातील सुधारणेच्या कल्पनांचा आणि चळवळीचा मूलगामी व व्यापक दृष्टीने विचार केला होता. त्यात, आपण जे आपल्या पुस्तकात लिहिले आहे त्याचे पूर्वनिरूपण सापडेल.

खाडिलकर हे अंतर्मुख वृत्तीचे व धीरोदात्त असे राष्ट्रपुरुष होते. त्यांच्यावर टीकेचा भडिमार चालला असतानासुद्धा त्यांनी उत्तर देण्याचा मोह मोठ्या संयमाने आवरून धरला हा त्यांचा मोठेपणा तात्यासाहेब केळकरांच्या वेळीअवेळी आत्मसमर्थन करण्याचे नावाने जुना कोळसा उगाळीत बसण्याचे प्रवृत्तीशी ताडून पाहिला म्हणजे त्यांचेविषयीचा आदर द्विगुणित होतो.

शेवटी आपण दादा ओगले यांचे विषयी जे लिहिले, त्यात आपली कृतज्ञताबुद्धी व दादाविषयीचा आदर फार उत्कृष्ट तऱ्हेने व्यक्त झालेला आहे.

परंतु, आपल्या सर्व ग्रंथांत अत्यंत वाचनीय व अंतःकरणास जाऊन भिडणारे प्रतिपादन हे आपण लोकमान्य टिळक यांचेवर जे " वज्रपुरुष ", " लोकमान्य " आणि " संपादक टिळक " हे तीन लेख लिहिले, त्यात पाहावयास मिळाले. तुमचे लेखनगुरू कोणी असतील वा नसतील पण, लोकमान्यांच्या शिकवणुकीचे प्रतिबिंब तुमच्या या लिखाणातून मला दृग्गोचर पडले.

असो. कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचेवरील तुमच्या निबंधाप्रमाणे हा ग्रंथसुद्धा विश्वविद्यालयीन विद्यार्थ्यांच्या नित्य वाचनात यावा असा आहे. कै. तात्यासाहेब केळकरांचे नंतर तुमच्याइतका बहुश्रुत, मार्मिक, कल्पक निबंधकार अलीकडील पिढीत माझे पाहाण्यात नाही. तुमचा हा ग्रंथ जर विद्यार्थ्यांचे अभ्यासक्रमात घालण्यात आला, तर मराठीतील आठ प्रमुख गुरुतुल्य लेखकांचा व पत्रकारांचा परिचय त्यांना उत्तम तऱ्हेने होईल; व भाषा, विवेचन, टीकापद्धती कशा प्रकारची असावी याचेही त्यास ज्ञान होईल. म्हणून मला विष्णुशास्त्र्यांवरील निबंधाइतकाच हा ग्रंथ विद्यार्थ्यांस अभ्यासनीय वाटतो.

आपल्या या ग्रंथाच्या निमित्ताने ८ थोर साहित्यिक-विभूतींचा वाङ्मय सहवास करण्यात माझा काही वेळ गेला, याबद्दल मला आनंद वाटतो. म्हणून तुमचे आभार मानून हे पत्रलेखन पुरे करतो.

आपला,

**बापूजी अणे**

( माधव श्रीहरी अणे )*

●

## महाराष्ट्र साहित्य परिषद

### विशेष दुखवटा सभा, १५–३–१९६८

### कै. डॉ. नारायण गोविंद तथा नानासाहेब चापेकर

महाराष्ट्र साहित्य संमेलनाच्या बडोदा अधिवेशनाचे ( १९३४ ) अध्यक्ष, महाराष्ट्र साहित्य परिषदेचे आजीव सभासद, परिषदेच्या कार्यकारी मंडळाचे अध्यक्ष ( १९२७–१९३७ ) व परिषदेच्या महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचे संपादक ( १९२८–१९३६ ) श्री. डॉ. नारायण गोविंद तथा नानासाहेब चापेकर यास बदलापूर मुक्कामी बुधवार ता. ६ मार्च १९६८ रोजी पहाटेस १ वाजता देवाज्ञा झाली, याबद्दल महाराष्ट्र साहित्य परिषदेची ही विशेष सभा आपला तीव्र शोक व्यक्त करीत आहे.

नानासाहेबांचे समग्र जीवन ज्ञानसेवा व समाजसेवा यातच, त्यांच्या अंतकालापर्यंत, व्यतीत झाले. विशेषतः शासकीय न्यायखात्यातून १९२५ साली निवृत्त झाल्यापासून गेली चाळीसहून अधिक वर्षे त्यांच्या या द्विविध सेवारूप जीवनाचा वृक्ष विशेषच फोफावला.

---

*लोकनायक डॉ. बापूजी अणे यांनी हे पत्र मला ता. ३–१०–१९६५ रोजी लिहिले. ते लिहिल्यावर ते लगेच वर्ध्याहून दिल्लीला निघून गेले. म्हणून, मी त्यांना दिल्लीच्या पत्त्यावर पत्र पाठवून हे पत्र प्रसिद्ध करण्याची परवानगी मागितली तेव्हा दिल्लीहून ता. १५–१०–६५ रोजी मला धाडलेल्या उत्तरात त्यांनी असे लिहिले की, हे पत्र माझे हयातीत प्रसिद्ध करणे मला इष्ट वाटत नाही माझ्यामागे ते तुम्ही ' तरुण भारता ' त प्रसिद्ध करावयाला किंवा आपले ग्रंथात घालावयाला माझी हरकत नाही. आज प्रसिद्ध केल्याने वादास जागा उत्पन्न होईल या त्यांच्या मृत्युनंतर आज प्रसिद्ध करीत आहे.

**ग. त्र्यं. माडखोलकर**

त्यांची ज्ञानसेवा ही त्यांच्या शासकीय सेवेच्या काळात तज्ज्ञ शास्त्रीपंडितांच्या मार्गदर्शनाने त्यांनी केलेल्या प्राचीन पवित्र ग्रंथांच्या विस्तृत अध्ययनाच्या रूपाने त्यांनी चालविली, तर त्या कालातील त्यांची समाजसेवा ही त्यांनी त्यांचे काही पहिले पहिले लेख व ग्रंथ यांच्या रूपाने केली. त्यांचे लेखकीय जीवन १८९६ साली सुरु झाले व ते अखंडपणे त्यांच्या निर्याणापर्यंत म्हणजे ७०–७२ वर्षे चालू होते. इतके दीर्घकाळ लेखन केलेले लेखक क्वचितच असतील.

त्यांच्या ज्ञानसेवेची मूळची प्रेरणा जरी प्राचीन भारतीय पवित्र ग्रंथ आत्मसात करण्याची होती, तरी तिला, त्यांच्या तरुणपणीच त्यांचे एक महाविद्यालयीन स्कॉच प्रोफेसर मॅकॉमिश यांच्याशी केवळ यदृच्छेने झालेल्या त्यांच्या एका संभाषणातून, संशोधकीय आणि सामाजिक व समाजशास्त्रीय वळण मिळाले. हे वळण त्यांनी लिहिलेल्या सुमारे वीस ग्रंथांतून व असंख्य लेखांतून ठळकपण दिसते. त्यांच्या लेखनाचे हे स्वरूप त्यांच्या "आमचा गांव-बदलापूर" (१९३३) या ग्रंथात परमोच्च प्रकर्षाने प्रत्ययास येते. या त्यांच्या ग्रंथाने मराठीत व महाराष्ट्रात, व बहुशः भारतातही ज्ञानाच्या क्षेत्रात काही नवनिर्मिती केली असे म्हणण्यास हरकत नाही.

त्यांची त्यांच्या लेखनातील प्रधानदृष्टी सामाजिक व समाजशास्त्रीय होती, तसेच विविध ज्ञानशाखांतून मराठी भाषेत लेखन करून तिला समृद्ध करण्याची ईर्षाही होती. त्यांच्या लेखनाचे विषय विविधप्रकारचे होते. इतिहास, चरित्र व आत्मचरित्र, अर्थव्यवहार, समाजघटना, धार्मिक विधी, मराठी भाषा व साहित्य, वेदवाङ्मय, राज्यघटना, जातिसंस्था, कुलेतिहास, प्रवास इत्यादी इत्यादी विषयांवर व तदनुरूप प्रकारचे विपुल ग्रंथलेखन त्यांनी केलेले असून त्यात त्यांची संशोधकीय व समाजशास्त्रीय दृष्टी सर्वत्र दिसून येते. ही त्यांची दृष्टी त्यांच्या विपुल व विविध निबंधलेखनांतही कायम असून हे त्यांचे लेखन मधूनमधून ललितस्वरूपही धारण करते. त्यांच्या लेखनातील त्यांचे मतप्रदर्शन सुस्पष्ट व कधीकधी परखड शब्दांत केलेले आढळते.

त्यांच्या समाजसेवेत त्यांनी विविध संस्थांतून त्यांचे सभासद व पदाधिकारी म्हणून केलेल्या कार्याचा उल्लेख केला पाहिजे. भारत इतिहास संशोधक मंडळ, राजवाडे संशोधन मंडळ, मराठी ग्रंथोत्तेजक मंडळ, लोकशिक्षण मंडळ, औंध संस्थान, ग्रामीण विकास मंडळ, फर्ग्युसन महाविद्यालय, लँड मॉर्गेज बँक, इत्यादी संस्थांतून त्यांनी विविध प्रकारचे व लोकोपयोगी कार्य निःस्वार्थबुद्धीने केले आहे. परंतु त्यांचे संस्थाविषयक सर्वोच्च कार्य महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या त्यांनी केलेल्या सेवेतच झालेले आहे. सेवानिवृत्तीनंतर ते जेव्हा परिषदेचे कार्याध्यक्ष झाले, तेव्हा परिषदेचे काम जोमाने व्हावे म्हणून त्यांनी संघटित प्रयत्न करून परिषदेच्या कचेरीचे मुंबईहून पुण्यास स्थलांतर करविले, आणि त्यानंतर त्यांनी आपल्या कष्टांनी व संघटनाचातुर्याने जो कायापालट घडवून आणिला तो केवळ अजोड ठरला. या त्यांच्या सर्व कार्यांत समावेशक व संग्राहकवृत्तीने भिन्न स्वभावांच्याही सहकाऱ्यांस एकत्र आणू व एकत्र ठेवू शकणाऱ्या त्यांच्या स्वभावसामर्थ्याचा त्यांनी भरपूर व यशस्वी उपयोग केला. त्यांनी परिषदेची कचेरी व्यवस्थितपणे थाटली, तीसाठी योग्य सहकाऱ्यांची नेमणूक केली, परिषदेसाठी स्वतःच्या खर्चाने असंख्य बदलापूर-पुणे फेऱ्या केल्या, परिषदेसाठी औंधकर पंतप्रतिनिधींकडून जागा मिळविली, व तीवर वास्तू उभारली, साहित्य-पत्रिका जोमाने चालविली, परिषदेच्या त्यावेळेपर्यंत उपेक्षित असलेल्या कार्यांत साहित्यिकांचे व इतरांचेही सहकार्य मिळविले, धनिकांकडून द्रव्यसाहाय्य मिळविले, व इतरही अनेक प्रकारचे कार्य करून योग्य वेळ येताच त्या कार्यातून ते आपणहून निवृत्तही झाले. परिषदेच्या आजच्या इमारतीच्या व कामाच्या पसाऱ्याच्या पायात नानासाहेबांचे हे सर्व कार्य बहुमोल आहे याची परिषदेस हार्दिक व कृतज्ञ जाणीव आहे.

नानासाहेबांच्या ज्ञानसेवा व समाजसेवा या दोन मूलभूत प्रेरणांचा सुंदर समन्वय म्हणजे त्यांनी बदलापुरास आपल्या मातुःश्रीच्या वार्षिक श्राद्धदिनी वर्षानुवर्षे घस सोसून व खस्ता खाऊन भरविलेली विद्वानांची व सुहृदांची संमेलने होत. या संमेलनांतून सत्कार्य व्यक्तींचे जसे सत्कारसमारंभ होत, व त्याद्वारा त्या व्यक्तीस आपल्या कार्याचे चीज झालेले वाटून उत्तेजन मिळे, व होतकरूस प्रोत्साहन मिळे, तसे त्यातून भाषणे-चर्चा-परिसंवाद-कीर्तने अथवा प्रवचने यांच्याही मैफली रंगत. ही बदलापुरी संमेलने होत त्या वेळी ती जिज्ञासेचा व कुतूहलाचा विषय होत असत.

आणि त्यायोगे विद्वानांत विचारप्रवर्तन व समाजात सत्कार्यप्रेरणही होत असे.

या सर्व कार्याचे महर्षी नानासाहेब हे महाराष्ट्राचे, भारताचे एक महान सुपुत्र होत. त्यांच्या या सर्व कार्याची दखल घेऊन पुणे विद्यापीठाने अलीकडेच त्यास आपली सन्मान्य डॉ. लिट. ही सर्वोच्च पदवी अर्पण करुन त्यांचा जो परम गौरव केला, त्यामुळे सर्वांनाच फार समाधान वाटले. पाचच महिन्यांनी ते आपल्या शंभराव्या वर्षात पदार्पण करणार होते, इतक्यात त्यांनी आपल्या प्रिय बदलापूर ग्रामी अनंतात निर्याण केले. त्याची हळहळ सर्वांस वाटणे साहजिक आहे.

परिषदेची ही सभा नानासाहेबांबद्दल आपली परम आदराची व कृतज्ञतेची भावना व्यक्त करुन त्यांस आपली श्रद्धांजली अर्पण करीत आहे व श्रीमती वहिनी व त्यांच्या कुटुंबियांबद्दल त्यांच्या दुःखात आपली हार्दिक सहानुभूती व्यक्त करीत आहे.

• • •

## साभार स्वीकार

**भावपुष्प** : लेखक व प्रकाशक रा. वा. खिरे, २१२ कसबा, पुणे ११; २० पैसे.

**भावसुमनांजलि** : लेखक व प्रकाशक रा. वा. खिरे, २१२ कसबा, पुणे ११, ३० पैसे.

**ग. म. नातू ह्यांचे चरित्र व कामगिरी** : ले. व प्रकाशक ग. म. नातू, चिमण्या गणपतीजवळ, पुणे २; ५ रु.

अनुक्रमणिका

# पत्रव्यवहार

(१)

श्री. संपादक "महाराष्ट्र साहित्य पत्रिका" यांस

"पत्रिके"च्या आक्टोबर–डिसेंबर १९६७ च्या अंकातील मु. ग. पानसे यांचा "प्रादेशिक भाषा : शिक्षणाचे माध्यम" हा लेख वाचला. एका मुद्द्याचा त्यांनी विचार केलेला नाही आणि तो भारताच्या सद्यःस्थितीत अत्यंत महत्त्वाचा आहे. उच्च शिक्षणाचे माध्यम प्रादेशिक भाषा असावे असे क्षणभर मान्य केले (मी ते मान्य करीत नाही) तर प्रत्येक प्रदेशात राहणारे किंवा उद्योगधंद्यांमुळे अथवा देशाच्या कार्याकरता एका प्रदेशातून दुसऱ्या प्रदेशात जाणे जरूर असणारे जे लोक आहेत त्यांची आपण काही सोय करणार आहोत की नाही? थोडक्यात म्हणजे **एका भाषिक राज्यात इतर भाषांतून शिक्षण देणाऱ्या संस्था** चालू दिल्या जाणार आहेत की नाही? (घटनेच्या ३० व्या कलमाने हा हक्क सर्व अल्पसंख्याकांना दिलेला आहे.)

माझ्या मते जर निरनिराळ्या माध्यमांतून शिक्षण देणाऱ्या संस्था निरनिराळ्या भाषिक प्रदेशांतून चालू दिल्या नाहीत तर विद्यार्थी व शिक्षक यांची देवाणघेवाण बंद पडेल व भारत हे संघराज्य राहणारच नाही. दुय्यम शिक्षणात आजही अनेक भाषांतून शिक्षण देणाऱ्या शाळा बहुतेक सर्व मोठ्या शहरांत आहेत. उच्च शिक्षणातही ती पद्धत चालू ठेवणे जरूर आहे. फार तर एवढाच फरक करावा लागेल की प्रत्येक राज्यात प्रादेशिक भाषा व अखिल भारतीय भाषा अशा दोन माध्यमांचा स्वीकार करावा लागेल. ही अखिल भारतीय भाषा उच्च शिक्षणाच्या व संशोधनाच्या संदर्भात आज इंग्रजी आहे व आणखी बरीच वर्षे ती इंग्रजीच राहील. सर्व राज्यांतील उच्च शिक्षण घेऊ इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांना व त्यांना शिकवणाऱ्या शिक्षकांना हिंदी येऊ लागली म्हणजे इंग्रजीची जागा हिंदी घेऊ शकेल.

प्रत्येक राज्यातील उच्च शिक्षणाचे माध्यम तेथील प्रादेशिक भाषा ठेवल्यास उच्च पातळीवरील वैचारिक देवघेव कशी होणार हा एक मोठा महत्त्वाचा प्रश्न आहे. श्री. पानसे "इंग्रजीची गरज" ह्या पृष्ठ ६ वरील परिच्छेदात इंग्रजी भाषेचा अभ्यास चालू ठेवण्याची आवश्यकता प्रतिपादतात; पण ज्यांना आजकालच्या विद्यार्थ्यांची मनोभूमिका ठाऊक आहे ते सहज जाणू शकतील, की जरी इंग्रजीचे ज्ञान प्रत्येक परीक्षेला सक्तीचे ठेवले (म्हणजे ३० किंवा ३३ टक्के गुण मिळवणे जरूर असले) तरी परिणामी विद्यार्थी प्रादेशिक भाषेतील पुस्तके अगर त्यांवरील टीपाच वाचणार व इंग्रजी ग्रंथांशी त्यांची तोंडओळखदेखील होणार नाही. अखिल भारतीय पातळीवर (व म्हणूनच उच्च शिक्षणात) विचारविनिमय इंग्रजीतच होऊ शकत आहे व अनेक वर्षे तो इंग्रजीतच होणे शक्य आहे ही वस्तुस्थिती आहे. हिंदी भाषा संपन्न होऊन बिगर हिंदी भाषिकांनी अखिल भारतीय पातळीवरील विचारविनिमयाकरता तिचा खुल्या मनाने स्वीकार केल्याशिवाय इंग्रजीची जागा हिंदी घेऊ शकणार नाही.

आणखी एक मुद्दा. सर्व प्रदेशात "अखिल भारतीय शिक्षण आणि संशोधन संस्था" आहेत. मला वाटते श्री. पानसेही अशाच एका संशोधन संस्थेत आहेत. ह्या संस्थांत कोणचे माध्यम वापरणार? त्या ज्या राज्यात असतील तेथील भाषा? की हिंदी? आज व आणखी अनेक वर्षे हे दोन्ही पर्याय अशक्य आहेत. उदाहरणार्थ, पवई येथील तांत्रिक संस्था किंवा डेक्कन कॉलेजातील भाषाशास्त्र विभाग येथील सर्व शिक्षण मराठीतून (प्रादेशिक भाषा) अगर हिंदीतून (तथाकथित राष्ट्रभाषा) देणे शक्य आहे का? वर म्हटल्याप्रमाणे आज तर नाहीच पण १०–२० वर्षांतही नाही. मराठी वापरल्यास परप्रांतीय शिक्षक व विद्यार्थी यांची हकालपट्टी करावी लागेल (मग ह्या संस्था "अखिल-भारतीय" कशा? आणि केवळ मराठी जाणणारेच प्राध्यापक नेमल्यास त्यांचा दर्जा काय राहील?), व हिंदी वापरल्यास कुठले विद्यार्थी व शिक्षक त्या संस्थांत येतील हा प्रश्नच राहील.

सारांश, बहुभाषिक संघराज्यात "आपला दैनंदिन व्यवहार आपण ज्या भाषेत करतो किंवा ज्या भाषेत आपण नेहमी मनात विचार करीत असतो तीच भाष

अनुक्रमणिका

सध्याच्या शास्त्रीय विचारप्रवाहाचा वेग आणि प्रगती लक्षात घेतली तर फक्त इंग्रजीवर विसंबून यापुढे भागणार नाही. जर्मन, फ्रेंच, रशियन वगैरे भाषांचे ज्ञान संशोधकाला मिळविले पाहिजे. शास्त्रीय क्षेत्रात राष्ट्र वर यायचे असेल तर आपले क्षितिज बरेच विस्तारले पाहिजे. तशीच ज्ञानाची खोलीदेखील खूप वाढणे जरूर आहे." एकंदर संशोधनाबद्दल हा विचार असल्यामुळे विचारलेल्या प्रश्नाचे प्रयोजनच उरत नाही.

आपल्या संस्कृतीशी असलेले लागेबांधे न तोडता, त्यांना एकदम दूर न सारता, अंतःप्रेरणेशी प्रामाणिक राहून जगातल्या ज्ञानाने विद्यार्थ्यांच्या मनावर संस्कार घडवणे हे शिक्षणाचे ध्येय असेल, तर ते संस्कार **प्रथम** प्रादेशिक भाषेतून घडविणे हे केव्हाही श्रेयस्कर ठरेल (पृ. ११) अशी माझी धारणा आहे. शेवटपर्यंत इंग्रजीवरच सर्व भार टाकून विसंबणे भाग आहे, हे मला पटत नसल्यामुळे "इंग्रजीशिवाय आपले चालूच शकणार नाही असे वाटत असेल त्यांनी जर्मन भाषा व्यवहाराकडे पाहावे" (पृ. १०) असे मी सुचविले आहे. मला वाटते श्री. दि. धों. कर्वे यांचा जर्मन भाषेशी परिचय आहे.

**मु. ग. पानसे**

●

## (३)

संपादक, महाराष्ट्र साहित्य पत्रिका यांस—

गेल्या काही वर्षांमध्ये मराठीत अनेक हौशी साहित्यिक कालिकांचा उदय वा उदयास्त झालेला दिसतो. त्यांची बाह्य लक्षणे अशीः पानांचा आकार पुष्कळदा पुस्तकाएवढा किंवा त्याहून लहान, पानांची संख्या थोडी, निश्चित वर्गणी असतेच असे नाही, बहुशः सांगून-सवरून अनियतकालिक, टपाल-सवलतीसाठी जरूर असलेली सरकार दप्तरी नोंद करून घेतलेलीच असते असे नाही. शिलाई नसून केवळ घड्याच घातलेल्या असू शकतात, मुद्रित किंवा चक्रमुद्रित, वेगळ्या कागदाचे मलपृष्ठ असतेच असे नाही. आत मजकूर मात्र एरव्हीच्या साहित्यिक कालिकांमध्ये असतो त्या प्रकारचा-म्हणजे कविता, गोष्टी, निबंध, संपादकीय, परीक्षणे, नाटिका, इत्यादी. उदाहरणार्थ नावेच घ्यायची झाली तर-छंद, शब्द (चक्रमुद्रित), शब्द (मुद्रित), अथर्व, असो, आत्ता, टिंब, फक्त (चक्रमुद्रित), भारूड, वाचा, मृग, येरु, व.

पश्चिमेकडे Little Reviews किंवा Little Magazines ह्या नावाने ओळखला जाणारा एक प्रकार आहे त्याची आठवण येथे होते. अलीकडील काही नामवंत लेखकांचे लिखाण अशा Little Reviews मधून वाचकांसमोर प्रथम आले. (पुण्याच्या वसंत व्याख्यानमालेत उपवक्ते म्हणून काही नामवंत वक्ते प्रथम चमकले असे ऐकतो, त्यासारखा हा प्रकार दिसतो. उपवक्त्यांची पद्धत अलीकडे बंद केली आहे ती गोष्ट वेगळी.) आता प्रश्न उपस्थित होतो की मराठी साहित्यसृष्टीत छंद-आदि कालिकांचे स्थान कोणते? ह्या प्रश्नाचे उत्तर शोधण्यासाठी म्हणा, एरव्हीसाठी म्हणा अशा कालिकांचा जास्तीतजास्त पुरा संग्रह महाराष्ट्र-साहित्य-परिषदेमध्ये होत राहणे जरूर आहे हा विचार परिषदेच्या कार्यकर्त्यांपुढे आणि इतरांपुढेही मी ह्या पत्राद्वारे मांडीत आहे. सूचीकार दात्यांच्या प्रेरणेने नियतकालिक सूचीचे काम जे करीत आहेत त्यांनाही ह्या कामाचा उपयोग होईल. तरी-

(१) परिषदेच्या ग्रंथालय-समितीने ह्या बाबतीत पुढाकार घ्यावा,

(२) अशा कालिकांच्या चालकांनी आणि अन्य चाहत्यांनी जुन्या अंकांचे पुरे किंवा अपुरे संग्रह देऊ करावे आणि चालू अंकांची भर पडत राहील अशी व्यवस्था करावी,

(३) अशा कालिकाबद्दल माहिती (नाव गाव, पत्ता, उदय, अस्त इत्यादी) मिळवून वाचकांनी परिषदेकडे पाठवावी,

(४) इतर साहित्यिक कालिकांनी आणि ग्रंथपालन प्रकाशन विषेसाठी वाहिलेल्या कालिकांनी ह्या उपक्रमास जरूर ती प्रसिद्धी द्यावी.

**अशोक रा. केळकर**

● ● ●

## महाराष्ट्र साहित्य परिषद्

टिळकरस्ता, पुणे २
दि. २५ जून १९६८

### नियामक मंडळाची सभा

स. न. वि. वि.

परिषदेच्या नियामक मंडळाची सभा रविवार दि. २१ जुलै १९६८ रोजी दुपारी ३ वाजता पुणे येथे मा. प. सभागृहात भरणार आहे. मंडळाच्या सर्व सभासदांनी सभेला उपस्थित व्हावे, ही विनंती.

**कामे**

१ दुखवटा
२ मागील सभेचा वृत्तान्त वाचून संमत करणे.
३ १९६७-६८ सालचे वार्षिक इतिवृत्त संमत करणे.
४ १९६७-६८ ची उत्पन्न-खर्च व ताळेबंद पत्रके संमत करणे.
५ १९६८-६९ चा अर्थसंकल्प संमत करणे.
६ पत्रव्यवहार
७ अध्यक्षांच्या संमतीने आयत्या वेळी येणारी कामे.

अ. गं. मंगरूळकर
मो. रा. वाळंबे
द. बा. डावरे
चिटणीस

स. कृ पाध्ये
खजिनदार

श्री. ना. बनहट्टी
अध्यक्ष

रा. शं. वाळिंबे
कार्याध्यक्ष

---

## महाराष्ट्र साहित्य परिषद्

टिळकरस्ता, पुणे २.
दि. २५ जून १९६८

### ( वार्षिक साधारण सभा )

स. न. वि. वि.

परिषदेची वार्षिक साधारण सभा रविवार दि. २१ जुलै १९६८ रोजी पुणे येथे मा. प. सभागृहात भरणार आहे. सभेला सर्व सभासदांनी उपस्थित व्हावे, ही विनंती.

**कामे**

१ दुखवटा
२ मागील सभेचा वृत्तान्त वाचून संमत करणे.
३ १९६७-६८ सालचे वार्षिक इतिवृत्त संमत करणे.
४ १९६७-६८ ची उत्पन्नखर्च व ताळेबंद पत्रके संमत करणे.
५ १९६८-६९ चा अर्थसंकल्प संमत करणे.
६ हिशेब तपासनिसांची नियुक्ती करणे.
७ पत्रव्यवहार.
८ अध्यक्षांच्या संमतीने आयत्या वेळी येणारी कामे.

अ. गं. मंगरूळकर
मो. रा. वाळंबे
द. बा. डावरे
चिटणीस

स. कृ. पाध्ये
खजिनदार

श्री. ना. बनहट्टी
अध्यक्ष

रा. शं. वाळिंबे
कार्याध्यक्ष

टीपः— कोणाही सभासदास वार्षिक वृत्तान्त वा हिशेबपत्रके यासंबंधी सभेत ठराव मांडावयाचे असल्यास त्याने ठरावाची लेखी सूचना सभेच्या अगोदर सात दिवस कार्याध्यक्षांकडे पाठविली पाहिजे.



अनुक्रमणिका

**G. M. OKA & Co.**
Chartered Accountants
M. P. MARATHE, B. Com. F. C. A.

Phone 56143
180, Budhawar Peth
Laxmi Rd., Poona 2.

## AUDITORS REPORT

We, the undersigned Auditors have audited the accounts of the Maharashtra Sahitya Parishad Poona, for the year ended 31st March 1968 and have to state as under :—

(a) that the accounts are kept regularly and in accordance with the provisions of the Act and Rules;

(b) receipts and disbursements are properly and correctly shown in the accounts;

(c) cash balance and vouchers in the custody of the trustees on the date of audit were in agreement with the accounts;

(d) all books, deeds, accounts, vouchers and other documents and records required by us were produced before us;

(e) an inventory certified by the trustees of the moveables of the Trust has been maintained;

(f) no property or funds of the Trust were applied for any object or purpose other than the object or purpose of the Trust;

(g) the Trustees appeared before us and furnished the necessary information required by us;

(h) repairs and constructions over Rs. 5000/- have been carried out under the supervision of the management and no tenders were called for;

(i) there are no outstandings over one year and no amounts have been written off as bad debts;

(j) no money of the public trust has been invested contrary to the provisions of Sec. 35 of the trusts act;

(k) there were no alienations of the immoveable property contrary to the provisions and Sec. 36 of the Trusts Act.

**G. M. OKA & Co.**
Chartered Accountants
18th May, 1968

अनुक्रमणिका

महाराष्ट्र-साहित्य-परिषद, पुणे-२

# वार्षिक वृत्तान्त

## ( सन १९६७–६८ )

**सभासदसंख्या :** वर्षारंभी व वर्षअखेर परिषदेची सभासदसंख्या पुढीलप्रमाणे आहे :

| | १९६६-६७ | १९६७-६८ |
|---|---|---|
| उपकर्ते | २ | २ |
| आश्रयदाते | ५ | ६ (+१) |
| सहायक | ७ | ७ |
| हितचिंतक | १८ | १७ |
| तहाहयात | ५५८ | ५६५ (+७) |
| साधारण | १०७० | ११९० (+१२०) |
| एकूण | १६६० | १७८८ |

( एकूण वाढ १२८ )

सभासदसंख्येत प्रत्यक्ष वाढ तहाहयात १४ व साधारण १३५ अशी झालेली आहे. तथापि काही तहाहयात सभासदांचे निधन झाल्यामुळे व काही साधारण सभासदांनी आपणांस कमी करण्याची विनंती केल्यामुळे तहाहयात व साधारण–सभासदसंख्येत अनुक्रमे ७ व १२० अशी वाढ झालेली दिसून येईल. ज्यांची वर्गणी आली नाही, असे साधारण सभासदांपैकी बाकीदार सभासद ४८८ आहेत.

सभासदसंख्येव्यतिरिक्त परिषदेच्या पटावर ६ शाखा-सभा, २२ संलग्न संस्था व १५० पत्रिका–वर्गणीदार आहेत.

### विविध समित्या

परिषदेच्या नव्या कार्यकारी मंडळाची सभा १६–४–६७ रोजी भरली होती. या सभेत विविध कार्यांसाठी ज्या समित्या नियुक्त झाल्या त्या येणेप्रमाणेः–

( १ ) **संपादक मंडळ** :––के. नारायण काळे ( मुख्य संपादक ), वा. ल. कुलकर्णी, गो. म. कुलकर्णी, स. शि. भावे, मो. रा. वाळंबे ( चिटणीस )

( २ ) **सभासद-मंजुरी** :––रा. शं. वाळिंबे ( कार्याध्यक्ष ), दि. के. बेडेकर, श्रीपाद जोशी, अ. गं. मंगरूळकर ( निमंत्रक )

( ३ ) **वास्तु** :––रा. शं. वाळिंबे ( कार्याध्यक्ष ) मो. रा. वाळंबे , द. र. कवठेकर, ग. ल. ठोकळ, गं. ना. जोगळेकर, स. कृ. पाध्ये ( निमंत्रक )

( ४ ) **चर्चा–कार्यक्रम** :––के. नारायण काळे, प्रभाकर पाध्ये, भीमराव कुलकर्णी, विद्याधर पुंडलीक, आनंद यादव, ग. ल. ठोकळ, मो. रा. वाळंबे, स. शि. भावे ( निमंत्रक )

( ५ ) **परीक्षा** :––रा. श्री. जोग, वि. म. कुलकर्णी, ह. श्री. शेणोलीकर, वा. रा. ढवळे, म. ना. अदवंत, अरविंद कुलकर्णी, गं. ना. जोगळेकर, गो. म. कुलकर्णी, अ. गं. मंगरूळकर ( निमंत्रक )

( ६ ) **ग्रंथालय** :–– प्र. न. जोशी, शं. ना. बर्वे, सु. रा. चुनेकर, मु. ग. पानसे, मो. रा. वाळंबे ( निमंत्रक )

( ७ ) **संशोधन** :––रा. शं. वाळिंबे ( कार्याध्यक्ष ), शं. दा. पेंडसे, रा. चिं. ढेरे, अ. गं. मंगरूळकर ( निमंत्रक )

( ८ ) **प्रकाशन** :––के. नारायण काळे, रा. श्री. जोग, ग. ल. ठोकळ, वि. म. कुलकर्णी, मो. रा. वाळंबे ( निमंत्रक )

( ९ ) **घटना-दुरुस्ती** :–– रा. शं. वाळिंबे ( कार्याध्यक्ष ), के. नारायण काळे, दे. द. वाडेकर, गं. बा. सरदार, दि. के. बेडेकर, मो. ज्ञा. शहाणे, वा. रा. ढवळे, वि. न. गाडगीळ, स. शि. भावे, म. ना. अदवंत, अ. गं. मंगरूळकर ( निमंत्रक )

( १० ) **अर्थ** :––रा. शं. वाळिंबे ( कार्याध्यक्ष ), ग. ल. ठोकळ, प्र. चिं. शेजवलकर, आ. ज्ञा. नाडकर्णी, स. कृ. पाध्ये ( निमंत्रक ).

अनुक्रमणिका

( ११ ) **प्रचार** :--द. वा. डावरे, ग. ल. ठोकळ, वि. म. कुलकर्णी, स. कृ. पाध्ये ( निमंत्रक ).

( १२ ) **योजना** :--रा. शं. वाळिंबे ( कार्याध्यक्ष ), वा. ल. कुलकर्णी, के. नारायण काळे, गं. वा. सरदार, दि. के. बेडेकर, मो. रा. वाळंबे ( निमंत्रक ).

( १३ ) **भाषा** :--ना. गो. कालेलकर, कृ. श्री. अर्जुनवाडकर, अशोक केळकर, श्रीपाद जोशी, दि. के. बेडेकर, शं. गो. तुळपुळे, अ. गं. मंगरूळकर, मु. ग. पानसे ( निमंत्रक ).

( १४ ) **हीरकमहोत्सव** :--रा. शं. वाळिंबे ( कार्याध्यक्ष ), अ. गं. मंगरूळकर, मो. रा. वाळंबे, के. नारायण काळे, स. कृ. पाध्ये, वि. म. कुलकर्णी. भीमराव कुलकर्णी.

**दिवाण चमनलाल कमिशनपुढे साक्ष** :--परिषदेच्या वतीने दि. २२–४–६७ रोजी मुंबई येथे दिवाण चमनलाल कमिशनपुढे प्रा. दि. के. बेडेकर यांनी साक्ष दिली. कमिशनला सादर केलेले लेखी निवेदन इतिवृत्ताच्या शेवटी परिशिष्ट म्हणून छापले आहे.

चालू वर्षी परिषदेकडून झालेले दोन विशेष कार्यक्रम म्हणजे भाषाविषयक व्याख्यानमाला व परिषदेचे पहिले विभागीय साहित्य-संमेलन. या कार्यक्रमाचा वृत्तान्त असा—

**भाषाविषयक व्याख्यानमाला** : शिक्षणाचा वाढता प्रसार, मराठी माध्यमाचा स्वीकार, मराठीला प्राप्त झालेला राजभाषेचा दर्जा, तिचा वापर करताना शासनाला येणाऱ्या अडचणी इत्यादी गोष्टी लक्षात घेऊन सामान्य जनांना भाषाव्यवहाराचा स्थूल मानाने परिचय व्हावा, या हेतूने यंदा ही भाषाविषयक व्याख्यानमाला आयोजित केली होती. या मालेत नोव्हेंबर–डिसेंबरमध्ये एकूण सात व्याख्याने झाली. १४ नोव्हेंबरला डॉ. मु. मं. कर्वे यांनी मालेचे औपचारिकरीत्या उद्घाटन केले. मालेतील व्याख्याते व विषय असे होते :

१४ नोव्हेंबर : डॉ. ना. गो. कालेलकर : भाषा : नव्या जबाबदाऱ्या

१५ नोव्हेंबर : प्रि. भा. शं. भणगे : सामाजिक शास्त्रे आणि भाषा

३० नोव्हेंबर : डॉ. प्रभाकर मांडे : साहित्यातील ग्रामीण बोली

२ डिसेंबर : श्री. ल. ना. गोखले : वृत्तपत्रांची भाषा

४ डिसेंबर : प्रा. ग. प्र. प्रधान : शासनव्यवहार आणि मराठी भाषा

९ डिसेंबर : प्रा. दि. के. बेडेकर : भाषेतील निषिद्धता

२२ डिसेंबर : प्रा. अरविंद मंगरूळकर : मराठी कवितेची भाषा.

प्रस्तुत व्याख्यानमालेतील सातही व्याख्याने डॉ. मु. ग. पानसे यांच्या 'भाषा आणि साहित्य' या विषयावरील लेखासह ग्रंथरूपाने प्रकाशित करण्याचे परिषदेने ठरविले आहे.

**विभागीय संमेलन** : परिषदेचे पहिले विभागीय मराठी साहित्य-संमेलन पुणे येथे दि. २८ व २९ ऑक्टोबरला देवी रमाबाई सभागृहात डॉ. शं. गो. तुळपुळे यांच्या अध्यक्षतेने भरले होते. या संमेलनाचा थोडा पूर्वतिहास देणे या ठिकाणी आवश्यक आहे.

२७ जून १९६५ रोजी परिषदेची जी वार्षिक साधारण सभा भरली होती, त्या सभेने कार्यकारी मंडळाला संमेलन भरविण्याचा आदेश दिला. अनेक अडचणींमुळे संमेलन १९६५ सालात होऊ शकले नाही. १९६६ जुलैच्या ' पत्रिका ' अंकात सर्व सभासदांना उद्देशून प्रकट विनंती करण्यात आली आणि संमेलनासंबंधी माहिती देण्यात आली. १९६६-च्या ऑगस्टमध्ये स्वागत-मंडळाचे सभासद होण्याविषयी विनंतीपत्र प्रसिद्ध करण्यात आले. संमेलनाध्यक्षांची निवडणूक २८ ऑक्टोबर १९६६ रोजी झाली. संमेलन १९६७-च्या एप्रिलमध्ये भरवावे असा निर्णय संमेलनाच्या कार्यकारी मंडळाने केला होता. पण भोपाळसंमेलनाच्या तारखा व विभागीय संमेलनाच्या तारखा यांच्यामध्ये फारच थोडे अंतर आढळून आल्याने संमेलन १९६७-च्या ऑक्टोबरमध्ये भरविणे सोयीचे होईल, अशी विनंती संमेलनाध्यक्ष डॉ. तुळपुळे यांनी केली. ती योग्य वाटल्यामुळे संमेलन ऑक्टोबर ६७-मध्ये भरविण्याचा पक्का निर्णय करण्यात आला. दरम्यान प्रस्तुत संमेलन घटनाबाह्य असल्याने ते भरविण्यास परिषदेला मनाई करावी, अशी फिर्याद श्री. पां. र. अंबिके यांनी जॉइंट सिव्हिल जज्ज श्री.दामले यांच्या कोर्टात दाखल केली. या फिर्यादीची सुनावणी

झाल्यानंतर श्री. अंबिके यांनी २५-८-६७ रोजी फिर्याद-दुरुस्तीचा अर्ज केला. ही दुरुस्त फिर्याद श्री. दाऊद यांच्या कोर्टात दाखल झाली. २४ ऑक्टोबर १९६७ रोजी ( संमेलनापूर्वी चारच दिवस) न्यायमूर्तींनी निकाल देऊन श्री. अंबिके यांची फिर्याद खर्चासह काढून टाकली. फिर्यादीच्या या प्रकरणामुळे नियोजित संमेलन भरविण्यापाशी परिषदेच्या व संमेलनाच्या कार्यकर्त्यांना शेवटपर्यंत केवढा मानसिक ताण सोसावा लागला असेल, याची सभासदांना कल्पना येईल. न्यायालयाकडून योग्य तो न्याय मिळाल्यामुळे कार्यकर्त्यांनी अल्पावधीत संमेलन यशस्वी करण्याचा यत्न केला.

पूर्वी ठरल्याप्रमाणे २८ व २९ ऑक्टोबर रोजी संमेलन अत्यंत उत्साहाने व यशस्वीपणे पार पडले. नियोजित स्वागताध्यक्ष महापौर श्री. ना. ग. गोरे यांना महत्त्वाच्या कामासाठी अकल्पितपणे मुंबईला जावे लागल्यामुळे म. म. प्रा. द. वा. पोतदार यांच्यावर ती जबाबदारी सोपविण्यात आली. अल्पावधीची पूर्वसूचना व पूर्वनियोजित कामे असूनही श्री. पोतदार यांनी ही जबाबदारी स्वीकारली व ती उत्तम प्रकारे पार पाडली. अध्यक्ष डॉ. तुळपुळे यांच्या भाषणातील महत्त्वाचा भाग व संमेलनाने संमत केलेले ठराव 'पत्रिके'च्या १६३-व्या अंकात प्रसिद्ध करण्यात आले आहेत. संमेलनात झालेले महत्त्वाचे इतर कार्यक्रम असे–

२९ ऑक्टोबर रोजी सकाळी ८॥ ते १२-पर्यंत 'मराठीची लिपी, लेखनपद्धती आणि साहित्याची भाषा' या विषयावर परिसंवाद झाला, या परिसंवादात श्री. शं. रा. दाते, डॉ. वा. गो. परांजपे, प्रा. य. र. आगाशे, प्रा. अरविंद मंगरूळकर, प्रा. कृ. श्री. अर्जुनवाडकर, श्री. देवीसिंग चौहान, डॉ. द. ह. अग्निहोत्री, श्री. म. ना. गोगटे व प्रा. श्री. के. क्षीरसागर यांनी भाग घेतला. परिसंवादाचा विषय शास्त्रीय व काहीसा जड असूनही दोन-अडीचशे श्रोते औत्सुक्याने तीन तास सभागृहात उपस्थित होते.

याच दिवशी दुपारी ३ ते ६-पर्यंत 'ललित लेखकावरील सामाजिक जबाबदारी' या विषयावर परिसंवाद झाला. श्रोतृवर्ग मोठ्या प्रमाणावर उपस्थित होता. प्रा. दि. के. बेडेकर, प्रा. गं. बा. सरदार, प्रा. वसंत दावतर, श्री. ग. ल. ठोकळ, प्रा. स. शि. भावे, श्री. दिलीप चित्रे व सौ. सुशीलाबाई आठवले यांची परिसंवादात उद्बोधक भाषणे झाली.

रात्री ९॥ वाजता कविसंमेलन भरले होते. श्री. सोपानदेव चौधरी, श्री. ग. ल. ठोकळ, श्री. गोपीनाथ तळवलकर, श्री. श्रीपाद जोशी, प्रा. सुधाकर भोसले, श्री. नारायण सुर्वे, श्री. ग. ह. पाटील, श्री. वसंत नलावडे, प्रा. गं. ना. जोगळेकर, सौ. संजीवनी मराठे, सौ. पद्मा गोळे, सौ. सरिता पदकी, डॉ. सरोजिनी बाबर, प्रा. वसंत के. दीक्षित, श्री. व. शा. वैद्य, श्री. मनमोहन, डॉ. वि. म. कुलकर्णी, प्रा. सूर्यकांत खांडेकर, व श्री. दिलीप चित्रे यांनी आपल्या निवडक कविता म्हणून दाखविल्या. या कार्यक्रमाच्या प्रसंगी श्री. सोपानदेव चौधरी व श्री. गोपीनाथ तळवलकर यांचा एकसष्टीत पदार्पण केल्याबद्दल सत्कार करण्यात आला. कविसंमेलनाच्या शेवटी सर्व कवींना श्रीफल व गुच्छ देऊन त्यांचा सत्कार करण्यात आला आणि नंतर नियंत्रक श्री. ग. ल. ठोकळ यांनी आभार मानले.

परिषदेचे हे पहिलेच संमेलन होते. ते पार पाडताना अनेक अडचणी आल्या. पण त्या निवारण होऊन संमेलन अखेर यशस्वीपणे पार पडले. संमेलनाच्या यशात स्वागतमंडळाचे सदस्य, संमेलनाचे कार्यकारी मंडळ, देणगीदार, वृत्तपत्रप्रतिनिधी, स. प. कॉलेजचा अधिकारीवर्ग, मंडप कॉंट्रॅक्टर दाते, सजावटकार श्रीमती आवाबेन देशपांडे, ध्वनिव्यवस्थापक श्री. गुप्ते, परिषदेचे माजी चिटणीस श्री. वि. त्र्यं. शेटे, न्यायालय-प्रकरणी परिषदेची बाजू मांडणारे वकील श्री. के. एन्. फडके इत्यादींचा अनेक प्रकारांनी हातभार आहे. या सर्वांचे परिषद मनःपूर्वक आभार मानीत आहे. संमेलनानंतर १७ डिसेंबर १९६७ रोजी डॉ. रा. शं. वाळिंबे यांच्या अध्यक्षतेने स्वागतमंडळाची सभा भरली होती. या सभेत संमेलनवृत्तांत व जमाखर्च संमत करण्यात आला. खर्च वजा जाता उरलेली रक्कम रु. ३०·७३ कोयना भूकंपनिधीला देण्यात यावी, असे ठरले. संमेलनाच्या जमाखर्चाचा तपशील ताळेबंदपत्रकात आहे.

**साहित्य-चर्चा-मंडळ**— परिषदेने 'साहित्य-चर्चा-मंडळा'चा उपक्रम दोन वर्षांपूर्वी सुरू केला. या उपक्रमाचे स्वागत साहित्यप्रेमी मंडळींकडून व वाङ्मयाच्या अभ्यासकांकडून चांगल्या रीतीने होत आहे, असा

अनुभव येत आहे. एखादा वाङ्मयीन वा कलाविषयक प्रश्न अथवा गाजलेली वाङ्मयकृती यावर टिपणवाचन व नंतर त्यावर चर्चा, असे या उपक्रमाचे स्वरूप आहे. काही टिपणे, ' पत्रिके'च्या अंकातून प्रसिद्ध करण्याची प्रथाही चालू ठेवली आहे. यंदा चर्चा-मंडळाच्या एकूण १३ बैठकी झाल्या. त्यांतील वक्ते व विषय पुढीलप्रमाणे होते : २० एप्रिल : श्रीपाद जोशी : ' मराठी नवकथा व उर्दू नवकथा ', २३ एप्रिल, कवी अनिल : ' कवितेचे स्वरूप ', १ जून : डॉ. वि. म. कुलकर्णी : ' कवितेची निर्मिती ', १७ जून : प्रा. गो. म. कुलकर्णी : ' बाबा आमटे यांची कविता व काव्यविषयक काही प्रश्न ', १३ जुलै : प्रा. गं. ना. जोगळेकर : ' ऊन ( कथासंग्रह ) ', १७ ऑगस्ट : प्रा. दि. के. बेडेकर : ' वेडी बाभळ व कालचक्र ( दोन कादंबऱ्या )', २१ सप्टेंबर : प्रा. स.शि. भावे : ' मराठीतील न-नायक ( अँटी हीरोज ) ', १९ आक्टोबर : श्री. मो. रा. वाळंबे : ' महामंडळाचे शुद्धलेखन : अडचणी, उणिवा व अपेक्षा ', २३ नोव्हेंबर : डॉ. मु. ग. पानसे ' भाषा आणि साहित्य ', २१ डिसेंबर : श्री. वि. शं. पारगावकर, 'श्री. ना. पेंडसे यांची कादंबरी ', १८ जानेवारी : डॉ. सु. रा. चुनेकर : ' पत्र : एक वाङ्मयप्रकार ', १५ फेब्रुवारी : श्री. ग. वा. बेहेरे. ' ग्रंथप्रसाराचे मारेकरी', २१ मार्च : डॉ. म. वि. गोखले : ' गडकऱ्यांच्या नाटकांचे शेवट '.

**स्मृतिदिन व व्याख्याने :** परिषदतर्फे यंदा नित्याचे व नव्याने सुरू केलेले असे पुढील स्मृतिदिन साजरे करण्यात आले : १० एप्रिल : डॉ. श्री. व्यं. केतकर : सकाळी कमला नेहरू उद्यानात ज्ञानकोशकार डॉ. केतकर यांच्या स्मारकाला पुष्पांजली व सायंकाळी तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांचे ' संस्कृति आणि विज्ञानविकास ' या विषयावर व्याख्यान; १३ एप्रिल : कै. बाळासाहेब पंतप्रतिनिधी : डॉ. प्र. न. जोशी यांचे ' साहित्यिकांची चित्रकारी ' या विषयावर व्याख्यान; २० जुलै : कै. वा. म. जोशी : प्रा. डॉ. श्री. व्यं. वोकील यांचे ' सत्य, अनुभव व भाषा ' या विषयावर व्याख्यान. २९ नोव्हेंबर : कै. माधव जूलियन : प्रा. त्र्यं. वि. सरदेशमुख यांचे ' साहित्यातील सत्याचा शोध ' या विषयावर व्याख्यान. २३ जानेवारी : कै. गडकरी : प्रा. भालबा केळकर यांचे ' गडकऱ्यांची नाटके ' या विषयावर व्याख्यान.

यंदा नव्याने केलेले दोन उपक्रम म्हणजे कै. बा. सी. मर्ढेकर स्मृतिदिन व संतवाङ्मयदिन. तुकारामबीजेच्या दिवशी ( दि. १९ मार्च ) संतवाङ्मयदिनाच्या, निमित्ताने डॉ. शं. गो. तुळपुळे यांचे ' संतवाङ्मयातील शाश्वत ' या विषयावर व्याख्यान झाले. कै. मर्ढेकर स्मृतिदिनाला वक्ते म्हणून श्री. प्रभाकर पाध्ये लाभले. २० मार्च रोजी त्यांनी ' मर्ढेकरांची सौंदर्यमीमांसा ' या विषयावर व्याख्यान दिले.

**स्नेहसंमेलन :** दरवर्षाप्रमाणे ३१ मे रोजी सायंकाळी परिषदेच्या गच्चीवर स्नेहसंमेलन भरविण्यात आले होते. या वेळी स्थानिक व परगावचे लेखक, कवी व इतर साहित्यप्रेमी सभासद मिळून सुमारे पाऊणशे मंडळी उपस्थित होती. डॉ. शं. दा. पेंडसे यांच्या संचालकत्वाने परस्पर परिचय, काव्यगायन, कथावाचन, आठवणी व नंतर अल्पोपाहार असा एकंदरीने कार्यक्रम झाला.सौ. पद्मा गोळे, कु. माधुरी पारसनीस, डॉ. वि. म. कुलकर्णी, श्री. श्रीपाद जोशी यांनी काव्यगायनात भाग घेतला. प्रा. आनंद यादव यांनी ' चटावलेला ' ही कथा वाचून दाखविली. उपस्थितांतील डॉ. शं. दा. पेंडसे, प्रा. दे. द. वाडेकर, प्रा. रा श्री. जोग व डॉ. रंगनाथ देशपांडे यांनी परिषदेसंबंधी आपल्या जुन्या आठवणी सांगितल्या.

**सत्कार आणि भेटी :** विशेष प्रसंगाने व कारणपरत्वे परिषदेच्या सभासदांना संस्थेत बोलावणे व सत्कार करून त्यांच्या कार्याचा गौरव करणे ही परिषदेची नेहमीची प्रथा आहे.

( १ ) आचार्य स. ज. भागवत हे दुखण्यातून बरे होऊन दहा-बारा वर्षांनी पुण्यात आले होते. त्यांच्या मुक्कामाच्या अवधीत १२ जूनला परिषदेतर्फे त्यांचा सत्कार करण्यात आला. या प्रसंगी आचार्यांनी ' नवसाहित्य व नवजागरण ' या विषयावर आपले विचार श्रोत्यांपुढे मांडले. प्रा. दे. द. वाडेकर, प्रा. गं. बा. सरदार, डॉ. अशोक केळकर, प्रा. स. शि. भावे इत्यादींनी नंतर झालेल्या चर्चेत भाग घेतला.

( २ ) डॉ. ना.गो. कालेलकर यांच्या भाषाविषयक ग्रंथाला साहित्य-अकादमीचे रु. पाच हजार रकमेचे पारितोषिक मिळाले. डॉ. कालेलकर यांना मिळालेल्या या बहुमानाबद्दल परिषदेने निमंत्रितांच्या उपस्थितीत २७ जानेवारीला त्यांचा सत्कार केला व त्यांच्या भाषाविषयक कामगिरीचा गौरव केला.

अनुक्रमणिका

(३) पुण्याचे महापौर श्री. ना. ग. ऊर्फ नानासाहेब **गोरे** यांच्या वयाला साठ वर्षे पूर्ण झाल्याबद्दल व गुरुवर्य श्री. बाबूराव जगताप यांनी ऐंशीच्या वर्षात पदार्पण केल्याबद्दल उभयतांचे परिषदेतर्फे अभीष्टचिंतन व सत्कार करण्यात आला. हे दोन्ही कार्यक्रम १६ जुलै व १६ सप्टेंबर रोजी झाले.

(१) पुणे महानगरपालिकेचे माजी महापौर श्री. कारले गुरुजी, माजी उपमहापौर श्री. पां. गो. सातव व स्थायी समितीचे अध्यक्ष श्री. दुर्गादत्त शर्मा यांनी दि. ३० ऑगस्ट रोजी परिषदेला भेट दिली. तिघांनी परिषदेच्या कामकाजाविषयी पदाधिकाऱ्यांशी आस्थेवाईकपणे चौकशी केली व समाधान व्यक्त केले.

(२) १९ नोव्हेंबरला पुणे येथे महाराष्ट्र राज्य-सरकारच्या भाषासल्लागार मंडळाची बैठक भरली होती. मंडळाची भूमिका व कार्य यांचा परिचय व्हावा यासाठी मंडळाच्या सदस्यांना सायंकाळी परिषदेने भेटीला बोलाविले. त्याप्रमाणे भेटीचा कार्यक्रम झाला. मंडळाचे अध्यक्ष डॉ. वा. ना. पंडित यांनी मंडळाची भूमिका विशद केली. या प्रसंगाने उपस्थितांबरोबर परिभाषेसंबंधीच्या व्यावहारिक व तात्त्विक प्रश्नांची चर्चाही झाली. चर्चेत प्रा. दे.द. वाडेकर, प्रा.गं.बा.सरदार, श्री. मो. ज्ञा. शहाणे, श्री. स. मा. गर्गे, आचार्य लिमये, डॉ.अशोक केळकर, श्री. श्रीपाद जोशी, श्री. मो. रा. वाळंबे इत्यादींनी भाग घेतला. परिषदेचे कार्याध्यक्ष डॉ. रा. शं. वाळंबे यांनी मंडळ-सदस्यांचे हार्दिक स्वागत केले व शेवटी डॉ. मु. ग. पानसे यांनी आभार मानले.

**कै. टेंबे व्याख्यानमाला** :—कोल्हापूरचे श्री. टेंबे-बंधू यांच्या प्रतिवार्षिक देणगीतून 'कै. गोविंदराव टेंबे व्याख्यानमाला' गेली सात वर्षे चालू आहे. यंदाचे मालेचे आठवे पुष्प दि. २६ व २७ ऑगस्ट रोजी ठाणे येथे मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या साहाय्याने श्री. बाबूराव जोशी (कोल्हापूर) यांनी गुंफिले. 'कै. गोविंदरावांची संगीतास देणगी, नाट्यसंगीताबद्दल अपेक्षा व संगीत-शिक्षणाचा नवा दृष्टिकोण' अशा तीन विषयांवर श्री. बाबूरावजींनी सप्रयोग व्याख्याने देऊन रसिकवर्गाचे समाधान केले. परिषदेतर्फे कार्यकारी मंडळाचे सदस्य श्री. वा. रा. ढवळे मालेच्या प्रसंगी उपस्थित होते.

**शोकसमाचार**—यंदाच्या वर्षी परिषदेचे अनेक नामवंत सभासद व साहित्यक्षेत्रातील इतर व्यक्ती यांचे निधन झाले. या सर्वांविषयी कार्यकारीमंडळाने दुखवटा व्यक्त करून श्रद्धांजली वाहिली. परिषदेच्या दृष्टीने ज्यांचे निधन विशेष दुःखकारक व हानिकारक ठरले, त्या व्यक्ती म्हणजे श्री. ना. गो. तथा नानासाहेब चापेकर, श्री. रा. दा. तथा बापू देसाई, श्री. मा. श्री. तथा बापूजी अणे व श्री. य. ग. फफे या होत. कै. नानासाहेब चापेकर व कै. देसाई यांचे आणि परिषदेचे संबंध किती गाढ होते, हे जाणकारांना विदित आहेच. या दोघा ख्यातनाम कार्यकर्त्यांच्या निधनानिमित्त परिषदेने प्रकट सभा घेऊन आदरपूर्वक श्रद्धांजली वाहिली. कै. नानासाहेबां-संबंधी सभेत प्रा. दे. द. वाडेकर यांनी तयार करून मांडलेला जो विस्तृत दुखवटा ठराव संमत झाला. तो 'पत्रिके'च्या १६४-व्या (जाने.-मार्च ६८) अंकात प्रसिद्ध केला आहे. कै. बापूजी अणे यांना श्रद्धांजली वाहण्यासाठी टिळक महाराष्ट्र विद्यापीठात ४ फेब्रुवारीला सभा भरली होती, त्या सभेत परिषदेचे उपाध्यक्ष म. म. पोतदार व डॉ. शं. दा. पेंडसे, तसेच कार्याध्यक्ष डॉ. वाळिंबे यांनी भाषणे करून श्रद्धांजली वाहिली. कै. फफे हे परिषदेचे जुने सभासद व भाषाव्यवहार, शुद्धलेखन, छंदःशास्त्र, वाङ्मयसंशोधन अशा विषयांत अत्यंत बारकाईने लक्ष घालणारे अबोल कार्यकर्ते होते. वृद्धापकाळामुळे (वय ८९) त्यांचे निधन झाले.

**आपटे पारितोषिक** : परिषदेतर्फे उत्कृष्ट कादंबरीला प्रतिवर्षी देण्यात येणारे रु. ५१-चे कै. ह. ना. आपटे पारितोषिक यंदा 'झुंज' (लेखक श्री. ना. सं. इनामदार) या ऐतिहासिक कादंबरीला देण्यात आले. प्रा. वि. वा. आंत्रेकर व प्रा. कृ. ब. निकुंब यांनी परीक्षक म्हणून काम केले.

## शाखा सभावृत्त

### सोलापूर :

अहवालाच्या वर्षावधीत कार्यकारिणीच्या पाच सभा झाल्या. मे १९६७-मध्ये जस्टिस मेहेरचंद महाजन सीमामंडळ सोलापुरास आले असताना त्या कमिशनपुढे शाखेतर्फे निवेदन सादर करण्यात आले; आणि

